सर्व आपले मनोरथ पूर्ण करून घेण्यास कारण आहे. ह्मणोन तसें वागोन खातरजमा ठेवावी. आणि तुह्मांकरितां पोषाख पाठविला हा घेऊन आपणावर पूर्ण लोभ आहे असें मनांत आणावें. छ ५ माहे जिल्हेज, सन २३ जुलूस, सन १०५९ हिजरी.

---

[ ४ ] अलीफ. १० नोव्हेंबर १६४९.

नानाप्रकारच्या स्नेहकृपेस योग्य, महत्कृपेचें पात्र, उत्तम उमदेपणास लायक, शिवाजी भोसले यांणीं बादशाही कृपेची इच्छा करून जाणावें कीं तुमचें पत्र रावोपंत याजबराबर पाठविलें, तें पावलें, आणि बादशाही कृपेस कारण जालें. जुन्नर व अमदानगर येथील देशमुखीविषयीं लिहिलें. त्यास, आह्मीं हुजूर गेल्यानंतर हा मजकूर घडोन येईल. खातरजमा ठेवावी. परंतु आपणाकडील एक वकील पाठवून द्यावा. ह्मणजे मजकूर समजून घेऊन अमलांत येईल. व वकीलास जो मजकूर विचारूं त्याचें उत्तर द्यावें, ह्मणजे काम होण्यास दिरंग लागणार नाहीं. जाणोन उद्योग करावा आणि लोभ पूर्ण जाणावा. छ ५ जिल्हेज, सन ९३ जुलूस, सन १०५९ हिजरी.

---

[ ५ ] अलीफ. २३ एप्रिल १६५७.

सर्व उमरावांत श्रेष्ठ, आपले बराबरीचे मंडळींत थोर, नाना प्रकारचे कृपेस पात्र, शिवाजी भोसले, बादशाही कृपेस पात्र, कृतकृत्यता पावून जाणोत कीं तुमची अर्जदास्त इकडील पंज्याचे निशाणाचे फर्मान पोहोचल्यानंतर चिट्ठी पावली. हरएकाविषयीं जें सांगणें तें तुह्मांकडील वकील सोनाजी यांजपाशीं सांगितलें. त्याणीं तुह्मांसी बोलोन खातरजमा केलीच असेल—सांप्रत जे किल्ले व मुलूक विजापूरकरांकडील तुमचे हातीं होते ते पेशजीप्रमाणें होऊन तुमचे मनोगताअन्वयें बंदर दाभोळ व त्याजखालील मुलूख तुह्मांस दिल्हा असे. ऐशीयास, इकडील दौलतीची किफायत मदत जी करणें असेल तिचा समय हाच आहे, जाणोन

करण्यांत आणावें, आणि हुजूर भेटीस यावे. याखेरीज जे मतलब तुमचे मनांत असतील ते सर्व घडोन येतील. हालीं तुमचे वकील यांस परत जाण्याची जलदी होती, सबब निरोप दिल्हा आहे. त्यांचे जबानीं इकडील लक्ष दिमोन दिवस तुमचा उत्कर्षाचा करण्याचा वगैरे सर्व ध्यानांत येईल. याजकरितां इकडील दौलतीचे लहान मोठे कामाकाजाची तर्तूज आपले ऊर्जितार्चे कारण समजून करीत जावी व वारंवार इकडील कृपेचें इच्छित असावें. सांप्रत ईश्वरकृपा व आमचें दैवशालित्व व फौजेचे शेरपणा यांनीं इकडील वाईट इच्छिणार नाहींसे झाले. दिवसानुदिवस, इकडे जय येत चालला. तो असा कीं, किल्ला बेदर हा मोठा मजबूत, आजपावेतों त्यास कोणींच सर केला नव्हता, व कोणाचे मनांत कल्याणदेखील सर करावयाची येत नव्हतीं, तो एकंदर दक्षण व कर्नाटक देशाचा दरवाजा, तो एक दिवसांत हस्तगत जाला. इतरांसी वर्षांचीं वर्षेंही वश जाला नाहीं. ईश्वराचें सर्व कृत्य! इकडील प्रतापशूराचे शौर्यामुळें तुह्मीं येविषयींचा संतोष मानून, वरचेवर जसे आमचे जय होतील तसे त्या संतोषाचे वर्तमानावर कान ठेवीत जाणें, आणि आमचा लोभ पूर्ण आहे असें मानीत जाणें. छ १८ रजब सन ३१ जुलूस, सन १०६७ हिजरी.

---

[ ६ ] अलीफ. २४ फेब्रुवारि १६६८.

आपले, बरोबरीचे मंडळींत श्रेष्ठ, सर्व उमराव लोकांत श्रेष्ठ, महत्कृपेस पात्र, बादशाही कृपेस योग्य, शिवाजी भोसले बादशाही कृपेस आपला सत्कार मनांत आणून समजोत कीं:—तुमची अर्जदास्त कृष्णाजी भास्कर पंडित यांच पत्रासुद्धां रघुनाथपंत वकील यांबरोबर पाठवून ( दिल्ली पाहून ) मजकूर ध्यानास आला. यद्यपि तुमच्या पेशजीच्या गोष्टी विसरावयाजोग्या नाहींत, तथापि तुह्मीं आपले कृतकृत्यांचा पश्चात्ताप केला आणि हा दरबार उपेक्षेचा नाहीं जाणोन, वडिलार्चे लक्ष निभ्रांत इकडे आहे असें समजोन, तुमचें पूर्वकृत्य मनांत आणीत नाहीं.

येविषयींचा संतोष मानून, इकडील दौलतीविषयीं कोशीस करीत जावी. आपले वतनी माहाल, किल्ले व कोकण देशसुद्धां नगरवाले खेरीज विजापूरकर आदिलखानाचे इलाख्यांत जे आहेत ते त्यांजकडून मुलूक हस्तगत जाल्यानंतर बंदोबस्त होण्याविषयीं वचन असावें, ह्मणजे सोनोपंत यांस हुजूर पाठवितों आणि इकडील लक्षांत वागून सरकारी मुलुकाची सरहद्द रक्षण करून कामदारांशीं परीक्त होतो कीं ज्यायोगें बंड वगैरे बखेडे न होवोत, ह्मणोन लिहिलें. त्यास, तुह्मीं लिहिल्या अन्वयें वर्तून हा फर्मान पाहातांच आपले मजकुराची अर्जी लेहून सोनोपंताबरोबर पाठवून देणें. ह्मणजे त्याप्रमाणें केलें जाईल. जाणोन लक्षांत वागोन आमचे लोभाची पूर्णता समजावी. छ १ माहे जमादिलाखर, सन १०६८ हिजरी.

ताजा कलमः—महाराज जसवंतसिंग व कासमखान हे उभयतां इकडील फौज आलीशी समजोन उज्जनीहून सहा कोस पुढें लढाईचे इरादानें आले होते. परंतु ईश्वरकृपेनें इकडील शूर अस्सल लौकिकी सहा सात हजार स्वार त्यांजकडील कामास येऊन शेवटीं पळूं लागले. त्यांजकडील खजीना व तोफखाना व हत्ती वगैरे बहुत कारखाने लुटले गेले. ईश्वरें अशा तऱ्हेनें आमची फत्ते करविली. पुढें आणखी नाना प्रकारचें जें सर्वांस संतोषदायक व शत्रूस पादाक्रांति देणार असें सत्वरच होईल. तुह्मीं याविषयींचा संतोष मानून इकडील लक्षांत राहून कल्याणाचे उमेदवार असावें. रा छ मजकूर.

---

[ ७ ] अलीफ. १४ जुलै १६५९.

आपले बराबरीचे राजांत श्रेष्ठ; सर्व उमरावांत थोर, महत्कृपेस पात्र, मुसलमान धर्मरक्षक शिवाजी यांणीं पादशाही कृपेचे उमेदवार होऊन जाणावें कीं:-ईश्वरें, धर्मवृद्धि व न्याय यथास्थित होण्याबद्दल व जुलूम पृथ्वींतून नष्ट होण्याबद्दल आह्मांस जय होऊन, जे शत्रू धर्म व दौलत याविषयीं उदासीन होते त्यांस पादाक्रांत करून, छ २४

रमजान रोज रविवार या दिवशीं आह्मांस सिंहासनाधीश्वर केलें. त्या प्रभूचा बहुत उपकार मानितों. तुमची अर्जदास्त अशा संतोष समयांत पावून मजकूर ध्यानांत आला. ऐशियास तुह्मीं इकडील लक्षांत वागतच आहां, त्याअन्वयें वागून खैरखाही करीत जाणें. हालीं दक्षिणेकडील सुभ्याचे कामावर उमदेतुलमुलूक अमीरुलउमराव ह्मणोन जावयाची योजना करून तेथील सर्व लोकांचा बंदोबस्त त्यांजकडे सांगितला आहे. तरी तुह्मींही त्याचे सल्लेंत वागून, वारंवार कोशीस करून जसें पूर्वीचें बोलणें त्याप्रमाणें अमलांत आणावें. या काळीं ईश्वरकृपेनें जे मनोरथ होते ते मुलूक व दौलत येविषयींचे सिद्ध होऊन कोणतीही इच्छा राहिली नाहीं. जे जे शत्रू इकडील अपकर्षणाची वासना धरीत होते, ते ते आपले केलेले कर्माचें शासन पावून शेवटीं मुलाबाळासुद्धां बाहेकाराचे सरहद्दींत हस्तगत जाले. ते लवकरच शिक्षाही पावतील. तुह्मीं इकडील लोभ आपणावर पूर्ण आहे असें जाणून लक्षांत वागोन कृपेचे इच्छीत असावें. तुह्मांकरितां येथून पोषाख पाठविला आहे हा घ्यावा. छ. ४ जिल्काद, सन १ जुलूस, सन १०६९ हिजरी.

---

[ ८ ] अलीफ.

श्री राऊ प्रौढप्रताप दिनकर राजाधिराज महाराज राजश्री शिवाजी राजे महाराज स्वामी गोसावी यांचे सेवेसीः—

७ किंकरें तापीदास दलाल अजू जाबती कपीतानें फुरशीस मो॥ पेंठ रायबाग रामराम विनंति येथील क्षेम महाराजांचे कृपेस्तव जाणोन महाराज साहेब आपलें सामराज वेळवेळ लिहाया आज्ञा केली पाहिजे. याउपरि—महाराजांनीं सेवकावरी अमृतवृष्टी करून पत्र पाठविलें तें छ १९ माहे रबिलाबल उत्तम समयीं पावून बहुत संतोष होऊन शिरसा वंदून सनाथ जाहालों. वा इजत रफअत दशागाहः मुशा दुरो साहेबासी सराफराजनामा पाठविले होते तेंहि शीरदांदे ठेवून बहुत संतोष जाहाले. आज्ञा केली होती जे दाभोळ बंदरास तुह्मीं येऊन, सौगा-

गरी करून सराफराज होणें. ह्मणोन तरी पहिले आह्मीं बंदर राजापुरीं असतां राजश्री निळो सोमनाथपंतांनीं आह्मासी किफायतीयाबाबे लिहिलें होतें. त्याचें तालीक लेहून बंदर सुरतासी आपल साहेबापासी पाठविलें होतें. त्याची जबाब अजुनी आली नाहीं. आतांही महाराज साहेबीं लिहिलेवरून त्यां लिहिलेचें तालीक लेहून, तें आपलेतर्फेनें बहुत कांहीं लेहून, मुद्दाम अदमी करून त्याबराबरी बंदर सुरतेसी रवाना करितों. तेथून जैसा रजा सादीर होईल त्याप्रमाणें वर्तणूक केलें जाईल. विशेष लेहावें तरी महाराज साहेब आरीफ असेती. सेवकावरी निरंतर अमृतवृष्टी असो दिल्हे पाहिजे. हे विनंति. खामा बेक तापीदास तवाहीदास.

[ ९ ] राजश्री—साहेब.

खबर—राजश्री—सेवेस निळो सोनदेव व रखमाजी शिवदेऊ सेवेस खबर + + + + + + माहे जगादिलाखर साहेबाचे कृपादृष्टीकरून वर्तमान कल्याण असे :—

७ केसो नारायण सबनीस किल्ले राजगड याची वर्तणूक पहिलेपासून पाहतां, कारभार माकूल नाहीं. ऐसीयासी, पहिलेच भलते गोष्टीचे तहकीक करावे तरी कितेक गोष्टीकरितां करितां येत नसे. त्याउपरि, साहेब राजगडीहून मिर्जा राजाचे भेटीस गेलियावर राजगडीं हवालदार नाहीं, अगर पद्मावतीस सरनोबत नाहीं. राजगडचा कारभार केसोपंताचे शिरीं आला त्यावरी आह्मीं बारीक नजरेनें पाहतां, राजगडचे तनखापैकीं लारी ३००० तीन हजार अबाजीपंताकरन व राघोपंताकरन आलियासी, केसोपंतीं तीन हजार लारीपैकीं लारी १४०० चौदाशें गोविंद राउताचे हवाला केली. आणि उरली लारी १६०० सोळाशें आपल्या हवालगिरापाशीं ठेविली. त्यावरी घालमेली करून या प्यादियापासून त्यापाशीं, त्यापासून आणिका प्यादियापाशीं, ऐसें दोघा चौघाजवळी देती. ऐसे पंधरा रोज घालमेली करून सोळाशें लारीपैकीं सोळाचे लारीपैकीं सासे लारी तोडाविली, आणि हजार लाहारी एक

नाईकवाडियापाशीं ठेविली. यावरी आह्मांस घुणघुण कळो आली कीं, तीन हजार लारी आगी होती, यांपैकीं चौदाशें लारी चौदाशें लारी गोविंद राउताचे माहालीं दिधली आणि सोळाशें लाहारी काय केली तें कळत नाहीं. ऐसी खबर आह्मास लागतांच, आह्मीं रखमाजीपंतास सांगितलें कीं, तहशिलेस कोण गेले होते ते नाईकवाडियासी बोलावून आणणें. त्यावरी, रखमाजीपंतीं नाईकवाडियाचा नाईकवाडी बोलावून, कोण तहशिलेस गेले होते, कोणापाशीं कांहीं पैके ठेविले आहेत कीं नाहींत, ऐसें मनास आणिता, त्यापासून त्यापासीं ऐसें करितां, प्यादे कोण्ही हजीर, कोण्ही मसालियासी गेले. खबर घेतां घेतां दादजी नाईकवाडी, गुंडा नाईकवाडी यापाशीं हजार लारी ठेविली ते आडळली. त्यास खबर घेतां व चौकशी करितां बहुत घालमेली केली. त्यावरी आह्मीं नाईकवाडियासी सांगितलें कीं, हजार लारी तुजपाशीं आहे ते आगचे बगररजा खर्च न करणें. ऐसें केलें तों प्यादियापाशीं तहकिकी केली. हे खबर केसो नारायणास कळली. *

---

[ १० ] श्रीवरदमूर्तिर्जयति. २९ नोव्हेंबर १६६०.

सरंजामी. छ रबिलाखर, सुा इहिदे सितैन अलफ.

राजश्री निळोपंत मजमूदार यास वतनीचा कारभार करावयास ठेविलें. माहोलीपासून भीमगडपावेतों व इंदपूर, पुणें, चाकण कदीम वतनीचा कारभार करावा. यासी, पंडित माा इलेनें साहेबासी अर्ज केला कीं —आजी कामाचे दिवस आहेत. वतनीचा कारभार आणिक कोण्हास सांगावा. आपण बराबरी येऊन दाहा लोक कामें करितील तैसी करून देऊन गड घेणें पडिलें तरी घेऊन देऊन. ऐसा अर्ज केला. त्यास साहेबीं उत्तर दिधलें कीं.—वतनी राहाणें

---

* हे खबर बहुत काळाची. राजश्री पर्ती व रखमाजी शिवदेऊ म्हणजे शिके हायचा हुजुरी सरसुभेदार बहुत मातबर होता त्यानें मिळोन यजमान स्वामींस लिहिली होती.

हेंहि काम थोर आहे. वतनी राहाणें. येथें तुह्मांस बकशीस इमारतीस पैके पावतील त्यास दर सदे होन २ दोनीप्रमाणें पावतील. ऐसे साहेब बोलिलियावरी पंडित मा। इले बोलिले कीं:—जरी वतनीचेंहि काम थोर आहे तरी बहुत बरें. एकानें सिद्ध संरक्षण करावें. एकानें साध्य करावें. दोन्ही कामें साहेब बराबरीनें मानिताती तरी आपण वतनीं राहोन. परंतु इमारतीचे पैके पाववून बकशीस घेणार नाहीं. मोरोपंत त्रिंबक व शिवनेर येथें पाठविले आहेत ते गड घेतील व मुलूक घेतील, कामें करितील. साहेब थोर कामास जाताती तें काम श्रीचे कृपेनें होऊन येईल. त्यास राजश्री मोरोपंतास मेहेरबानीनें पंचवीस फुलें दिधलीं तरी आह्मांसहि वीस फुलें द्यावीं. ऐसा साहेबीं निश्चय केला पाहिजे. त्यावरी साहेबीं ऐसाच तह दिधला कीं:—वतनीं राहोन कारभार करावा. इमारतीचे पैके पाववून बकशीस न घ्यावें. राजश्री मोरोपंत काम करितील, गड घेतील, पैके मि (ळ) वितील, सुरगिरीचा प्रयत्न करून घेतील. त्यास, मेहेरबान होऊन, पेशवे आहेत याकारितां पंचवीस फुलें दिधलीं तरी, तुह्मांस मजमूच्या काइदियानें, वतनींचें काम तें काम बराबरी ऐसें समजोन, त्यास द्यावीं तेच वख्तीं तुह्मांसहि २० वीस फुलें पाठवावीं. या हिसेबा (नें) जैसें त्यास पावेल तैसें तुह्मांस देऊन. ऐसा साहेबीं निश्चय करून पंडित मा। ईलेस वतनीचा कारभार करावयास ठेविलें असे. पंडित मा। ईलेनेहि सदरहूप्रमाणें मान्य केलें असे. मोर्तब सूद. (मर्यादेयं)
(विराजते)

कित्ता एक. रदबदल राजश्री निळोपंतीं केली कीं:—

साहेब वतनी कारभारास ठेवीत आहेत. यास, कोण्ही कैसा वर्तेल, कोण्ही कैसा वर्तेल. यास, आपणास जे गोष्टी दखल होईल ते गोष्टीची वाजीखुसी करून. जे दखल नव्हे आणि साहेबास कळेल ते ते साहेबीं आपणास सांगावी. आपण वाजीखुसी करूत. परंतु

लोक गैरमाकुल आम्हांस नकळत वर्तले तरी त्याची बदलामी आपणावरी न ठेवावी. आपण खुतुत गैरमाकुल सहसा वर्तणार नाहीं. कारभारमुळें दाहा लोकांसीं बरें वाईट बोलावें लागत आहे. एखादियानें लटकेंच कांहीं सांगितलें तरी ते गोष्टीची बरी चौकशी करावी. सांगितलियावरूनच मनांत गैरमेहेरवानी न धरावी. -बाजी खुसी करिता नेमस्त खुतुत तमा आढळिली तरी मग जे नामेहेरवानी करणें ते करावी. लोक गैरमाकुल वर्तले तरी जो जैसें करील तो तैसा पावेल. त्याची बदलामी आपणावरी नाहीं. येणेंप्रमाणें साहेबीं मान्य केलें असे. मोर्तब सूद. (मर्यादेयं)
(विराजते)

कित्ता एक. रदबदल कीं वतनीचा कारभार साहेबीं आपणास सांगितला आहे. यासी, काय गैरमाकुल कारभार होईल त्याची मुनसीफी साहेबीं करावी, किंवा आमची आम्हावरी टाकावी. अनाजीपंताचे सांभाळीं न करावी. ऐसे बोलिलियावरी साहेबीं मान्य केलें असे. मोर्तब सूद. (मर्यादेयं)
(विराजते)

कित्ता एक कलम. पंडित मा। इलेनें अर्ज केला कीं:--आपण कारभार करणें तो ऐसा करून कीं जैसा आपले घरींचा खुतुत कारभार. ज्यान फाइदा समजोन करीत आहे. (त) तैसा करून साहेबीं मेहेरवानी मात्र असो द्यावी. मोर्तब सूद. (मर्यादेयं)
(विराजते)

येणेप्रमाणें सदरहू कलमांचा तह साहेबीं दिधला असे. मोर्तब सूद. (मर्यादेयं)
(विराजते)

---

[ ११ ]    १८ डिसेंबर १६६०

सरंजामी. छ २४ रबिलाखर, सन इहिदे सितैन अलफ. पुणें, व इंदापूर व चाकण; सुपें, बारामती, ऐसे इनाम हिंदू व मुसलमान यांसी

इनाम आहेत. त्यास, पेशजी आपणास मुकासा असतां, अफजलखाना आधीं जेणेंप्रमाणें तसलमती ज्यास जें पावत असेल त्यास तेणेप्रमाणें देणें. ऐसा तह केला असे. मोर्तब सूद. ( मर्यादेयं )
( विराजते )

---

[ १२ ] श्री. २ एप्रिल १६६३.

मसुरल हजरती राजमान्य राजश्री मोरो त्रिमळ पेशवे व राजश्री निळो सोनदेऊ मजमूदार प्रती राजश्री शिवाजी राजे दंडवत–उपरि. साहेबीं कोंकणांत नामदार खानावरी जाण्याचा तह केला होता. ऐसी-यासी, हालीं किल्ले सिंहगडाहून समाचार आला आहे कीं गडावरी कांहीं फितवा जाला आहे. याबद्दल तूर्त कोंकणांत जाण्याचा तह राहिला. तरी तुह्मीं लष्करी लोकांनसीं व खासखेली हशमानसीं कागद देखतांच स्वार होऊन किल्ले सिंहगडास जाणें आणि किल्लियावरच हुशार खबरदार असणें. फितवा कोण कोण लोकीं केला होता हे खबर घेऊन हुजूर लेहून पाठवणें. मा। तान्हाजी नाईक व कोंडाजी नाईक व ++ ++ हडे व कमळोजी नाईक व देरेकर व रुमाजी अहिरा व गोंदजी पांढरा हे बराबरी घेऊन सिंहगडास जाऊन सिंहगडीं अलगो अलगानीं बहुत खबरदार असणें. जे लोक किल्लियावरी मेदांत असतील ते हे आपल्या बराबरील लोक अलगेस ठेवणें. छ ४, माहे रमजान, सन सल्लास सितैन. पा। हुजूर. *

( मर्यादेयं )
( विराजते )

---

* हें अक्षर राजश्री पंतांचे अक्षरासारिखेंच दिसतें. होय नव्हे हा संदेह कागदातील मकसूद पाहतां होतो.

[ १३ ]

अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य राजश्री जगन्नाथपंत व त्रिंबक वेंकटेश गोसावी यांसी. मोरो त्रिमळ व निळो सोनदेऊ नमस्कार. उपरि. राजेसाहेब शिवापट्टणीं मुक्काम किती दिवस करणार, व लोहगडतर्फेनें इमारती पाहावयास जाणार, तिकडे जातील किंवा न च जात, रोहेडियाकडून पांडवगड पाहोन येणार होते ते तिकडे जातील किंवा न च जातील, हें कांहीं वर्तमान लिहिलें नाहीं. तरी सविस्तर वर्तमान लेहून पाठवणें. व चिरंजीव राजश्री राजारामाचे + + + + राजश्री साहेबास खबर लिहिली आहे ते श्रुत करून खबर सत्वर पाठवून देणें. बहुत लिहिणें न लगे. छ ३ माहे रजब. श्रुंडीचें वर्तमान लिहिणें. पा। हुजूर.

मोर्तब
सूद.

---

[ १४ ] अलीफ. २१ आगष्ट १६६६.

आपले बराबरीचे राजांत श्रेष्ठ, सर्व उमरावांत थोर, काबील कुल महत्कृपेचें पात्र, मुसलमानी धर्मरक्षक, शिवाजी राजे यांणीं बादशाही कृपेचे उमेदवार होऊन जाणावें कीं:—सांप्रत तुमचें पत्र बहुत नरमाईचें राजे जैसिंग यांचे भेटीबद्दल कळलें. कृत्य माफ व्हावें ह्मणोन घेतलेयाचें पाहून गोड ध्यानास आलें. यापूर्वी तुमचे मनांतील हाशील सरकार कामगारांनीं समजाविलें होतें कीं, तुह्मीं आपले कृत्यांचा पश्चात्ताप करून, या दौलतीचे आश्रयास येऊन, तीस किल्ले आपणाकडील इकडील कामगारांचे स्वाधीन करून, बारा किल्ले व त्यांजखालील मुलूक एक लक्ष होनांचा निजामशाहीचे किल्ले व मुलूक पैकीं, त्याप्रकारें आणखी चार लक्ष होनांचा मुलूक तळकोंकणांतील विजापूरकरांचे इलाख्याचा जो हालीं तुह्माकडे चालू आहे, व पांच लक्ष होनांचा मुलूक बालेघाटपैकीं, विजापूरचे इलाख्यापैकीं, येणेंप्रमाणें एकंदराना

फर्मान बादशाही मागता व चाळीस लक्ष होन दरसाल तीन लक्षप्रमाणें पेशकसीबद्दल देऊं ह्मणता. ऐशीयास, तुमच्या गोष्टी ज्या तुह्मीं तूट अंदेशा न पाहतां केल्या त्या माफीजोग्या नाहींत. तथापि राजे जैसिंग यांणीं लिहिल्यावरून तें सर्व माफ करून तुमच्या मनोरथाप्रमाणें बारा केले (देतों) त्याचा त्यांचा तपशील खालीं लिहिला आहे. व त्यांच्या खालचा मुलूक देऊन आणखी हुकूम केला आहे कीं, जो मुलूक नऊ लक्ष होनांचा त्यापैकीं चार लक्ष होनांचा तळकोंकणपैकीं विजापूरकरांचे इलाख्यापैकीं हालीं तुह्मांकडे चालत आहे तो बंदोबस्ताकरितां इकडील सरकारांत आला. सबब, बालेघाटीं पांच लक्षांचा मुलूक, विजापूर आमचे हातीं येईल त्या आधीं तुह्मीं त्यांजकडून घेतल्यास व चांगले फौजेसुद्धां राजे जैसिंग यांस मिळोन बादशाही कामांत याचे मर्जीप्रमाणें कोशीस केल्यास, विजापूर फत्ते जाल्यानंतर तुह्मीं पेशकसीचे ऐवजाचा भरणा केल्यास, तुह्माकडे बहाल ठेवूं. हालीं आमचे चिरंजीवास पांच हजारी मनसब व पांच हजार स्वार—कीं एकएकाचीं दोन दोन तीन घोडीं असावीं—याप्रमाणें देऊन, तुह्माकरितां पोषाख पाठवून, हा फरमान आपले पंज्याच्या चिन्हांसुद्धां पाठविला आहे. तरी तुह्मीं इकडील लक्षांत वागोन, बादशाही काम लहान मोठेंसुद्धां करून, हें सर्व आपले ऊजिताचीच गोष्ट असें समजत जावें. छ ९ रबिलावल, सन ८ जुलूस, मु॥ सन १०७७ हिजरी.

किल्ल्यांचा तपशील राजे जैसिंग यांचें लिहिल्याप्रमाणें :—

| | | |
|---|---|---|
| १ राजगड. | १ तोरणा. | १ लिंगणगड. |
| १ मोरप. | १ तळेगड. | १ महाडगड. |
| १ घोसाळा. | १ अलवारी. | १ पाल. |
| १ उधेदुर्ग. | १ रायरी. | १ कुंवारी. |

---

[ १९ ] अलीफ. २८ आगष्ट १६६६.

आपले बराबरीचे राजांत श्रेष्ठ, सर्व उमरावांत थोर, महत्कृपेस पात्र, मुसुलमानी धर्मरक्षक, शिवाजी याणें बादशाही कृपेंत आपला सत्कार

जाणोन समजावें कीं:-तुह्मीं फौजसुद्धां बादशाही लष्करांत आहांत, आणि ताथवडा फलटण हे किल्ले विजापूरकरांकडील होते, ते घेऊन त्यांची फौज तळकोंकण प्रांतीं होती तेथें रात्रीं पोहोचविली, ह्मणोन राजे जैसिंग याणें लिहिल्यावरून तुमचे शाबासकीस कारण जालें. सबब तुह्मांकरितां उत्तम पोषाख व जडावाची कट्यार पाठविली आहे. या लाभाचा संतोष मानून इतःपर या स्वारींत जितके कोशीस कराल तितकें पहिल्यापेक्षां अधिक लोभास कारण होईल. छ ७ रबिलोवल, मुा सन १०७७ हिजरी.

---

[ १६ ] अलीफ. ९ मार्च १६६८.

आपले बराबरीचे राजांत श्रेष्ठ, सर्व उमरावांत श्रेष्ठ, महत्कृपेस पात्र, मुसुलमानी धर्मरक्षक, शिवाजी याणें बादशाही कृपेचें उमेदवार होऊन जाणावें कीं:—तुमचें पत्र मिर्जा राजे जैसिंग याणीं ठरविल्याप्रमाणें इकडील प्रांतीं रवाना जालें तें पावून बहुत संतोष जाला. ऐशीयास, इकडील लोभ तुह्मावर पूर्ण आहे ह्मणोन अवकार न करितां खातरजमेनें मजलदरमजल निघोन यावें. ह्मणजे भेटींअंतीं बहुत सत्कार पावून माघारे जाण्याविशींचा निरोप दिल्हा जाईल. सांप्रत तुह्मांकरितां पोषाख पाठविला आहे तो घ्यावा. रा। छ १० माहे सवाल, सन ९ जुलूस, सन १०७८ हिजरी.

---

[ १७ ] अलीफ. २४ फेब्रुवारी १६७०.

आपले बराबरीचे राजांत श्रेष्ठ, सर्व उमरावांत थोर, स्नेह व विश्वास यांस योग्य, महत्कृपेस पात्र, पूर्ण लोभांत घेतलेले, राजे शिवाजी याणीं जाणावें कीं:—आमचा बहुत लोभ तुह्मांवर आहे. याजकारितां तुमचा सर्व मजकूर हुजूर लिहिल्यावरून तुह्मांस राजेपणाचा किताब दिल्हा असे. या गोष्टीना सत्कार मानून, पेशजींपेक्षां अधिक काम करून दाखवावें. ह्मणजे सर्व मनोरथ पूर्ण होतील. तुमचे कार्याविशीं विनंति लिहिली

आहे तोही बंदोबस्त यथास्थित घडोन येईल. खातरजमा ठेवावी आणि बादशाही लोभ आपणावरी आहे असें समजावें. छ ९ माहे सवाल सन ११ जुलूस, सुा सन १०८० हिजरी.

---

[ १८ ] ४ आगस्ट १६७०.

मशहूरल हजरत राजश्री विठ्ठल दत्तो सुभेदार व कारकून ताा जाउली प्रती शिवाजी राजे दंडवत. सुहुरसन इसन्ने सबैन अलफ राजश्री प्रतापराऊ सरनोबताकडे हुजरून दहा हजार रुपये ऐवज पाठविला आहे. तरी सदरहूस वोझील इतबारी नफर १० दहा देणें. मजुरास मजुरी रास देऊन सिताब वरच्यावरी रवाना करणें. छ २७ रबिलावल. मोर्तब सूद.

---

[ १९ ] ६ डिसेंबर १६७०.

तह. छ १९ जिल्काद, सुहुरसन इहिदे सबैन अलफ. बाबाजी सावंत याणें तरतूद करून, चिंतामणीस दिवाळ व कुणबीणस दिवाळ या करून, कोट पारखा करवून, कोटास दिवाळा करून, पारखा करवून, देववा ( वा ). येणेंप्रमाणें पारखा कोट करून आपणास कोट घेऊन द्या. ह्मणजे सरंजाम करून येणेंप्रमाणें चालवावें:—

| बाबाजी सावंत यास पाचाशा घोडियाचे जितरब ध्यावें. | चिंतामणीस दिवाळ व कुणमणीस दिवाळ यास इनाम आरधा कोटांतील द्यावा व पचां गांव चालवावे. |
|---|---|

येणेंप्रमाणें चालवावें. ऐसा तह केला असे. मोर्तब सूद. ( मर्यादेयं )
( विराजते. )

---

[ २० ] १६७०।१६७१.

अज् रख्तखाने राजश्री जिजाआऊसाहेब दाइमदौलतहू ताा माा, नारो त्रिमळ हुद्देदार व मोकद्दमानी व रयानी मौजे किवाड तर्फ खेडबरें मालूम दानद सुा इहिदे सबैन अलफ. हरी गोविंद याचा इनाम मौजे

मजकुरीं चावर १ एक आहे. कारकीर्दी दर कारकीर्दी भोगवटाबद्दल फर्मान चालत आलें आहे. आपलेंहि कारकीर्दीस चालिलें आहे. चिरंजीवाचा कागद आहे. तरी तुह्मीं भोगवटा मनास आणून, राजश्री निळो सोनदेऊ यांचे बाप सोनाजी नारायण येहीं इनाम कीर्दी करून भोगवटा चालिला आहे. हें तुह्मीं देशमुख व मोकदम यांस लिहोन सालाबाद चाललेंत आलें आहे तैसें चालवणें. दरम्यान कितेक दिवस फितवतीकरितां भोगवटा जाला नसेल, त्याचा उजूर न करणें. सालाबाद भोगवटें प्रो मनास आणून, राजश्री निळो सोनदेऊ यांचे दुमाले इनाम शेत चावर एक करून चालवीत जाणें. उजूर न करणें. तुह्मीं तालीक लेहून घेऊन अस्सली खुद खत मा इलेपासीं फिरावून देणें. पा हुजूर चावर सदरहूचें थळ नायगावींचे शिवेचा पाणलोट नजीक पिंपरी शेतांत देही आंबे ठेवताती. आंबे आहे ते यांचे दुमाल करणें, आणि चालवीत जाणें.

---

[ २१ ] १६७१ । १६७२.

( प्रतिपच्चंद्र )
( लेखेव वर्धिष्णु र्वि- )
( श्ववंदिता ॥ शाहसू- )
( नोः शिवस्येषा मुद्रा )
( भद्राय राजते )

जाबिता तह. सन इसन्ने कारणें राजश्री साहेबीं तह केला कीं :— जो आपला वतन मुलूक आहे त्यापैकीं माहालोमाहालींहून खजाना करावयास पैके आणावे. त्याचा खजानाच करून ठेवावा. जे वक्तीं मोगलांशीं झगडा सुरू होईल आणि मोगल येऊन गडांस वेढा घालतील त्याचे मदतीस जरूर. आणिकीं करून ऐवज जुडेना तरीच खजानाचे पैके खर्च करावे. नाहीं तरी एऱ्हवीं राज्यभागास सर्वेही खर्च न करावा. ऐसा साहेबीं तह केला असे. आणि खजाना करावयाची मोईन केली होन :—

१,२५०००.

मा। एक लाख पंचवीस
हजार होन रास.

| | |
|---|---|
| २०००० | कुडाळ. |
| २०००० | राजापूर. |
| २०००० | कोळें. |
| १५००० | दाभोळ. |
| १३००० | पुणें. |
| १०००० | नागोजी गोविंद. |
| ५००० | जाउली. |
| ५००० | कल्याण. |
| ५००० | भिवंडी. |
| ५००० | इंदापूर. |
| २००० | सुपें. |
| ५००० | कृष्णाजी भास्कर. |
| १२५००० | |

येणें प्रमाणें एक लाख पंचवीस हजार होन खजाना करावयाचा तह केला असे. मोर्तब सूद *

( मर्यादेयं )
( विराजते )

---

[ २२ ] ( प्रतिपच्चंद्र ) १६७१। १६७२

( लेखेव वर्धिष्णु र्वि )
( श्ववंदिता ॥ शाहसू- )
( नोः शिवस्येषा मुद्रा )
( भद्राय राजते ॥ )

---

* दस्तूर पंताचें.

जाबिता तह इमारती करणें. सन इसन्नेकारणें इमारती करावयाचा तह केला असे कीं गबाळ हुन्नरवंद लावून पैका पावत नाहीं, हुन्नरवंद गवगवा करितां काम करीत नाहींत, याबद्दल तह केला कीं नेमस्तच इमारती करावी.———होनः

१,७५०००

मा एक लाख पंचाहत्तरी
हजार होन रास.

५०००० . . . . ———रायगड.

३५००० दिा घरें.

२०००० तळीं २
१०००० गची
५००० क़िले

———

३५०००

१५००० तट

———

५००००

१०००० सिंहगड.
१०००० सिंधुदुर्ग.
१०००० विजयदुर्ग.
१०००० सुवर्णदुर्ग.
१०००० प्रतापगड.
१०००० पुरंधर.
१०००० राजगड.
५००० प्रचंडगड.
५००० प्रसिद्धगड.
५००० विशाळगड.

| | |
|---|---|
| ५००० | महीपतगड. |
| ५००० | सुधागड. |
| ५००० | लोहगड. |
| ५००० | सबळगड. |
| ५००० | श्रीवर्धनगड व मनरंजन. |
| ३००० | कोरीगड. |
| २००० | सारसगड. |
| २००० | महीधरगड. |
| १००० | मनोहरगड. |
| ७००० | किरकोळ. |
| १,७५,००० | |

येणेप्रमाणें एक लाख पंचाहत्तरी हजार होन खर्च करणें. मोर्तब सूद *

( मर्यादेयं )
( विराजते. )

---

[ २३ ] १६७१।१६७२.

वर्के सनद बकपीस रक्षखाना राजश्री शिवाजी राजे साहेब दामदौलतहू शहुरसन इसन्ने सबैन व अलफ. साहेब अगराहून निघालेयाउपरि चिरंजीव राजश्री संभाजी राजे यांस राजश्री कृष्णाजी विश्वासराऊ यांचे सांभाळी केलें. मानइले चिरंजीवास सुखरूप किल्ले राजगडास घेऊन आले. मानइलेची मातुःश्री आईजी + वंधिली. मा काशी तिमळ हेहि बराबरी आलियाबद्दल मेहेरबानीनें बकपीस द्यावयाचा तह केला रुपये.

५००००

---

* दस्तूर राजश्री पंत ह्मणून संग्रह केला.

मो पन्नास हजार रुपये रास.

| मातुःश्री आईजी | मा। काशी त्रिमळ |
|---|---|
| २५००० | २५००० |

येणेप्रमाणें पावतीत पाववावे.

मोर्तब सूद *

---

[ २४ ] ८ सप्टेंबर १६७१.

मशहुरल हजरत राजश्री तुकोराम सुबेदार व कारकून सुभे मामले प्रभावळी प्रती राजश्री शिवाजी राजे दंडवत. शहुरसन इसन्ने सबैन व अलफ. उपरि सबनीस सुबे मजकूर यावरी बाद + + + + तगारा नाईकवाडी + + बापूजी नलवडा याणें कल्हावती करून तरवारेचा हात टाकिला आणि अखेर आपलेच पोटांत सुरी मारून घेऊन जीव दिल्हा. हें वर्तमान होऊन गेलें. तुह्मीं कांहीं हुजूर लिहिलें नाहीं. मराठा होऊन ब्राह्मणावरी तरवार केली, याचा नतीजा तोच पावला. हालीं बापूजी नलवडा व कोंडाजी चांदरा व संताजी जामदार हरबकसा करून सबनिसास दटावितात कीं + + + + + होतें तेंच तुमचे उपरि उचलो + + + + +— वर्तमान कळों आलें. तरी ब्राह्मणास + + + + तील त्याची खबर घेणें जरूर आहे. तुह्मीं + + + + घेत नाहींत. इतकियाउपरि त्यास ताकीद करून हालखुद ठेवणें कीं सबनिसाचे वाटे न च जात. जरी कांहीं सबनिसासी कथळा करायावरी ख + + + ल हालखुद माकुलपणें असतील तरी हुजूर लिहिणें. ह्मणने तहकीक आहे कीं सबनीस मारायावरी आले होते याबद्दल साहेब त्यांस दस्त करून हुजूर आणवितील आणि खबर घेतील. तुह्मीं ऐसे बेकैद लोकांस होऊं न देणें. हालखुद ठेवून रवेशवार चाकरी घेत जाणें कीं कोण्ही

---

* दस्तूर बाळप्रभूचें असे. महलग निशाण पतमहाराजांचें असे. ह्मणून समग्र असे.

बेढंग न वर्ते. मुलाहिजा न धरणें. छ १४ जमादिलावल.
मोर्तब सूद.

---

[ २५ ] १९ सप्तंबर १६७१.

शहरुल हजरत राजश्री धारराव निंबाळकर सुबेदार यांसी राजश्री शिवाजी राजे शहुरसन इसन्ने सबैन व अलफ. मा माहादाजी यमाजी यासी मु + + + + + + + + + + + + + काम फर्मावून पाठविले + + + + + + + + + + दरबार करीत जाणें + + + + + + + + + तिसालींना होन्न पा १०० एकसे रास पादशाही मोकरर केले असेती. इ प पासून वजा वटाऊ रवेशप्रमाणें करीत जाऊन बाकी बेरीज माहे दर माहे आदा करीत जाणें. यारिदी व कागद बाहे लिहिणियामाफिक व शाही सिरें देत जाणें. वारगीर, घोडे व हवालगीर व दिवटीदार निसबत बाजे हजारी सुबाचे मजमदाराचे तहप्रमाणें चालवणें. मा नइले हुजूर चिरंजीव संभाजी राजे याकडे वाकेनिविसीचे मुतालिकीस होते. देणें फाजील कांहीं नाहीं. मोर्तब सूद.

तेरीख छ २९ जमादिलोवल.

---

[ २६ ] २४ सप्तंबर १६७१.

मशहुरल हजरत राजश्री तुकोराम सुबेदार व कारकून सुबे मामले प्रभावळी प्रति राजश्री शिवाजीराजे दंडवत. शहुरसन इसन्ने सबैन व अलफ. मामले दाभोळ विलायतीस नारेळ दर सदे लारी ४ व रोठा-देखील जकात दर खंडीस लारी १२५ सवाशेंप्रमाणें विकत आहे. आणि नेवरें व बाजे तुह्माकडील माहालीं ऐन जिन्नस बटाई दिवाणांत उसूल देताती. व रयत वांसा खरीदी करितात. ऐसें असतां, कमनिर्खें नारेळ सुपारी विकते, ऐसी खबर कळों आली आहे. तरी हा अंमल कैसा आहे? ऐन जिनसांची गीर्दवरी कैसी करता? आणि कमनिर्खें

मो पन्नास हजार रुपये रास.

मातुःश्री आईजी २५००० मा काशी त्रिमळ २५०००

येणेप्रमाणें पाववीत पाववावे.

मोर्तब सूद *

---

[ २४ ] ८ सप्तंबर १६७१.

मशहुरल हजरत राजश्री तुकोराम सुबेदार व कारकून सुभे मामले प्रभावळी प्रती राजश्री शिवाजी राजे दंडवत. शहुरसन इसन्ने सबैन व अलफ. उपरि सबनीस सुबे मजकूर यावरी बाद + + + + तगारा नाईकवाडी + + बापूजी नलवडा याणें कल्हावती करून तरवारेचा हात टाकिला आणि अखेर आपलेच पोटांत सुरी मारून घेऊन जीव दिल्हा. हें वर्तमान होऊन गेलें. तुम्हीं कांहीं हुजूर लिहिलें नाहीं. मराठा होऊन ब्राह्मणावरी तरवार केली, याचा नतीजा तोच पावला. हालीं बापूजी नलवडा व कोंडाजी चांदरा व संताजी जामदार हरबकसा करून सबनिसास दटावितात कीं + + + + + होतें तेंच तुमचे उपरि उचलो + + + + +— वर्तमान कळों आलें. तरी ब्राह्मणास + + + + तील त्याची खबर घेणें जरूर आहे. तुम्हीं + + + + घेत नाहींत. इतकियाउपरि त्यास ताकीद करून हालखुद ठेवणें कीं सबनिसाचे वाटे न च जात. जरी कांहीं सबनिसासी कथळा करायावरी ख + + + ल हालखुद माकुलपणें असतील तरी हुजूर लिहिणें. म्हणजे तहकीक आहे कीं सबनीस मारायावरी आले होते याबद्दल साहेब त्यांस दस्त करून हुजूर आणवितील आणि खबर घेतील. तुम्हीं ऐसे बेकैद लोकांस होऊं न देणें. हालखुद ठेवून रवेशवार चाकरी घेत जाणें कीं कोण्ही

---

* दस्तूर बाळप्रभूचें असे. महलग निशाण पंतमहाराजांचें असे. म्हणून सम्रद असे.

बेढंग न वर्ते. मुलाहिजा न धरणें. छ १४ जमादिलावल.
मोर्तब सूद.

---

[ २५ ] १९ सप्तंबर १६७१.

शहरुल हजरत राजश्री धारराव निंबाळकर सुबेदार यांसी राजश्री शिवाजी राजे शहुरसन इसन्ने सबैन व अलफ. मा। माहादाजी यमाजी यासी मु + + + + + + + + + + + + + + काम फर्मावून पाठविले + + + + + + + + + + दरबार करीत जाणें + + + + + + + + + तिसालींना होन्न पा। १०० एकसे रास पादशाही मोकरर केले असेती. इ प पासून वजा वटाऊ रवेशप्रमाणें करीत जाऊन बाकी बेरीज माहे दर माहे आदा करीत जाणें. यारिदी व कागद बाहे लिहिणियामाफिक व शाही सिरें देत जाणें. बारगीर, घोडे व हवालगीर व दिवटीदार निसबत बाजे हजारी सुबाचे मजमदाराचे तहप्रमाणें चालवणें. मा। नइले हुजूर चिरंजीव संभाजी राजे याकडे वाकेनिविसीचे मुतालिकीस होते. देणें फाजील कांहीं नाहीं. मोर्तब सूद.

तेरीख छ २५ जमादिलोवल.

---

[ २६ ] २४ सप्तंबर १६७१.

मशहुरल हजरत राजश्री तुकोराम सुबेदार व कारकून सुभे मामले प्रभावळी प्रति राजश्री शिवाजीराजे दंडवत. शहुरसन इसन्ने सबैन व अलफ. मामले दाभोळ विलायतीस नारेळ दर सद्दे लारी ४ व रोठा-देखील जकात दर खंडीस लारी १२५ सवाशेंप्रमाणें विकत आहे. आणि नेवरें व बाजे तुह्माकडील माहालीं ऐन जिन्नस बटाई दिवाणांत उसूल देताती. व रयत वांसा खरीदी करितात. ऐसें असतां, कमनिर्खें नारेळ सुपारी विकते, ऐसी खबर कळों आली आहे. तरी हा अंमल कैसा आहे? ऐन जिनसांची गीर्दवरी कैसी करता? आणि कमनिर्खें

कोण विकितात? हे खबर घेणें आणि ताकीद करणें. पेस्तर ऐसें नव्हे. ऐन जिनसाची गीर्दवरी बरी व्हो. आणि जो तह तुह्मांकडे आहे (त्या निर्खे विक्री कर) णें. कम निर्खे विकिलिया इकडे धक्का बसतो आणि अलग नुकसान येऊं पाहातें. त्याची बदनामी तुह्मास, ऐसें जाणून, खरी खबर घेऊन, चौकशी व गीर्दवरी करून, ऐन जिन्नस तहप्रमाणेंच दिवाणांतून विकीत जाणें. छ ३०, जमादिलावल.

---

[ २७ ] ६ डिसेंबर १६७१. श्री. (श्री)

(सीव चरणीं तत्पर)
(त्रिंबकसुत मोरेश्वर)

मशहुरल हजरत राजश्री नरहरी आनंदराऊ सरसुभेदार ता कुडाळ प्रती राजश्री शिवाजी राजे दंडवत. सुहुरसन इसन्ने सबैन अलफ. साहेबीं प्रभावळीपासून तहद कल्याण भिवंडीपावेतों मिठाचा जबर निरखाचा तह दिल्हा आहे. ऐसीयासी, बारदेशांत मीठबंदरें आहेत तेथून मीठ खरीद करून उदमी नेत आहेत. ऐसीयासी, हालीं आपणाकडे मिठाचा पाड जबर जाला, हे गोष्टी ऐकोन उदमी खळक कूल बारदेशाकडे जातील. तरी तुह्मी घाटीं जकाती जबर बैसवणें. बारदेशांत मीठ विकतें त्याचा हिशेबें, प्रभावळीकडे संगमेश्वराकडे मीठ विकतें, त्याणें कितेक जबर पडतें, तें मनास आणून त्या अजमासें जकाती जबर बैसवण कीं संगमेश्वरीं विकतें आणि घाटपावेतों जे बेरीज पडेल त्या हिशेबें बारदेशीच्या मिठास जकाती घेवणें. संगमेश्वराहून बारदेशीचें मीठ माहागच पडे ऐसा जकातीना तह देणें. जरी जबर जकातीचा तह नेदा, मुलाहिजा कराल, ह्मणजे कुल उदमी खळक बारदेशाकडे वोहटेल. आपलीं कुल बंदरें पडतील. ऐसी गोष्टी आहे. तरी रोखा पावेल तेंच घटिकेस कुल घाटीं जकाती जबर करणें. संगमेश्वराहून बारदेशीच्या मिठास जबर निरख पडे ती गोष्ट करणें. ये गोष्टीचा एक जरा उजूर न करणें. ये गोष्टींत साहेबाना बहुत फायदा आहे. जरी

जबर किमती केली आहे त्या हिशेबें बारदेशींच्या मिठास जबरच पडे ती गोष्ट करणें. व तुह्मांकडे लहान मीठ आहे त्याचा तह आहे त्याखेरीज हाली जाजती दर मणें टंकसाळी रुके ·।· बारा रासप्रमाणें तह देणें. मुलाहिजा न करणें. मिठाचा मामला हजराहीबद्दल कर्द लाख रुपये यावयाचा मामला आहे. तरी लिहिलेप्रमाणें अंमल करणें. या कामाबद्दल पाठविले असती त्यांसी मसाला होन नीा ४.

| | |
|---|---|
| रामाजी बांदे हरकारा | संताजी गिरजोजी अपातप |
| राा होन नीा ३ | होन १ |

पाठवले असत. यांसीं मसाला होन नीा ४ होन, पाा कुडाळपैकीं आदा करणें. रास आदा करणें. छ १४ साबान. पाा हुजूर.

पौ छ २९ साबान (मर्यादेयं)

सुदे कुडाळ, बराबर रामाजी बार सूद. (विराजते)

बांदे हरकारा. सुरू सूद.

---

[ २८ ] श्रीभवानी शंकर. १९ मे १६७३.

मशरुल अनाम राजश्री जुमलेदारानीं व हवालदारानीं व कारकुनानीं दिमत पायगो मुक्काम मौजे हलवर्ण ताा चिपळूण मामले दाभोळ प्रति राजश्री शिवाजी राजे सुाा अर्बा सबैन व अलफ. कसबे चिपळुणीं साहेबीं लष्कराची विले केली आणि याउपरि घाटावरी कटक जावें ऐसा मान नाहीं. ह्मणून एव्हां छावणीस रवाना केलें. ऐसीयास, चिपळुणी कटकाचा मुक्काम होता याकरितां दाभोळच्या सुबेयांत पावसाळ्याकारणें पागेस सामा व दाणा व वरकड केला होता तो कितेक खर्च होऊन गेला. व चिपळुणाआसपास विलातीत लष्कराची तसवीस व गवताची व वरकड हरएक बाब लागली. त्याकरितां हाल कांहीं उरला नाहीं. ऐसें असतां वैशाखाचे वीस दिवस, उनाळा, हेहीं पागेस अधिक. बैठी पडली. परंतु जरूर जालें त्या करितां कारकुनाकडून व गडोगडीं गल्ला असेल तो देववून जैसी तैसी पागेची बेगमी केली आहे. त्यास, तुह्मीं मनास ऐसा दाणा, रातीब,

गवत मागाल, असेल तोंवरी धुंदी करून चाराल, नाहींसें जालें ह्मणजे मग कांहीं पडल्या पावसांत मिळणार नाहीं, उपास पडतील, घोडी मरायास लागतील. ह्मणजे घोडीं तुह्मींच मारिलीं ऐसें होईल, व विलातीस तसवीस देऊं लागाल. ऐशास, लोक जातील, कोण्ही कुणब्याचेथील दाणे आणील, कोण्ही भाकर, कोण्ही गवत, कोण्ही फाटें, कोण्ही भाजी, कोण्ही पाले. ऐसें करूं लागलेत ह्मणजे जीं कुणबीं घर धरून जीवमात्र घेऊन राहिले आहेत तेहि जाऊं लागतील. कितेक उपाशीं मराया लागतील. ह्मणजे त्याला ऐसें होईल कीं मोगल मुलकांत आले त्याहूनहि अधिक तुह्मीं! ऐसा तळतळाट होईल! तेव्हां रयतीची व घोडियांची सारी बदनामी तुह्मावरी येईल. हें तुह्मी बरें जाणून, सिपाही हो अगर पावखलक हो, बहुत यादी धरून वर्तणूक करणें. कोण्ही पागेस अगर मुलकांत गांवोगांव राहिले असाल त्याणीं रयतेस काडीचा अजार द्यावया गरज नाहीं. आपल्या राहिला जागाहून बाहीर पाय घालाया गरज नाहीं. साहेबीं खजानांतून वाटणिया पदरीं घातलिया आहेती. ज्याला जें पाहिजे, दाणा हो अगर गुरेंढोरें वागवीत असाल त्यांस गवत हो, अगर फाटें, भाजीपाले व वरकड विकावया येईल तें, रास घ्यावें, बाजारास जावें, रास विकत आणावें. कोण्हावरी जुलूम अगर ज्याजती अगर कोण्हासी कलागती करावयाची गरज नाहीं. व पागेस सामा केला आहे तो पावसाळा पुरला पाहिजे. ऐसे तजविजीनें दाणा रातीब कारकून देत जातील तेणेंप्रमाणेंच घेत जाणें, कीं उपास न पडतां रोजबरोज खायाला सांपडे आणि होत होत घोडीं तवाना होत ऐसें करणें. नसतीच कारकुनासी धसपस कराया, अगर अमकेंच द्या तमकेंच द्या ऐसें ह्मणाया, धुंदी करून खासदारकोठींत, कोठारांत शिरून लुटाया गरज नाहीं. व हालीं उनाळ्याला आहे तइसें खलक पागेचे आहेत, खण धरून राहिले असतील व राहातील, कोण्ही आगट्या करितील, कोण्ही मलेतच जागा चुली, रंधनाळा करितील, कोण्ही तंबाकूला आगी घेतील, गवत पडिलें आहे ऐसें अगर वारें लागलें आहे ऐसें मनास ना आणिता ह्मणजे अविस्वाच एखादा दगा होईल. एका खणास आगी लागली ह्मणगे सारे

खण जळोन जातील. गवताच्या लहळ्यांस कोणीकडून तरी विस्तो जाऊन पडला ह्मणजे सारें गवत व लहळ्या आहेत तितक्या एकेएक जाळों जातील. तेव्हां मग कांहीं कुणबियांच्या गर्दना मारल्या अगर कारकुनांस ताकीद करावी तैसी केली तऱ्ही कांहीं खण कराया एक लाकूड मिळणार नाहीं, एक खण होणार नाहीं. हें तो अवघियाला कळतें. या कारणें, बरी ताकीद करून, खासेखासे असाल ते हमेषा फिरत जाऊन, रंधनें करिता, आगट्या जाळिता, अगर रात्रीस दिवा घरांत असेल, अविस्ताच उंदीर वात नेईल, ते गोष्टी न हो. आगीचा दगा न हो. खण, गवत वांचेल तें करणें. ह्मणजे पावसाळा घोडीं वाचलीं. नाहीं तर मग, घोडीं बांधावीं नलगेत, खायास घालावें नलगे, पागाच बुडाली!!! तुह्मीं निसूर जालेत!!! ऐसें होईल. याकारणें तपशिलें तुह्मांस लिहिलें असे. जितके खासे खासे जुमलेवार, हवालदार, कारकून आहा तितके हा रोखा तपशिलें ऐकणें, आण हुशार राहाणें. वरचेवरी, रोजाचारोज, खबर घेऊन, ताकीद करून, येणेंप्रमाणें वर्तणूक करितां ज्यापासून अंतर पडेल, ज्याचा गुन्हा होईल, बदनामी ज्यावर येईल, त्यास,—मराठियाची तो इज्जत वाचणार नाहीं, मग रोजगार कैसा?—खळक समजों जास्ती केल्यावेगळ सोडणार नाहीं. हें बरें ह्मणून वर्तणूक करणें. छ १२ सफर.

---

[ २९ ] १६७४

शिवाजी महाराज व इंग्रेज कंपनी यांचा तह.

१ इराणचा पातशाहा व हिंदुस्थानांतील मोगल पादशाहा यांचा व इंग्रेजांचा तह जाला. त्यांचे देशांत इंग्रेजाचा व्यापार चालत आहे.

२ व्यापार माल येईल त्याजवरी जकात घेऊं नये. महाराजाचे राज्यांत व्यापार चालावया अडथळा होऊं नये.

३ इंग्रेजाचे शिक्याचे रुपये व मोहोरा व पैसे महाराजाचे राज्यांत चालावे.

४ महाराजाचे मुलकांत दर्याचे कांठीं इंग्रेजांचीं जाहाजें मोडून फुटून किनारियास लागलीं तर त्यातील माल आमचा आह्मास द्यावा.

एकूण चार कलमें. पैकीं महाराजांनीं ठराव केला तीं कलमें:—

१ महाराजांचे राज्यांत तुह्मीं व्यापार करावा.

१ माल येईल जाईल त्याची जकात माफ केली असे.

गैरमजुरा कलमें:—

१ ईंग्रेजाचे शिक्कयाचे रुपये व पैसे व मोरा या मुलकांत चालणार नाहींत.

१ महाराजाचे मुलकांत दर्याचे किनारियास जहाजें मोडून फुटून किनारियास लागल्यास माल देणार नाहींत.

---

[ ३० ] श्री. १६७४.

प्रतिपच्चंद्रलेखेव वर्धिष्णुर्विश्ववंदिता ॥
शाहसूनोः शिवस्यैषा मुद्रा भद्राय राजते ॥

अज् रख्तखाने राजश्री शिवाजी राजे दामदौलतहू. ता। बकाजी फर्जंद–मुहुरसन अर्बा सबैन व अलफ. मौजे नांदेडे तर्फ खडकवासलें येथील मोकदमी राजवडियाची होती. त्याणें सदोजी पोळ यासी निमे तक्षीम नावनांगराची विकिली. निमे तक्षीम कीर्दीची मुलियासी विकिली. त्यास सदोजी पोळापासून निमे नावनांगराची तक्षीम साहेबीं पैके देऊन विकत घेतली होती. ते हालीं तुह्मांस मेहेरबान होऊन शंभरा होनास विकत दिधली. निमे तक्षिमेचा हकलाजिमा व इनामचावर जें उत्पन्न असेल तें खाऊन नावनांगराची निमे पाटिलकीचा कारभार करीत जाणें. पाटिलकीची निमे तक्षीम तुज दिधली असे. लेकराचे लेकरीं औलाद अफलाद तुवा खाणें. अर्थाअर्थी कोणास संबंध नाहीं. साहेबीं निमे तक्षीम तुज दिधली असे. निगे काळी व पांढरी असे निमे तक्षीम आहे. ते तुझे तुज असे. मोर्तब सूद.

रुजू सुरनवीस.

---

[ ३१ ] श्रीशंकर प्रसन्न. १८ जानेवारी १६७९.

मशहुरुल हजरत राजश्री जिवाजी विनायक सुबेदार व कारकून सुभे मामले प्रभावळी प्रती राजश्री शिवाजी राजे दंडवत सुहुरसन खमस सबैन व अलफ दौलतखान व दरिया सारंग यांसी ऐवज व गल्ला राजश्री मोरोपंत पेशवे यांणीं वराता सुभे मजकुरावरी दिधल्या. त्यांस तुह्मीं कांहीं पावले नाहीं, ह्मणोन कळों आलें. त्यावरून अजब वाटलें कीं ऐसे नादान थोडे असतील!!! तुह्मांस समजलें असेल कीं याला ऐवज कोठें तरी ऐवज खजाना रसद पाठविलिया मजरा होईल ह्मणत असाल. तरी पद्मदुर्ग वसवून राजपुरीच्या उरावरी दुसरी राजपुरी केली आहे. त्याची मदत व्हावी, पाणी फाटीं आदिकरून सामान पावावें, या कामास आरमार वेगीनें पावावें, तें नाहीं. पद्मदुर्ग हबशी फौजा चौफेर जेर करीत असतील. आणि तुह्मीं ऐवज न पाववून, आरमार खोळंबून पाडाल! एवढी हरामखोरी तुह्मीं कराल. आणि रसद पाठवून मजरा करूं ह्मणाल, त्यावरी साहेब रिझतील कीं काय? हे गोष्ट घडायाची तऱ्ही होय न कळे कीं हबशियांनीं कांहीं देऊन आपले चाकर तुह्मांला केले असतील! त्याकरितां ऐसी बुद्धी केली असेल! तरी ऐशा चाकरांस ठीकेठीक केले पाहिजेत! ब्राह्मण ह्मणून कोण मुलाहिजा करूं पाहतो? याउपरि तऱ्ही त्यांला ऐवज व गल्ला राजश्री मोरोपंतीं देविला असे तो देवितील. तो खजाना रसद पावलियाहून अधिक जाणून तेणेप्रमाणें आदा करणें कीं ते तुमची फिर्याद न करीत व त्यांचे पोटास पावोन आरमार घेऊन पद्मदुर्गाचे मदतीस राहात तें करणें. याउपरि बोभाट आलियाउपरि तुमचा मुलाहिजा करणार नाहीं. गनीमाचे चाकर, गनीम जालेस, ऐसें जाणून बरा नतीजा तुह्मास पावेल. ताकीद असे. रवाना छ २ जिल्काद.

---

[ ३२ ] श्री. ३१ मे १६७९.

मा। अनाम शामजी आवजी हवालदार व कारकून तर्फ जाळगाऊ मालूम दानद. सुा सीत सबैन अलफ. सूर्याजी ढुंढुसकर, जुमला हसम

पावलोक, वस्ती मौजे पाळवर तर्फ मजकूर, याच्या चाकराची बाईल किल्ले रायगडास मजुरीस खपावया इमारतीकडे आली होती. ऐसियासी तिणें कांहीं बदमल इमारतीस मजुरी करित असतां केला होता. ऐसियासी, नरहरी बाबाजी तर्फदार तर्फ मजकूर यासी हे हकीकत कळलि-यावरी ते बाइकोपासून सत्तावन घ्यावे ये गोष्टीचे तसवीस लाऊन, सूर्याजी दुंदुसकर याचे घरीं मोकळदार बैसविले कीं सत्तावन देणें. ह्मणून तर्फ-दार मारें तसवीस लाविली आहे ह्मणून हुजूर कळों आलें. तरी ज्याचा चाकर तोच येथें चाकराचा धनी आहे. जे काय हकीकत असेल ते हुजूर लेहून पाठवणें. त्याची विल्हे हुजूर होईल. तुह्मीं सूर्याजी दुंदु-सकर याचे घरीचे मोकळदार उठवणें, आणि सूर्याजी मजकुरास तेविशी तोशिस न लावणें. हें खत, कागद कुल हकीकत हुजूर लेहून पाठ-वणें. छ १६ रबिलोवल. मोर्तब सूद.

---

[ ३३ ] श्री. ३० जुलै १६७७.

श्री
शिवचरणीं तत्पर
त्र्यंबकसुत मोरेश्वर

स्वस्ति श्री राज्याभिषेक शक ४ पिंगलनाम संवत्सरे श्रावण शुद्ध एकादशी इंदुवासरे क्षत्रियकुलावतंस श्रीराजा शिव छत्रपति यांणीं नागोजी भोसले मुद्राधारी कोट उटळूर यांसी आज्ञा केली ऐसी जेः— स्वामी तुह्मावरी कृपाळू होऊन कोटमजकुरीचा हवाला देऊन सरंजामी केली व एक मराठी नाईकवाडीहि देऊन सरंजामी केली. येणेंप्रमाणें वितपशिलः—

| | |
|---|---|
| खासा तुह्मी नागोजी भोसले हवालदार 'कोटमजकूर सालीना तैनात वराह पादशाहीं १५० | कृष्णाजी सुरेवंशी पेशजी चाकर रा। हालीं कोटमजकुरीची सरनोबती देऊन तैनात सालीना होन पा। १०० |
| एक खासा चाकर दोन एकूण १२५ २५ | —ला—०— |

एकूण असामी ३ तीन रास. यांसी तैनात वराह पा। साळीना होन अडीचशे दो रास. व दर माहे तैनात वराह पा। तीन रास. इा। पैवस्तगीपासून वजा वाटा उरवेषी वजा करून बाकी बेरीज माहे दर माहे आदा करीत जाणें. व याखेरीज तुह्मांस हुजूर पोता वाटणी पावली त्रितपशीलः—

खासा हवाळदार वाटणी बेरीज
होन कावेरी फुलम
पाक होन चंजावरी
११ २०

सोनजी रामाजी चव्हाण नाईकवाडी वाटणी माहे दोनीं
एकूण कावेरी पाक
होन ६

कृष्णाजी सुरेवंशी सरनोबत यासी वाटणी कावेरपाक वराही ८
लग ०

एकूण वराह कावेरीपाकी पंचवीस रास व फुलग वीस रास पावले असेत. बाकी वजा करणें. मजुरा असे. लेखनसीमा.

मर्यादेयं
विराजते

---

[ ३४ ] श्री. २६ जुलै १६७७.

स्वस्ति श्री राज्याभिषेक शक ४ पिंगळ संवत्सरे श्रावण शुद्ध ७ सप्तमी गुरुवासरे क्षत्रियकुळावतंस श्रीराजा शिव छत्रपति यांणीं यशवंतराऊ शाहाजी कदम नामजाद कोट वाळगुडानूर यासी आज्ञा केली ऐसी जे:— कोट मजकुरीं हसमें नामजाद आहे व एक जिन्नसही शिल्लक थोडाबहुत आहे. ऐसियासी, त्याच्या लिहिणियासी लिहिणार पाहिजे ह्मणून. त्यावरी तिमाजी नारायण यासी जमा करून पाठविलें आहे. तैनात दरमाहे होन प्रा। ३ तीन रास केले असेत. इा। प्रोपासून वजावाटा उरवेसीप्रो। वजा करून बाकी बेरीज माहे दर माहे आदा करीत जाणें, आणि

त्याचे हातें कूटमजकुरीं लिहिणियाचें काम घेत जाणें. कागद बात्र लिहिणियामाफक देत जाणें. मजुरा असे. लेखनसीमा.

श्रीशिवचरणीं तत्पर त्र्यंबकसुत मोरेश्वर.　　　　मर्यादेयं विराजते.

---

[ ३९ ]　　　　श्री.　　　　३० जुलै १६७७.

*स्वस्ति श्री राज्याभिषेक शक ४ पिंगल नाम संवत्सरे श्रावण शुद्ध* एकादशी इंदुवासरे क्षत्रियकुलावतंस श्रीराजा शिवछत्रपति यांणीं नागोजी भोसले मुद्राधारी कोट उटळूर यासी आज्ञा केली ऐसी जे:—कोट मजकुरास तटसरनोवत व बारगीर पाहिजे ह्मणून. त्याजवरून येणेप्रमाणें सरंजामी करून पाठविले बितपशील:—

सरनोवत तटाचे

| असामी | तैनात होन पा | वा कावेरी-पाक होन. |
|---|---|---|---|
| हरिदास बिन केदार दास, तटसरनोवत. | १ | ४ | ८ |
| एसाजी लखमाजी जाधव, सरनोवत. | १ | ४ | ८ |
| माणकोजी पवार, तटसरनोवत. | १ | ४ | ८ |
| अनाजी बाळके, सरनोवत. | १ | ४ | ८ |
| | ४ | १६ | ३२ |

लग ०

बारगीर शिपाई लोक

| असामी | तैनात | वा कावेरी-पाकी होन. |
|---|---|---|---|
| कानोजी जाऊजी सांवत, बारगीर. | १ | ३ | ६ |
| नरसाजी हणवंतराऊ, महारावर. | १ | ३ | ६ |
| चाहूजी कान्होजी गायकवाड. | १ | ३ | ६ |
| रायाजी बनाजी जाधव. | १ | ३ | ६ |
| पोसजी तुकाजी जाधव. | १ | ३ | ६ |
| तुकाजी संताजी सोमवंशी. | १ | ३ | ६ |
| तुकाजी पवार. | १ | ३ | ६ |
| | ७ | २१ | ४२ |

एकूण सरनोबत ४ चार व बारगीर सात. यांसी तैनात वराही सत-तीस पा। रास व वाटणी हुजूर पोतापैकीं होन कावेरीपाक होन ७४ चवराहत्तरी रास पावले असेत. ही वजा करणें. मजुरा असे. आणि इा पैवस्तीपासून वजा वाटाऊ रीतीप्रा। वजा करून बाकी बेरीज माहे दर माहे आदा करीत जाणें. मजुरा असे. लेखनसीमा.

मर्यादेयं
विराजते.

सुरू सूद बार.

---

[ ३६ ] श्री. ३० जुलै १६७७.

स्वस्ति श्री राज्याभिषेक शक ४ पिंगल नाम संवत्सरे श्रावण शुद्ध एकादशी इंदुवासरे क्षत्रियकुलावतंस श्रीराजा शिवछत्रपती याणीं केदारजी जाधव बिन फिरंगोजी हवालदार इमारत कोट उटकूर यासी आज्ञा केली ऐसी जे:—स्वामी कृपाळू होऊन इमारत मजकुरीचा तुज हवाला देऊन सरंजामी करून व मजमूदार देऊन ठेविलें. तैनात ता।

खासा तैनात साळीना होन १२५.

यासी चाकर रा। प्रा। चालवणें व हुजूर पोतापैकीं वा। नून पा। होन कावेरीपाकी १०.

लक्ष्माजी मादरस मजमूदार, इमारत मजकूर, तैनात साळीना होन ३६.

यासी वा। हुजूर पोतापैकीं होन कावेरी पाक होन ३.

एकूण असामी २ यासी तैनात होन साळीना एकशे एकसष्टी रास केले असेत. इमारत काम चाळते होईल ते दिवसापासून घेत जाणें. व सदहू होन तेरा बाकी वजा करणें. व तैनातेस वजा वाटा उचिती-प्रमाणें वजा करून बाकी बेरीज घेत जाणें. मजुरा असे. लेखनसीमा.

मर्यादेयं
विराजते.

सुरू सूद बार.

श्री
शिवचरणीं तत्पर
त्र्यंबक-सुत मोरेश्वर.

---

[ ३७ ]

हकीकत अदकार तर्फे सोनवळ वतन राजश्री रामचंद्र नीळकंठ भारद्वाज गोत्री यांचे मूळपुरुष:—

निळो नारायण
१

त्याचा पुत्र नारोपंत
२

नारोपंताचा पुत्र
सोनाजीपंत
३

सोनाजीपंताचा पुत्र
निळोपंत
४

निळोपंताचे पुत्र
राजश्री रामचंद्रपंत
५

करीना वतनाचा. बेदरीं पातशाहा होते. तेथें निळोपंत कयाळनिशी करीत होते. त्यांस पातशाहांनीं तर्फेमजकूरची ठाणेदारी व मजमू दिल्ही. महालास येऊन वरीस दोन वरसें अंमल केला. त्यास, तर्फेमजकूरचा अदकारी महाद परभू होता. त्यावर कसाळा पडला. याकरितां वतन विकावया गेला. मग कोणी न घेत. तेव्हां निळोपंतीं शालिवाहन शके १४४९ चवदाशे पंचेचाळिसावे शकीं नख्त टके १३००० तेरा हजार देऊन वतन खरेदी केलें. वतनाचा अंमल चालविला. त्यास, मागती हुजूर मोसबा घेऊन येणें ह्मणून हुजरून हुकूम आला. त्यास, येतेसमयीं कळोपंत बिन नागोजीपंत भारद्वाज गोत्री ह्मणून ब्राह्मण होता. बरा, लिहिणार ह्मणोन यारेदी सांगून ठेविला होता. त्यास, आपण हुजूर गेले ते समयीं वतनाची देखरेख यासी सांगितली. त्याचा वंश पुरूष:—

कळोपंत बिन नागोजीपंत
यारेदी ठेविला.
१

कळोपंताचा पुत्र
सोमाजीपंत.
२

| | |
|---|---|
| सोमाजीपंताचा पुत्र मुरारी. | मुरारीस संतान नाहीं. मग सोमाजी कळो याचा |
| ३ | भाऊ गोविंद होता त्याचा पुत्र |
| रामाजीचा लेक | रामाजी गोविंद, परंतु पिढी १. |
| मुरारपंत | मुरारीचा लेक भानजी |
| ४ | ५ |

कळोपंत दफ्तरदार आपले वोढीचा ह्मणोन वतनाची देखरेख सांगितली, आणि निळोपंत हुजूर गेले. त्यांस तेथें मोसबियास दोन वर्षे लागलीं. मोसबा वारून वतनावरी यावें तों पातशाहा मेहेरबान होऊन आणिकी ठाणेदारी सांगितली. तिकडे सात आठ वर्षे राहिले. तेथून पुन्हां वतनावरी आले. येते समयीं महालची सरखोती दिवाणातून करून आले, आणि अंमल चालवूं लागले. त्यास, कळोपंत यारिदी याणें दिवाणची पाठी करून निळोपंतासी कलह मांडिला. याउपारि कितेका दिवसांनीं मुरार सोमाजी कळोपंताचा नातू याणें मारेकरी घेऊन येऊन मौजे भादाणें येथें निळोपंत होते त्यांस व बायका, मुलें, चाकर, बटिकीं देखील निळोपंत व त्यांचे पुत्र नारोपंत मारिले. त्यांत उरतां नारोपंताची स्त्री उरली. ते तान्हे मुल घेऊन, सोनाजीपंत आपले आजे, पळोन घेऊन पुणियासी आली. त्यावर सोनाजीपंत परवरदा जाले. परंतु वतनावर गेले नाहींत. आपले तीर्थरूप राजश्री छत्रपतीची सेवा करूं लागले. यामुळें वतनावर न गेले, परंतु वृत्तीचा कथळा मांडिलाच होता. त्यास भानजी मुरारीचा आपला कथळा मांडला आहे. परंतु त्याणें फौजदाराची व काकाजीची पाठी केली. तथापि आपला मुताळीक जुनदअली सुभा कल्याणी आहे त्याजवळी उभे राहून वेव्हार सांगितला. अवघे गोत सुभा मेळवून, करीना मनास आणवून, आमचे वतनसें खरें जाहालें, गोही साक्षीनसी. यांसी इनाम गांव पूर्वापार आहेत.

| मौजे भादाणें. | मौजे कुकसें. |
|---|---|
| १ | १ |

याखेरीज हक्क गांव व इनाम व मानपान पेसजीप्रमाणें. येविसी पत्रें करून द्यावीं.

| आपल्या नांवें फर्मान | सुम्यास पत्र |
| --- | --- |
| १ | १ |

कल्याणच्या फौजदारास पत्र
१

---

[ ३८ ]

## यादी पत्रें सुमारे ८.

कित्ता:—

२. राजश्री खेमसांवत सरदेसाई, कुडाळ, यांसी, शिवाजी राजे यांचीं.

१. संताजी घोरपडे यांचें पत्र.

---

३

मातुःश्री ताराबाई यांचें पत्र १.

राजश्री चंद्रसेन जाधवराव यांची चिठ्ठी १.

राजश्री परशरामपंत यांचीं पत्रें २, बंद ३:—

राजश्री शिवाजी राजे यांचें पत्र राजश्री जयसिंग जाधवराऊ यांसी पत्र १.

---

[ ३९ ]

श्री राजाराम रघुवीर प्रसन्न. कदीम पद्धत महाराज सिंहासनारूढ जालेयावर मान विडे व नारळः—

प्रथम विडाः—

| कुलगुरु उपाध्ये. | देव प्रथम. |
| --- | --- |
| पंडितराऊ. | मातापिता. |

जोशीराऊ.
आश्रित.
गोत्रपुरुष.
वडिल मान्यपुरुष.
सोइरे लोक.

ग्रामदेवता.
मुताळीक.
फडणीस.
चिटणीस.
कारकून.
सभासद.
सबनीस.

## राजनीति पद्धत.

प्रधान प्रथम विडा.
मजमदार त्याजमार्गे.
सुरनिवीस.
वाकेनीस मंत्री.
न्यायाधीश.

दबीर.
सेनापती.
सेनाखासखेळसरदार.
मोहतापी बारगीर.
पागा शिलेदार.
हत्ती महाल.

अठरा कारखाने.
हवालदार.
म्यानबंक.
दौलतबंक
वाडिया मूळ.
हुद्देकरी.
सराफखाना.

---

साठी.
शंभर.
चाळीस.
खासखेळ.

## अलीकडे नवे जाले.

प्रतिनिधी.
राजाज्ञा.
ममलकतमदार.
हिमतबहादर.
सरखेल.

देवडी.
बक्षी.
दिवाण.

---

श्रीमहालक्ष्म्यैनमः

[४०] श्रीत्र्यंबकेश्वर. १६ मार्च १६८६.

॥ श्रीसकलगुणालंकरण अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य राजश्री देशमुख देशपांडे व ज्योतिषी व उपाध्ये व समस्त वेदमूर्ती, वस्ती कसबे हरसूल, प्रांत अवरंगाबाद व समस्त महाराष्ट्र कोंकण देशस्थ विद्वद्वैदिक गृहस्थ गोसावी यांसी :—

पौष्य उपाध्ये व मोरेश्वर पंडितराव आशीर्वाद अनुक्रमें नमस्कार. उपरि. गंगाधर रंगनाथ कुळकरणी कसबे हरसूळ हा ब्राह्मण मोंगलापाशीं सेवेसी होता. कित्येक दिवस चाकरी करीत असतां मोंगलीं यावरी बलात्कार करून बाटविला. भ्रष्ट करून यास तीन महिने बंदखानीं निर्बंध ठेविला होता. तेथें यवनासीं अन्नोदकसंसर्ग घडला. त्यानंतर यास भाग्य अडीचसद्दी मनसब देऊन चाकर करून ठेविला. पांच वर्षे चाकरी करीत होता. स्नानसंध्यादिक कर्मे करितां नये, यास्तव राहिले. पांचा वर्षांत अन्नोदकसंसर्ग केला नाहीं. दौलत करीत असतां भाग्याचें सुख टाकून, अंत:करणीं अनुताप मानून, आपले जातीत यावें यास्तव दौलत संपत्ती सर्व टाकून, अनुतापास्तव राजश्री छत्रपती स्वामीपाशीं रायगडास येऊन, एक वर्ष गंगाधर रंगनाथ दरबारीं आपणास प्रायश्चित्त द्या ह्मणऊन सरकारकून व न्यायाधीश व उपाध्ये व दानाध्यक्ष व भलेभले ब्राह्मण व समस्त आपले ज्ञातीस शरण येऊन, प्रायश्चित्त मागत होता. त्याउपरि राजश्री समस्तराजकार्यधुरंधर वर्णाश्रमधर्मप्रतिपालक राजश्री छंदोगामात्य स्वामी यांस सर्व वर्तमान विदित जालें. त्यानंतर त्यांहीं ब्राह्मणाचे कष्ट व अनुताप बहुत देखोनी राजश्री छत्रपती स्वामीस याचा वृत्तांत विदित केला. छत्रपती कृपाळू होऊन प्रायश्चित्त द्यावयासी आज्ञा दिल्ही. त्याउपरि आह्मीं राजश्री छंदोगामात्य यांचे समेसी समस्त विद्वद्वैदिक ब्राह्मणांचे संमतीनें मिताक्षरादि निबंध पाहोन, प्रायश्चित्त निर्वाह करून, गंगाधर रंगनाथ यासी प्रायश्चित्त संकल्प सांगोन, श्रीयात्रेस पाठविला. तेथें श्रीगिरिप्रदक्षिणा तीनशें साठी व यात्रा दोनी

इतुकें चतुर्विंशत्यब्द प्रायश्चित्त पूर्वोत्तरांगसहित गंगाधरें केलें. यथाशास्त्र प्रायश्चित्त विध्युक्त प्रकारें केलें. श्रीक्षेत्रीं समस्त धर्माधिकारी आदिकरून ब्राह्मणसंगतीनें तीर्थविधि करून, ब्राह्मणभोजन करून, अन्नप्रसादपंक्तीस घेतला. शुद्धिभोजनें व प्रायश्चित्तप्रदक्षणा यथाविधि केला, ह्मणऊन श्रीक्षेत्रींच्या ब्राह्मणांचीं पत्रें व देशाधिकारी यांचीं पत्रें घेऊन आह्मापाशीं आला. पत्रें आह्मासी दिलीं. उपरि यथाविधि प्रायश्चित्त पूर्वोत्तरांगसहित निर्गमिलें. ऐसें वर्तमान राजश्री छंदोगामात्य गोसावी यांसी विदित केलें. त्यांहीं पत्रें मनास आणून समस्त कारकून व न्यायाधीश यांच्या अनुमतें आह्मास आज्ञा केली जे गंगाधर रंगनाथ यास आपले पंक्तीस भोजन देऊन शुद्धिपत्र देणें ह्मणऊन. त्यावरून आह्मी आपले पंक्तीस भोजन देऊन यासी शुद्धिपत्र दिलें. हा ब्राह्मण शुद्ध जाला, संव्यवहार्य जाहाला. याउपरि यासी तुह्मी अन्नोदकादि व्यवहार यथापूर्व करीत जाणें. जो कोण्ही याचा ब्राह्मण्याविषयीं संदेह मानील तो देवब्राह्मणद्रोही महापातकी जाणिजे. शके १६०८ सोळा शतें आठ, क्षय संवत्सर, चैत्र शुद्ध द्वितीया, भौमवार. हे विज्ञप्ती. मोर्तब.

मोरेश्वर पंडितराय.
दानाध्यक्ष.
कविराज महेसदास.
संमतं केशव पंडितस्य.
नरसिंह वैद्य.
येसभट्ट थटे पुणेकर.
गणेश भट्ट.
शेषाचार्य वायींकर.
भीमाचार्य वायींकर.
शंकर भट्ट हुकेरी.

१ राजश्री नारो रघुनाथ अमात्य मुद्रासहित.
१ राजश्री गोपाळ अनंत मुद्रासहित.
१ राजश्री केसो त्रिमळ पिंगळे.
१ राजश्री विकटराऊ हेजीब.
१ हरजी महाडीक.
१ राजश्री यादव नामदेऊ.
१ राजश्री कवीकलश छंदोगामात्य शिक्केसहित.

रामचंद्र भट्ट हुकेरी.
सोमनाथ भट्ट.
दशग्रंथी संगमेश्वरकर.
अंतोपाध्ये धर्माधिकारी संगमेश्वर.
बाल ज्योतिषी.
कृष्णाचार्य अष्टपुत्रे.

१ राजश्री गंगाधर मोरेश्वर प्रधान मुद्रेसहित.
१ राजश्री प्रल्हाद निराजी न्यायाधीश मुद्रासहित.
१ राजश्री रघुनाथ कोर्डे.

---

[ ४१ ] श्रीः ११ मे १६९०.

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके २९ प्रमोदिनाम संवत्सरे वैशाख शुद्ध चतुर्दशी भौमवासरे क्षत्रियकुलावतंस श्री राजाराम छत्रपति याणीं समस्त राजकार्यधुरंधर विश्वासनिधी राजमान्य राजश्री नारोपंडित यांस आज्ञा केली ऐसी जे :— तुह्मीं स्वामीच्या दर्शनाकारणें येत आहां. प्रस्तुत प्रभावळीस आलेस ह्मणोन कळों आलें. ऐसियास तुह्मीं स्वामीचे दर्शनास आलेस उत्तम गोष्टी केली. तुमची स्वामीची भेटी सुमुहुर्तें व्हावी लागते. त्यास, उदईक दिनशुद्धी नाहीं आणि स्वामीही राजापुरास जाणेंकारणें प्रतिपदेस स्वार होऊन येत आहेत. तरी तुह्मीं तेथेंच राहणें. स्वामीही येतील. तुमची व स्वामीची भेटी प्रभावळीसच होईल. तुह्मीं यावयाची त्वरा न करणें. बहुत लिहिणें तरी तुह्मीं सुज्ञ असा.

मर्यादेयं
विराजते.

---

[ ४२ ] श्रीभवानीशंकर. ४ अक्टोबर १६९१.

नेमपत्र हजीर मजालसीयानी, मुकाम किल्ले सातारा, सुा इसने तिसैन अल्फ. बतेरीख छ २१ माहे मोहोरम, आश्विन वदि अष्टमी रविवासरे प्रजापति नाम संछरे बेहुजूर शके १६१३ प्रजापति नाम छंवछरे कार्तिक सुध त्रयोदशी मंदवार :—

राजश्री संताजी घोरपडे सेनापति रा। मौजे जाधव नाहवी सा। कोरेगाऊ प्रा। वाई.

०श्री
राजाराम भूपाल-
भक्तसेनापतेः शुभा॥
संताजी घोरपडे तस्य
मुद्रा भाति जय
प्रदा॥

राजश्री धनाजी जाधवराऊ हफ्त हजारी मोकदम मौजे माजगाऊ व दरोगा ता। सातारा.

श्रीसीव-
चरणीं तत्पर
धनाजी जाधव
किंकर.

राजश्री हंबीरराऊ मोहिते देसमुख पा। खेड.

अमृतराऊ बीन तुकोराम निंबाळकर देसमुख पा। फलटण का। खानापूर व का। सारवडे.

अमृतराव निं
बाळकर। सी-
क्का खानापूर. नांगर.

मल्हार दादाजी सरसुभेदार प्रा। मोगलाई, कुलकर्णी मौजे गुपारडी पा। सुपे बारामती.

श्रीसीवचरणी
तत्पर मल्हार दादाजी
सुभेदार.

अवधूत तुबाजी सरसुभेदार प्रा। भागानगर देसकुलकर्णी प्रा। माण.

श्री
अवधूतराव
तुबाजी

मानसिंग मोरे हफ्त हजारी देसमुख प्रा। वरुण.

श्रीराजारामा-
च्छ्यभूमींद्रस्यैषाव
र्धितसंपदा॥ श्रीमोरे
मानसिंहस्य मुद्रा भाति
जयप्रदा.

विठल गोपाळ सुभेदार
प्रांत जाउली

० ‿
श्रीगंगेव बु
द्धितीं प्राप्ता जनसा-
गरनंदिनी॥विठ्ठल-
स्य महाबुद्धेर्मुद्रा
भद्राय राजते

यमाजी नागनाथ कुळकर्णी
मौजे किणई सा॥ कोरगाऊ प्रा॥ वाई.

त्र्यंबक गोपाळ देशकुळ-
कर्णी पा॥ कुडाळ.

बाळोजी जाधव मोकदम,
मौजे दहीवडी ता॥ मलवडी.
नांगर.

पुंडलीक शामराज चांदकीर
कुळकर्णी पा॥ नीवासे.

जोती गोविंद कुळकर्णी मौजे
पिंपरी पा॥ वाई.

रंगोजी पाटील हवाले मोकदमी
मौजे सिंगणापूर.
नांगर.

सुमानजी मादवळकर हवाल-
दार किल्ले सातारा व मोकदम
मौजे अंधळी पा॥ मलवडी.
श्रीशंभु
चरणीं तत्पर
सुमानजी रागोजी
मादवळकर.

त्र्यंबक गोमाजी सरनौबत
किल्ले सातारा, कुळकर्णी
मौजे चांदे पा॥ नीवासे. १

लक्ष्मण विश्वनाथ सुबेदार
किल्लेहाय प्रांत सातारा.
श्रीशंभु
चरणीं तत्पर लक्ष्मण
विश्वनाथ नीरंतर.

सुभानजी काटकर
सरनोबत किल्लेहाय

श्रीशंभु
चरणीं तत्पर
सुभानजी काटकर.

अंबाजी जाधव पा। मौजे परंचे
पा। पुणें.

जगन्नाथ आनंद कुलकर्णी
का। पेठ नेरळे का। वाजे ता। कोडोली
किल्ले पनाळा.

विठोजी पाटील का।
रहिमतपूर.
नांगर.

हरिराम व माणकोराम
कुळकर्णी मौजे पाली
परगणे कऱ्हाड.

मोरेश्वरभट्ट कुळकर्णी ज्योतिषी
कसबे मसूर. पत्रप्रमाणें साक्ष
असे.

नरसोजी बिन नेताजी
व पदाजी बिन अंबाजी
यादव देसमुख का। अउंद.
नांगर.

कृष्णाजी बिन बाजी पटेल घाडिगे
मोकदम मौजे कळंबी का। अउंद.
नांगर.

तिमाजी बिन नरसोजी
जाधव व बहिरजी बिन लख-
मोजी जाधव पाटील मोकदम
का। उंबरज पा। कऱ्हाड.
नांगर.

मेरु अनंत भोळे जोशी व कुळ-
कर्णी मौजे पुसेसावळी, मौजे क-
ळंबी, व मौजे वडील, व मौजे
खिमळी का। अउंद.

कृष्णाजी लिंगो कुलकर्णी
का। उंबरज व मौजे सिवडे,
कुलकर्णी व जोतिषी पा। कऱ्हाड.

बिलाल मऊ.

रताजी पाटील का। कळढोण.

निशाण मऊ.

संकराजी पोवार पाटील मौजे निराड ता। सातारा

नांगर

श्रीसंक-
राजी महा
देव

बांजी भोसले मोकदम मौजे वेळू व मौजे पिंपरी व सुरळी सा। कोरेगाऊ पा। वाई.

नांगर.

साबाजी मोहिते देसमुख का। तळबीड का। वांगी व का। कळदोण.

कृष्णाजी नारायण शाळग्राम पुणेकर कुळकर्णी मौजे तारुळा व कुसुर ता। कोळे सुभा कऱ्हाड.

या विदमानें लेहून दिल्हें नेमपत्र ऐसें जे. राजश्री रामचंद्र नीळकंठ गोसावी यासी कृष्णाजी बुलगो व मल्हारजी बुलगो व गोमाजी बुलगो व बावाजी शिवदेव व रायो शिवदेव व मल्हार शिवदेव देसकुलकर्णी व गावकुलकर्णी व जोतिषी पा। खटाऊ, सु॥ इसने तिसैन अलफ. आपले वडील पुरातन मिरासीदार पिढी दर पिढी खात असतां, दरम्यान कथळा करून विसाजी काशी व विठ्ठल होणाजी अथर्वण यानें कथळा करून कृत्रमी कागदपत्र करून वतनास खलेल कारितो. दोनी चारी वेळा झाडाझाडी करून खोटा ऐसे खळकास वा हकदामशाह यांसी जाहीर असतां लाच देऊन जोरावारी कारितो. आपण बेतकवी, खावयास नाहीं, भाऊ बंद तमाम माणसें दुकाळेनें अर्धली जाहाली; व गनीम मोगल वरजोर ठाणें देऊन पामजकुरीं बैसला. त्यास माहादाजी निंबाळकर याचे कारकीर्दीस आह्मीं पांढरीवरी हजीर जाहालों. हरदोजणांना निवाडा

जाहाला. अथर्वण खोटा जाहीरला, आणि कथळा करितो, ऐसे निर्वाह सर्वांच्या मुखीं जाहाला. कागदपत्र होवे, जमानिता कराव्या, पेस्तर बिलाहरकत न व्हावी, ऐसा तह जाहाला, तो अगदीं टाकून, अथर्वण विजापुरास जाऊन, लाच देऊन, लुस्पत देऊन, अगदींच आह्मास मारावें, नांव कुळीं ध्यावयास नाहीं, ऐसे कागदपत्र करून पागजकुरास आला. आह्मास धरावें ऐसा विचार पुरता केला. तो आह्मास कळला. व माहादाजी निंबाळकरास ही पादशाह याचें तलब रोखा आला. आह्मास कोणाचा असीरा नाहीं. हुजूर पादशाहानजीक जावें तरी आपण बेतकबेदार, आणि अथर्वणांनीं हुजूर भाविलें जे, राजश्री छत्रपती स्वामीचे दरबारीं मल्हार बुळगो व बावाजी सीवदेव यांस पंचहजारिया सांगितल्या आहेती, परगणे मजकुरावरी चाली करितातीं, वतन आपलें बळेंच ह्मणताती. ऐसे किताका रवेसीनें हुजूर गोष्टी भाविल्या आहेती. याकरितां आमचे पोटीं धास्ती पडिली. व गाठोळीच्या बळें व गवसाळा करून, हुजूर पादशाह यानजीक जाऊन आपलें वर्तमान वतनाचें साकल्य जाहीर करावें तरी आपण गैरगहसरदार. याकरितां गनीमाचे दिवाणांत जावेना. मग, वतन अथर्वणमजकूर जोरीनें खातो, गोतांत न ये, गनीमाची पाठीवर जोर केली, आपणास कोठें टिको देईनातसारखें जाहालें. मग आपण डोईत धुळीं घालून स्वामीपाशीं आलों. ऐसियांस, आपली व स्वामीची भेटी न व्हे, आपण निराश्रि ( त ), असीरा नाहीं, ऐसें चिंतन करीत दरबारीं बैसलों होतों. तों काशीराम कुळकर्णी, मौजे कांभेरीं, किल्ले परळी यानीं आपणास विचारिलें जे, तुह्मी कोणे गोष्टीअस्तव विशाळगडास का आला? मग आपण त्यास बोलिलों जे, आपलें वतन अथर्वण बळें खातातीं, भाऊबंद बेतकबी पडले, दावा दद न चले, यास्तव आपले वतनास व आपल्या जीवास कोणी तऱ्ही धणी कासीपतो जाहालियावेगळे जीव वाचत नाहीं, वडिलाचें वतन सुटेना, ऐसा विचार आपला आहे, याकरितां दरबारास आलों. ऐसियास, काशीराम आपणास बोलिले जे, तुह्मीं भेऊ नका, परमेश्वर बरेंच करील, आजीउदियांत राजश्री पंत अमात्य स्वामीची भेटी करून देऊन, मग

तुमचा उदित काळ असल तरी बरेच होईल. ऐसे बोलोन ते आपले बिराडास गेले. आपण ही बिराडास गेलों. दुसरे दिवशीं काशीराम यानीं स्वामी ( स ) विदित केलें. आपल्या वतनाचा करीना सांगितला. त्यावरून स्वामीनें आपणास हुजूर बोलाविलें, वर्तमान साकल्य विचारिलें. त्यास, आपण बुनादीपासून आपलें वतनाचें वर्तमान व कागदपत्र तमाम दाखविलें. त्यावरून राजश्री पंतीं व सभानाईकीं मनास आणून हा वतनदार खरा, परंतु बेतकवी, यासी इर कोणाचा आधार जाहालियावेगळा हा सावरेना, ऐसें सभानाईक बोलिले. त्यास आपण बोलिलों जे, आपले पदरीं एका दिवसाचें खावयास नाहीं, उगेंच मरावें. याकरितां वडिलाचे कागदपत्र आपणापासी आहेती ते घेऊन,' दरबारास जाऊन, कोण्ही तऱ्ही वतनास वा आपणास धणी जाहाला तरी वाचोन. नाहीं तरी आपले प्रालब्धीं असेल तें होईल. ऐसें आपलें बोलणें सभानाइकीं ऐकिलें. मग सभानाईक बोलिले जेः—वतनदार खरा, कोणे गोष्टीस खता नाहीं. मग सभानाईक व कासीराम कुलकर्णी, मौजे कांभेरी, यांनीं विचार करून राजश्री रामचंद्र नीळकंठ यांसी बोलिले जे, स्वामीनें या गोष्टीं हें मन घालून निमे देसकुळकरण व गांवकुळकरण व ज्योतिष ऐसें द्यावें. ऐसा तह जाहाला. गांवकुळकर्ण देहाय १८ पैकीं वजाः—

| रामाजी अनंत व नरहरी अनंत व गोपाळ अनंत ठकार वशिष्ठ गोत्री यांसी गावकुळकर्ण व ज्योतिष, मौजे दरुण, पा। मजकूर. | कासीराम अंगापूरकर खुर्द कुळकर्णी, मौजे कांभेरी, किल्ले परळी, यासीं गांवकुळकर्ण व ज्योतिष, मौजे विसापूर, पा। मजकूर. |
|---|---|

बाकी गावकुळकर्णें व ज्योतिषें खेरीज जोतीष मौजा कुरोळी देहाय १६ नितपशीलः—

| | | |
|---|---|---|
| १ मौजे नेर. | १ मौजे नायगाव. | १ मौजे अंभेरी. |
| १ मौजे कोकराळ. | १ मौजे रागेश्वर. | १ मौजे दरजाई. |
| १ मौजे पळसगाऊ. | १ मौजे येल्लनारवाडी. | १ मौजे उंबरमळई. |

१ मौजे दव्हवडी　　१ मौजे वनपुरी.　　१ मौजे कुरोळी खेरीज ज्योतिष.
१ मौजे पुसेगाऊ.　　१ मौजे कोट उर्वी.　　१ मौजे भोसरे.
१ मौजे वडूर.

एकून देहाय १६; गांवकुळकर्णे व ज्योतिषें पंधरा व देशकुळकर्ण पा। मजकूर; हे निमे आपले संतोषें देतों. आपली पाठी व साहेता पुरवावी. जे जे वेळेस जैसा प्रसंग पडेल तैसा आपण जीवानसी उभा. आणि स्वामीनें सर्वस्वे वित्तदतेसी आपली पाठी पुरवावी. ऐसें कृष्णाजी वुलगो, व मल्हार वुलगो, व गोमाजी वुलगो, व बावाजी शिवदेव, व रात्रो शिवदेव, व मल्हार शिवदेव व समस्त पांच पोर ऋग्वेदी बोलिले. हे गोष्टीस राजश्री रामचंद्र नीळकंठ यानीं मान्य केलें जे, तुह्मांस पांच पोर देशकुळकर्णी व गांवकुळकर्णी व ज्योतिषी ऋग्वेदी, पा। मजकूर, हे आपण पदरीं घेतले, आजीपासून हे आपले भाऊ, यांनीं व आपण अथर्वण मजकूर देवमुखें व गोतमुखें व दामशाही मिराशीदार यांच्या विद्यमानें मारून काहाडावे, सदर्हू निमें वतन खावें, वडीलपण कृष्णाजी वुलगो व मल्हार वुलगो व बावाजी शिवदेव, व रात्रो शिवदेव यांसीं आधीं तश्रीफ व पानें, त्यामागें रामचंद्र नीळकंठ यांनीं घ्यावी. बाजे हक, लाजिमा, सेव, धार व राबिता माहार दो ठायीं घ्यावें. हक जुने व नवे जें उत्पन्न होईल तें दो ठायीं खावें. यासी जो कोण्ही चुकेल त्यास श्री कृष्णवेणी साक्ष व वडिलाचे आण असे; व मात्रागमनाचें पाप असे; व काशीस गाईब्राह्मणवध केलियाचें पाप असे. हे नेमपत्र सही.

---

[ ४२ ]　　　　श्री.　　　　१२ मे १६९२.

० ◡

श्री राजाराम नरपति
हर्षनिदान ॥ मोरेश्वरसुत
नीळकंठ मुख्य प्रधान.

श्री नृहरि-
प्रीत्या मुद्रा नीराजि
जन्मन: ॥ राजराम-
प्रतिनिधे: प्रल्हादस्य
विराजते.

स्वस्ति श्री राज्याभिषेक शक १८, अंगिरा नाम संवत्सर, ज्येष्ठ शुा सप्तमी, गुरुवासर, क्षत्रियकुलावतंस श्री राजाराम छत्रपति यांणीं जाऊळकर व देरेकर व मावळे लोकानी व कासुर्डे व गोळे व समस्त लोकांनी पदाती यांसीं आज्ञा केली ऐसी जेः—पूर्वी कैलासवासी स्वामींचे वेळेस तुह्मीं लोकीं कष्ट मेहनत करून थोर थोर कामें करून दिल्हीं आहेत. सांप्रत रायगड हस्तगत करून घेणें हें कार्य बहुतच थोर आहे. येविसीं राजश्री रामचंद्र पंडित अमात्य यांणीं तुह्मांस सांगितलें आहे, त्यावरून तुह्मीं गड हस्तगत करून घ्यावयाच्या यत्नांत आहां. सांप्रत स्वामीनीं राजश्री आबाजी सोनदेव यांसी पाठविलें आहे. रायगड हस्तगत करून घ्यावयाची आज्ञा त्यास केली आहे. हे जाऊन राजकारण जें करावयाचें तसें करितील. तरी तुह्मीं कुळ लोक अनुकूल होऊन रायगडाची हरी करणें. सक्ती करून तें स्थळ हस्तगत करून फतेचें वर्तमान स्वामीस लिहिणें. ह्मणजे स्वामी तुमचें विशेष ऊर्जित करितील. तुह्मास देण्याघेण्याचा तहरह जो करणें तो मशारनिले करितील. त्यास गड हस्तगत झाला ह्मणजे स्वामी तेणेंचप्रमाणें चालवितील. आपले दिलासे असों देऊन एवढें कार्य अविलंबेंकरून स्वामीस संतोषी करणेंविसीं राजश्री रामचंद्रपंतास लिहिलें आहे. तेही जे बेगमी करावयाची ती करितील. जाणिजे. निदेश समक्ष.

मर्यादेयं
विराजते.
रुजू

सुरु सुद बार.

---

[ ४४ ] श्री. २९ मे १६९२.

छ मा। अनाम यादो शिवदेऊ नाडगौडे ता। खानापूर याती रामचंद्र नीळकंठ अमात्य सुा। आर्बा तिसैन अलफ. नाडगौडकी ता। मजकूर बा। सेरणी होन पा। पांचशे पैकीं बद्दल देणें ऐवज सुभा राजश्री संताजी घोरपडे सेनापती यांकडे होन पा। ३०० तीनशें तसर देविले असेत.

आदा करणें. सदर्हू ऐवज कर्नाटकचे रवानगीस देविला असे. विलाकुसूर पावणें. उजूर न करणें. जाणिजे. छ १० शौवल. निदेश समक्ष.

लेखनसीमा
समुल्लसति

---

[ ४९ ] श्री. ४ आगस्ट १६९३.

० ‿

श्रीमच्छत्रपतेः शंभोः
शासनं शासतः सदा ।
अनंतसूनो रामस्य चिरं
मुद्रा विराजते ॥

अज् सरसुभा राजश्री रामाजी अनंत सरसुभेदार व कारकून सुभा प्रा। राजापूर ताहा कमावीसदार व कुळकर्णी व गांवकर व रयानीं मौजे त्रिंबक ता। साळशी सुहुरसन अर्बा तिसैन व अलफ. राजश्री छत्रपति स्वामींचें आज्ञापत्र, छ २९ साबान, पै॥ छ २२ जिल्हेज, सादर जाहालें. तेथें आज्ञा कीं:— ता। साळशी या माहालीची सरदेशमुखी पूर्वीं अदल-शाहानें जानतराव यासी वतन दिल्हें होतें. परंतु भोगवटा जाहाला नाहीं. वतन दिवाणांत अमानतच आहे. हें वतन राजश्री रामचंद्र नीलकंठ यास अजरामऱ्हामत वतन करून दिल्हें असे. साळशी महालीच्या सरदेशमुखीचें वतन यांचे सांभाळीं करून यांस हक्कलवाजिमा इनाम मौजे चिंदर व मौजे त्रिंबक देह २ दोन कुलबाब कुलकानू चालवावयाची आज्ञा केली असे. तरी येणेंप्रा। हक्कलाजिमा इनाम यांस यांचे पुत्रपौत्रादिवंशपरंपरेनें चालवणें. ह्मणून आज्ञा. त्यावरून मानिलेस ता। मारची सरदेश-मुखी वतन स्वाधीन करून वतनास हक्कलवाजिमा व इनाम चिंदर व मौजे त्रिंबक उत्रळ केलें आहे. तरी सदर्हू सरदेशमुखीच्या कार्यभागास मानु-यात्री रा. अंताजी जनार्दन यास मुतालिकी देऊन पाठविले आहेत. याचे

आज्ञेंत राहोन मौजे मजकूरचा वसूलवासूल कुलबाब कुलकानू समेत मानिलेकडे देत जाणें. छ २२ जिल्हेज. मोर्तब सूद.

विलसति
लेखनावधि
मुद्रा.

---

[ ४६ ] श्री. ८ जानेवारी १६९४.

अखंडितलक्ष्मीअलंकृत राज्यमान्य राजश्री रामचंद्र नीलकंठ देशकुळकर्णी ता। अजिरें गोसावी यांसी :—

छ सेवक खिवजी कानोजी सरदेसाई व कानोजीराऊ सरमोकदम देसाई व रखळोजी कानोजी देसाई व येळोजी तातोजी देसाई व रामजी विठोजी देसाई ता। अजिरें दंडवत विनंति सु॥ अर्बा तिसैन अलफ. ता। मजकूर येथील देशकुळकरण देहें ९७ हें पूर्वी सिद्धाचें होतें. त्याची सेवा विठ शेणवी यांचे वडिलांनीं बहुता प्रकारें केली. त्यावरून सिद्धांनीं कृपाळू होऊन यांचे वडिलासीं देशकुळकरण मिरास दिल्हेवरी त्याचे वडील देशकुळकरण ता। मजकुरींचे पुरातन वतनदार होऊन पीढ दर पीढ मिरासभोग करित आले. पूर्वी यांचे वडिलांचे वेळीं आपणास तगादा लागलें पाहून, मळ शेणवी यांचे वडील मुखवस्ती आगंतुक होता यापासून कर्जपैकीं घेऊन कर्ज फिटेपावेतों देशकुळकरण मिरासपैकीं तिसरें तकसीम गहाण ठेविलें. पैका पावलेवरी सदरहू तकसीम सोडून देणें. त्यांसीं तेहि बहुत दिवस तिसरा वांटा खात आले. गहाण ठेविलेपैकीं एकासीं तीन चार हिस्से पावून गेले. त्यास वतनांशीं संबंध नाहीं. मळ शेणवीचे वडील तिसरे वांटा खातां, मिराशीमधें व्याप करून, वृत्तिसंबंधें साजीस करून, महजर सनदपत्र कांहीं करविलें असतां, स्वगोत्रीं ऐसेहि इलाखा लावूं लागले. ऐशियांस, मळ शेणवी कांहीं विठ शेणवीचे अउलियादिगघील नव्हे. त्याणें जें काय आपले स्वार्थामुळें महजर सनदपत्र केलें असेल तें कुल्ली बातील आहेती. विठ शेणवीचे वडील

वृत्तिभोग करित आले. त्याचे पीढनपीढ विठ शेणवीपावेतों चालिले. विठ शेणव्यास मिराशीमुळें दगा करून जिवें मारिलें. मृत्यु पावला. विठ शेणवीचे पीढनपीढ संतति फार वाढली नाहीं. एकाचें पोटीं एक ऐसेची होत आले. त्यावरी हा मृत्यु पावला. याचें पोटीं लेंकरूं जाहलें नाहीं. निपुत्रिक जाहला. पुढें मिराशीस खावंद कोणी नाहींसें जालें. निपुत्रिकाचें मिरास ते दिवाणाचें. त्यावरी महाराज साहेबासी हें वर्तमान विदित जाहालेवरी साहेत्रीं मेहेरवान होऊन तुह्मांस ता। मजकूरींचें देशकुळकरण शेरणीं माथा ठेऊन अजरामऱ्हामत करून दिल्हें असे. देशकुळकरण ता। मजकूर देहें ९७ सत्त्याण्णव लेंकरांचें लेंकरीं वंशपरंपरा भोग करून सुखरूप असणें. विठ शेणवियाचे कोण्ही गोत्रज अगर वंशज कोण्ही नाहीं, हें सत्य असें. देशकुळकरणाचें हक्क लाजिमा, पानमान, इनामती व इसाफती व बाजेकानूनाती देशकुळकरणाचें असेल तें आपलें चालवून घेणें. हें गोष्टीस आह्मांपासून अन्तर पडणार नाहीं. आपले वृत्ति बराबरी चालविण्यास अंतर होईल तरी यास आपलें वडिलांचें इमान असे. छ २१ जमादिलोवल.

लेख-
न आलं-
कार ॥

---

[ ४७ ] श्री. १६९९.

राजश्री पंत अमात्य स्वामीचे सेवेसीः—

छ सकळगुणालंकरण अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य स्नेहांकित संताजी घोरपडे सेनापती जप्तनमुलूक दंडवत. विनंति. येथील कुशल तो प्रताप स्वामीचा जाणऊन स्वानंदवैभवलेखन केलें पाहिजे. विशेष. स्वामींनीं राजश्री लखोजी बरगे व बाजी शिंदे याजबराबरी कितेक बुद्धिवाद सांगोन पाठविला कीं:—आपली भेट घेतली नाहीं. परस्पर निघोन गेलेत. ह्मणून शब्द लाविला. ऐसियास, स्वामीची आमची क्रिया

ऐसी नाहीं जे स्वामीसी द्वैतभाव धरावा. आह्मीं त्याप्रांतें असतां दहाविसांचे साक्षीनसी ऐकिलें कीं संताजी घोरपडे यास त्याप्रांतें ठेवून राजश्री धनाजी जाधवराऊ यांस पाठवून देणें. ह्मणवून पत्रें राजश्रीस लिहिलीं. त्यावरूनच द्वैतप्रकार दिसून आला. स्वामीचे आज्ञेविरिक्त आह्मीं कांहींच नव्हतों. विश्वासाची जाती ह्मणावी तरी स्वामीचे आमचे शफत तुळशीबेलाचे श्रीवरील आहे. स्वामीचे मांडीवरी आह्मी उसें ठेवून निजावें, आमचे मांडीवरी स्वामींनीं ठेवावें, शरीर मात्र भिन्न, आत्मा एक, ऐसें असतां ही गोष्ट द्वैताची होऊन आली. ह्मणूनच वीतरागें येणें जालें. गत वर्षापासून श्रमाची जाती ह्मणावी तर कागदीं लिहितां पुरवत नाहीं. बरें ! जे गोष्टी जाहाली ते जाहाली. याउपरि तऱ्ही राज्यांत डोहणा न होय तो पदार्थ केला पाहिजे. द्वैतभाव दिसोन आला होता ह्मणऊनच येणें जाहालें होतें. त्यास, राजश्री सेखोजी बरगे व बाजी शिंदे यांजपाशीं स्वमुखें सांगितलें कीं, आपण कांहीं संताजीस ठेवून घेऊन धनाजी जाधवराऊ यास पाठवणें, ऐसें लिहिलें नाहीं. ह्मणऊन शफतपूर्वक सांगितलें. त्यावरून बाजी शिंद्याचे साक्षीनसी मशारनईलेनीं आह्मांस सांगितलें. वरकडहि कितेक भावार्थ व मानाजी मोऱ्याचें वर्तमान व आणिखी स्नेहाचीं उत्तरें सांगोन पाठविलीं. त्यावरून द्वैताची गोष्टी होती ते स्वामींचेच वचनावरून दूर केली. आह्मीं लोकांचे बळें द्वैत धरिलें होतें तें आह्मापासूनच अंतर पडलें. आपणहि त्या गोष्टीचा कांहीं मनांत विकल्प धरिला न पाहिजे. आणखी स्वामींनीं एक शब्द लाविला कीं, राजश्री छत्रपति स्वामीची भेटी जाहाली ते समयीं बहुमान जाहाला, तेव्हां आमचा मान काढिला नाहीं. ह्मणऊन शब्द लाविला. ऐसियासी, राजश्री छत्रपति स्वामीचीं व आमचीं जीं वचनें स्वामीचे सीहुरसीचीं जाहालीं. काय काय चाकरी केली असेल ते एक श्री जाणें. कोणे गोष्टीस अंतर पडिलें नाहीं. आह्मीं ऐसे सेवक नव्हे जे, स्वामींचें स्मरण न करितां आधीं आपला बहुमान घेऊन. याचा पर्याय कागदीं काय ह्मणऊन लिहावा ! भेटी अंतीं कळों येईल. तुह्मीं आपलें स्मरण राजश्रीपाशीं घेतलें नाहीं. परंतु

अल्लीमर्दाखान घेतला ह्मणऊन ऐकिलें. विजयी वस्त्रें पाठविलीं ह्मणऊन लिहिलें. त्यावरून अपूर्व वाटलें! स्वामी वडील. हें यश येतें तें स्वामीचेंच पुण्येकडून येतें. आमचा अभिमान सर्व गोष्टींचा स्वामीस. पूर्वीपासूनहि आह्मास स्वामीनेंच गौरविलें. तेथें वस्त्राचेंच कार्य ह्मणऊन आह्मीं ल्याहावें? पूर्वीपासून अंगीकार आमचा स्वामींनीं केला आणि बंधू ह्मणविलें. तोच सिद्धी पाविला पाहिजे. वरकड विस्तारें ल्याहावें तरी लिहिजेसारखा पदार्थ नाहीं. राजश्री सेखोजी बरगे व बाजी शिंदे मुखवचनें सांगतील तीं वचनें आमचींच ऐसें जाणून, श्रीशिवनाथ देव कृष्णेपाशीं आहे, तेथें आपण आलें पाहिजे. आह्मीं येऊन स्वामीची आमची भेटी होऊन श्रीचे व कृष्णेचे साक्षीनसी बेल तुळशी होतील. मग जो विचार करणें तो केला जाईल. स्वामीवितरिक्त आह्मीं कांहीं नाहीं. जैसी पूर्वी आज्ञेप्रमाणेंच वर्तणूक केली तैसीच करू. कळलें पाहिजे.

श्रीराजारामचरणीं
तत्पर । संताजी
घोरपडे निरंतर.

विलसति
लेखनावधिः

---

[ ४८ ] श्री २ एप्रील १६९७.

राजश्री आबाजी सोनदेव भारद्वाज गोत्री गोसावी यांसी:—

छ अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य सेवक रामचंद्र नीळकंठ अमात्य हुकुमतपन्हा नमस्कार. सुहुरसन सबा तिसैन अलफ. तुह्मीं हुजूर विदित केलें कीं, आपले आजेसासरे पोसो बहिरव यांचें पतक बाजारदरवाजा, कसबे पाटगाउं, येथील वतन होतें. तें त्यांहीं लग्नामध्यें आपणास आंदण धारादत्त दिलें. त्याचीं अर्पण पत्रें आह्मांपाशीं होतीं. त्या पत्रांवरून तेथें जाऊन पतकाची कमावीश करावी तों, धामधूम झाली. त्या प्रसंगांत अनुकूल पडलें नाहीं. याउपरी आपण कर्नाटक प्रांतास गेलों. मार्गीं जातां उपसर्ग झाला. यास्तव पत्रें होतीं तीं गेलीं. कांहींएक दिवस कर्णाटक प्रांतीं

होतों. तेथून राज्य सुगम झालें. राजश्री छत्रपति स्वामीची आज्ञा होऊन या प्रांतास आलों. पतकाची कमाविश करावी तों, राजश्री शामराऊ मुरुंबकर याणीं पतकमजकुरास कोणी खावंद नाहीं; याकरितां आपणास पतकमजकूर वतन करून द्यावें, ऐसा गैरवाका स्वामीस सांगितला. त्यावरून स्वामीनें त्यास सिर्णी होन पा ५० पन्नास रास घेऊन वतन करून दिलें असे. ये गोष्टीस सा, सात वरुषें झालीं. पुरातन आपले आजेसासरे यांचें वतन त्याणीं आपल्या मनोदयें करून दिलें. त्यांचीं पत्रें होतीं तीं गेलीं. परंतु ये गोष्टीतें साक्ष बहुतजण आहेत. आपलें वतन आपलें स्वाधीन करून वतनाची सेवा घेतली पाहिजे. म्हणून. त्यावरून ये गोष्टीची चौकसी करून मनास आणितां, हमशाही वतनदार आहेत, त्यापाशीं ये गोष्टीची गोही साक्ष मनास आणितां, तुमचे आजेसासरे पोसो बहिरव यांणीं आपलें वतन आंदण धारादत्त दिल्हें, हें सत्य जालें. याकरितां बाजारदरवाजा, कसबें पाटगाउं, येथील पतक तुमचें, असें खरेंखुरें झालें. यास्तव, शामराऊ मुरुंबकर याणें पहिलें पतकास कोणी खावंद नाहीं ऐसा गैरवाका सांगितला, आणि वतन करून घेतलें. तें त्याचें वतन दूर करून, त्यास सदरहू वृत्तीचीं पत्रें दिल्हीं होतीं, ते कुलीं रद्द केलीं; आणि त्यास सदरहू वृत्तीशीं संबंध नाहीं ऐसें केलें असे. तुमचा सदरहू वतनाचा भोगवटा चालिला नाहीं याबद्दल तुमच्या माथां सिर्णी होन पादशाही १०० एकसें रास ठेविले. आणि त्याचा वसूल हुजूर घेऊन, तुह्मावरी कृपाळू होऊन, सदरहू वतन पतक बाजारदरवाजा, कसबें पाटगांवीचें, अजरामरामत करून राजश्री अंताजी विठ्ठल देशाधिकारी प्रांत कुडाळ यांच्या नांवें सनद सादर केली असे. ते तुमचे दुमाले करून चालवितील. तुह्मीं पुत्रपौत्रीं वंशपरंपरेस अनुभवून सुखरूप पतकमजकुराची कमाविश करीत जाणें. या वतनास हक्क लवाजिमा महतकदम चालिला असेल त्याप्रमाणें तुह्मास करार केला असे. तुह्मीं घेत जाणें. जाणिजे. छ २० रमजान. निदेश समक्ष.

---

[ ४९ ] श्री. १६९७.

पूर्वी राजे थोर थोर जाहाले; त्याची नांवनिशी यादी जानिता. पाद-शहा झाले त्याना तपशील. पुरुप १७३ एकूण मुदती वर्पे नितपशील. ता। शके १६१९ ईश्वर नाम संवत्सरपर्यंत कली गतकली. बेरीज. वर्पे ४७७९ तपशील.

महाराष्ट्र राजे पुरुप १२०. एकूण मुदती वर्पे सुमार ३६७२

मुसलमान पातशहा पुरुप ५३ त्रीपन एकूण मुदती वर्पे देखील औरंगशहा शके १६१९ ईश्वर नाम संवत्सरपर्यंत वर्पे ११०७.

तपशील.

राजा युधिष्ठिर व त्यांच्या घराणियांतील राजे पुरुप ३० तीस एकूण मुदती वर्पे बेरीज माहिने दिवस
१८५३ ११ ८

तपशील.

| | पुरुप | वर्पे | महिने | दिवस. |
|---|---|---|---|---|
| खासा युधिष्ठिर | १ | ३३ | ८ | २५ |
| राजा परिक्षिति | २ | ६० | १ | ० |
| राजा जन्मेजय | ३ | ८४ | ५ | २७ |
| राजा अश्वमेध | ४ | ८२ | ८ | २४ |
| राजा धर्म | ५ | ८८ | २ | ८ |
| राजा मनजित | ६ | ८१ | ११ | २४ |
| राजा जसरथ | ७ | ७५ | ८ | ८ |
| राजा दीपपाल | ८ | ७५ | १० | १८ |
| राजा उग्रसेन | ९ | ७७ | ७ | २४ |
| राजा सूरसेन | १० | ७९ | ८ | ६ |
| राजा भूपति | ११ | ६१ | ५ | २ |
| राजा रणजित | १२ | ६५ | १० | २९ |

| | पुरुष | वर्षे | महिने | दिवस |
|---|---|---|---|---|
| राजा वीराजित | १३ | ६४ | ७ | ३ |
| राजा भीमसेन | १४ | ५५ | ८ | २९ |
| राजा शुकमल्लदेव | १५ | ६२ | ० | ३ |
| राजा नरहरिदेव | १६ | ६१ | १० | ४ |
| राजा सूजितरथ | १७ | ७२ | ११ | ३ |
| राजा शूर | १८ | ५८ | ० | ८ |
| राजा पर्वत | १९ | ५० | ८ | २१ |
| राजा मधुकरशाहा | २० | ५२ | ४ | ७ |
| राजा तोडरमल्ल | २१ | ४८ | १० | २९ |
| राजा भीष्मदेव | २२ | ४७ | १० | २९ |
| राजा नरहरिरथ | २३ | ४७ | ११ | ० |
| राजा पूर्णमल | २४ | ४४ | ८ | १७ |
| राजा सारंगदेव | २५ | ५६ | ० | ० |
| राजा रूप | २६ | ५४ | १० | २ |
| राजा अभिमन्य | २७ | ५१ | ११ | ८ |
| राजा धनपाल | २८ | ४८ | ७ | ४ |
| राजा भीम | २९ | ५८ | ५ | १५ |
| राजा लखमीदेव | ३० | ४८ | ११ | २१ |
| | ३० | १८३५ | २१४ | ३९८ |

एकूण जमा बेरीज वर्षे, मास व दिवस :—

| वर्षे बेरीज, | मास, | दिवस. |
|---|---|---|
| १८५३ | ११ | ८ |

याउपरी लखमीदेवाचा वजीर वीरशेन होता. त्याणें लखमीदेवास मारून आपण राज्य केलें. पुरुष १०. एकूण मुदती वर्षे महिने दिवस.

| वर्षे, | महिने, | दिवस :— |
|---|---|---|
| ३४७ | ९ | २६ |

| | पुरुष | वर्षें | महिने | दिवस. |
|---|---|---|---|---|
| खासा वीरसेन | १ | १७ | ७ | ० |
| राजा सूरसेन | २ | ३२ | ८ | ११ |
| राजा अनंतशाहा | ३ | ३७ | ८ | २३ |
| राजा वीरशाहा | ४ | ३२ | १० | ७ |
| राजा हरिरूप | ५ | ३५ | ९ | १७ |
| राजा सुलोचन | ६ | ४३ | १ | ४ |
| राजा पर्वत | ७ | ४२ | ९ | २४ |
| राजा सुरपाळ | ८ | ३८ | २ | ५ |
| राजा कुप | ९ | ३५ | ४ | १४ |
| राजा पृथ्वीपाळ | १० | ३१ | ८ | ११ |
| | १० | ३४२ | ६६ | ११६ |

एकूण जमा बेरीज :—

| वर्षें, | महिने, | दिवस. |
|---|---|---|
| ३४७ | ९ | २६ |

याउपर पृथ्वीपाळाचा वजीर नरहरीनाथ होता. त्याणें पृथ्वीपाळास मारून त्याचें राज्य आपण केलें. पुरुष १६. एकूण मुदती :—

| वर्षें, | महिने, | दिवस :— |
|---|---|---|
| ३८९ | ६ | ८ |

| | पुरुष | वर्षें | महिने | दिवस. |
|---|---|---|---|---|
| खासा नरहरीनाथ | १ | १५ | १० | ८ |
| राजा जेतसिंग | २ | २७ | ७ | १५ |
| राजा बैरामगत | ३ | २१ | २ | १३ |
| राजा दीपपाळ | ४ | ३५ | ४ | १ |
| राजा महाबळ | ५ | ३५ | ८ | ७ |
| राजा अमृतपाळ | ६ | २८ | ८ | १० |

| | पुरुष | वर्षे | महिने | दिवस. |
|---|---|---|---|---|
| राजा जेतपाळ | ७ | २८ | ११ | १० |
| राजा माणिकचंद | ८ | २९ | ७ | २१ |
| राजा कामचंद | ९ | ३२ | ५ | १० |
| राजा हरगौण | १० | १७ | ० | ११ |
| राजा जीवनगौण | ११ | २३ | ९ | २७ |
| राजा रीम्यवंग | १२ | १३ | ७ | २९ |
| राजा तिविक्रम | १३ | १० | २ | १० |
| राजा मारमल | १४ | २३ | ११ | २४ |
| राजा भूपति | १५ | १० | २ | २ |
| राजा उदितकंठ | १६ | ३५ | २ | २० |
| | १६ | ३८१ | ९५ | २१८ |

एकूण जमा बेरीज:—

| वर्षे, | मास, | दिवस. |
|---|---|---|
| ३८९ | ६ | ८ |

याउपरी उदितकंठाचा मंत्री होता. त्याणें उदितकंठास मारून आपण राज्य घेतलें. तें राज्य केलें पुरुष १६. एकूण मुदती:—

| | पुरुष | वर्षे | महिने | दिवस. |
|---|---|---|---|---|
| खासा मंत्री | १ | २४ | २ | ० |
| राजा चंद्रपाळ | २ | १६ | ९ | २४ |
| राजा सुंदरपाळ | ३ | २१ | ४ | १८ |
| राजा देशपाळ | ४ | १९ | १ | ११ |
| राजा रसिकपाळ | ५ | १८ | ० | १२ |
| राजा अनंतपाळ | ६ | १८ | ० | २२ |
| राजा रामपाळ | ७ | ३७ | ११ | १२ |
| राजा गोविंदपाळ | ८ | ३८ | ७ | ३७ |

| | पुरुष | वर्षें | महिने | दिवस. |
|---|---|---|---|---|
| विक्रमजितास मलुकचंदे मारून राज्य केलें. | ३ | ० | २ | २ |
| राजा विक्रमचंद | ४ | १२ | ७ | १९ |
| राजा कुलचंद | ५ | ० | २ | २ |
| राजा रामचंद | ६ | १३ | ११ | ७ |
| राजा कल्याणचंद | ७ | १० | ५ | ४ |
| राजा श्रीचंद | ८ | १४ | ९ | १४ |
| राजा सूरचंद | ९ | २६ | ३ | २१ |
| राजा भीमचंद | १० | १६ | ३ | १ |
| राजा गोविंदचंद | ११ | २१ | ७ | १२ |
| भावति गोविंद-चंदाची स्त्री. तिणें राज्य केलें. | १२ | १ | ० | ० |
| राजा प्रतिमल, भावति-उपरी राजा झाला. | १३ | ७ | ५ | १९ |
| राजा गोविंद | १४ | २० | २ | १७ |
| राजा पूर्णप्रेम | १५ | ७ | ७ | १९ |
| राजा महानंद | १६ | १५ | ७ | १८ |
| | १६ | २१९ | ७० | १५५ |

एकूण देखील वर्षें व महिने दिवसः--

| वर्षें, | महिने, | दिवस. |
|---|---|---|
| २२५ | ३ | ५ |

याउपरी जैसिंग बंगाळीयाहून आला. त्याणें महानंदास मारून आपण राज्य केलें. पुरुष १२. एकूण मुदतीः—

| वर्षें, | महिने, | दिवस. |
|---|---|---|
| १३२ | ८ | १८ |

| | पुरुष | वर्षें, | महिने, | दिवस. |
|---|---|---|---|---|
| राजा शेरसिंग | ४ | १० | ८ | ११ |
| राजा बीरसिंग | ५ | २५ | ० | १५ |
| राजा नृपसिंग | ६ | ८ | ० | ४ |
| | ६ | ८६ | २६ | ६० |

एकूण जमा बेरीज:—

| वर्षें, | मास. |
|---|---|
| ८८ | ४ |

याउपरी नृपसिंगास धिरंधर राजे याणें मारून राज्य केलें, पुरुष ९ एकूण मुदती:—

| वर्षें, | महिने, | दिवस. |
|---|---|---|
| २२७ | ५ | २९ |

| | पुरुष | वर्षें, | महिने, | दिवस. |
|---|---|---|---|---|
| खासा धिरंधर | १ | २२ | ७ | ० |
| राजा सेन | २ | ३५ | १० | ९ |
| राजा लालजी | ३ | ३५ | २ | ८ |
| राजा महानु | ४ | २० | ३ | ९ |
| राजा बीरनाथ | ५ | २८ | ५ | २५ |
| राजा जीवन | ६ | २२ | २ | २५ |
| राजा उदयसिंग | ७ | २७ | ४ | २९ |
| राजा कुळानंद | ८ | २२ | ३ | ८ |
| राजा राजपाळ | ९ | १३ | २ | ६ |
| | ९ | २२४ | ३८ | ११९ |

एकूण जमा बेरीज:—

| वर्षें, | महिने, | दिवस. |
|---|---|---|
| २२७ | ५ | २९. |

| | पातशाहा | वर्षे, | महिने, | दिवस. |
|---|---|---|---|---|
| बिर्बानें पातशाही केली | ६ | ७ | २ | २२ |
| सुलतान नसर्दी गोरी | ७ | १८ | ५ | २९ |
| सुलतान गयासदीन गोरी | ८ | २१ | ३ | २२ |
| सुलतान मोइनदीन | ९ | २३ | ७ | १२ |
| शाहा हुसेन गोरी | १० | १४ | ३ | १० |
| सुलतान जलाउदीन गोरी. | ११ | १६ | ४ | ० |
| सुलतान फतचदीन गोरी | १२ | २० | ९ | ० |
| याकुब शाहा गोरी | १३ | १५ | १० | ६ |
| शाहा शमसद्दीन | १४ | १३ | ९ | ९ |
| सुलतान अलाउदीन | १५ | २७ | ७ | १३ |
| सुलतान कुतुबदीन | १६ | ४ | ५ | १३ |
| सुलतान गयासदीन | १७ | ५ | १ | ९ |
| सुलतान सरमस्त गोरी | १८ | ७ | ९ | १३ |
| सुलतान शाहा गोरी | १९ | २७ | ० | ७ |
| फेरोजशाहा खतम | २० | ४१ | ५ | ० |
| महंमद शाहाबीन फेरोज | २१ | १७ | ० | ११ |
| शाहा कुलीबीन फेरोज | २२ | ५ | ७ | ९ |
| सुलतान तगलुशा यांणीं गड मुस्तेद केले. | २३ | ३१ | ९ | २१ |
| तुरूमशाहा गोरी | २४ | ५ | ७ | १५ |
| महंमद नसरदीन | २५ | ६ | ४ | १२ |
| सरफ सदीन | २६ | १० | ७ | १५ |
| मलूशाहा | २७ | १७ | ५ | ७ |
| ताबरशाहा | २८ | ३३ | ५ | ७ |
| मुबारकशाहा | २९ | १९ | ७ | १३ |

| | पातशाहा | वर्षें, | महिने, | दिवस. |
|---|---|---|---|---|
| हुमाऊनें दुसऱ्यानें राज्य केलें. | ४७ | २० | ० | ७ |
| सुलतान अकबर पातशाहा गाजी. | ४८ | ५१ | ९ | ११ |
| सुलतान नुरदीन पातशाहा जाहांगीर. | ४९ | ४२ | १० | २० |
| सुलतान शाहारयार बिन जहांगीर. | ५० | ० | ० | १४ |
| सुलतान बाबर बिन सुलतान अशरू. | ५१ | १९ | ३ | १५ |
| शाहाजहां पातशाहा याचें नांव कुरुंम, औरंगशाहाचा बाप. याचे बेटे. १ दाराशाहा. १ शाहासुजा. १ मुराद बक्श. १ औरंगशाहा. —— ४ | ५२ | ३२ | १ | १४ |
| त्यास, औरंगशाहा उपजला, शके १५४० पंधराशे चाळीस, काळयुक्त संवत्सर. त्यास चाळीस वर्षांची उमर होयतों शाहाजां जवळी चाकरी करीत | ५३ | ४० | ० | ० |

होता. त्याउपर पातशा-
ही आपले हिंमतीनें करि-
तो. शके १६१९ ईश्वर
नाम संवत्सरे, एकूण
मुदती भोगवटा:--

| | | | |
|---|---|---|---|
| ५३ | १०८२ | २७९ | ६३० |

एकूण जमा वर्षे बेरीज:--

११०७

तेरीज:—एकंदर राजे व पातशाहा
पुरुष १७३, एकूण मुदती शके १६१९,
ईश्वर नाम संवत्सरे वर्षे:--
४७७९

महाराष्ट्र राजे १२० एकूण बेरीज:----

| | पुरुष | वर्षे, | महिने, | दिवस. |
|---|---|---|---|---|
| युधिष्ठिर पांड-- | | | | |
| यांचे पुरुष. | ३० | १८५३ | ११ | ८ |
| वीरसेन पुरुष | १० | ३४७ | ९ | २६ |
| नरहरिनाथ पुरुष | १६ | ३८९ | ६ | ८ |
| मंत्री उदितकंठाचा | १६ | ३११ | ५ | २८ |
| धामधुम फुट राजे | १६ | २२५ | ३ | ५ |
| जैसिंग पुरुष | १२ | १३२ | ८ | १८ |
| माधवसिंग | ६ | ८८ | ४ | ० |
| धिरंधरराजे पुरुष | ९ | २२७ | ५ | २९ |
| पृथ्वीपाळ पुरुष | ५ | ९५ | ४ | २८ |
| | १२० | ३६६७ | ५५ | १५० |

एकूण जमा वर्षें :—

३६६७ ऐन वर्षें.

५ मास ५१ व दिवस १५०.

एकूण माहे ५ एकूण ६०.

माहे एकूण वर्षें.

---

३६७२

मुसलमान पातशाहा पुरुष ५३.

समेत औरंगशा चालती मुदती

समेत मोगलटा बेरीज वर्षें ११०७.

पासीं, तांत्राचें भविष्य त्यांच्या महजबें शास्त्रप्रमाण कीं :- दिल्लीस मागतीं हिंदू राजे छत्र धरणार. गेरोसे गेरा सन येतां दिल्ली हातीची जाईल. त्याप्रमाणें वर्षें ४ चारी व चालतें वर्ष एकूण रमारमीं पांच वर्षें उरलीं आहेत. व ईश्वर संवत्सरीं दिल्लीचा राजा यासीं परम पीडा होईल. औरंगशाहाचा पुत्र हल्लीं दिल्लीस आहे, तो रजपुतणीचे पोटींचा, त्यास हिंदूचा अभिमान असे, त्या किसातीनें भाऊ भाऊ झगडोन हिंदू दिल्लीस जातील, प्रयागीं ३ वर्षें छावणी करतील, फिरोज पठाण व मोगल जमाव करून दिल्लीहून हिंदूस काढितील. पुढें नर्मदेची सरद पडेल. या वर्षापासून भीमा दक्षण प्रांत सोड पडेल. भीमा उत्तर प्रांत तहद प्रयाग २४॥ साडेचोवीस वर्षें राजीक घाटेल, हें भविष्य असे. यांत कलिराजा चालतो. युगाची संख्या आहे. घडेल तें प्रमाण. परंतु मल्यांचें सदरहू भविष्य आहे.

याची तालीक चित्रभानु संवत्सरीं श्रावणमासीं शुक्लपक्षीं तृतीया गुरुवासरीं लिहिली असे. शके १६२४. दस्तूर राजश्री राघो व्यंकटेश दफ्तरदार, दि॥ मजमू, कुलकर्णी, का॥ मोर, तर्फ रोहिडखोरे, सुभा मावळ. सु॥ सलास मया अल्फ, छ २९ सफर.

ताजाकलम—

औरंगशा पादशाही करीत असतां, शके १६२८, व्ययनाम संवत्सरे, माघ बहुल अमावास्या, छ २८, [ अठ्ठावीस असून सत्तावीस केलेला दिसत आहे तेव्हां खरें कोणतें तें समजत नाहीं. ] जिल्काद सन सबामध्यें, दोन प्रहरा मृत्यु पावले.

सुलतान तारा औरंगशाहाचा लेक छ १ जिल्हेज सन सबा फालगुन शुद्ध द्वितीया रविवासरीं पादशाही करूं लागला.

शाहा अलम दिल्ली प्रांतीं होता त्यावरी अजमतारा चालोन गेला त्याचें याचें झूंझ चंबळ नदीजवळी झालें. छ

ते भांडणीं अजमतारा रणास पुत्र नातूसहवर्तमान येऊन मृत्यु पावले. हालीं शाहाअलम तक्त कबज करून पादशाही करूं लागला. शके १६२९ सर्वजित् संवत्सरे.

---

[ ९० ] ११ आक्टोबर १६९८.

अमीलानी हाल व इस्तकहाल व देसमुखानी व देसपांड्यानी तााहाय पाा कोल्हापूर चिदानद सुहुर सन तिसा तिसैन अलफ, सन ११०८ फसली. दर्रीविला, यादव शिवदेऊ नाडगौंडा पाा माार हुजूर येऊनं इलतमेस केला जे:—आपणास पाामजकुरीं जुजबी इनाम आहे. त्यानें आपला अवकाती चालत नाहीं. साहेबीं मेहेरबान होऊन परगणे मजकुरीं गांवगन्ना इनाम मऱ्हामत केलिया पेस्तरसालाची लावणी करून प्रगणें आबाद करून, ह्मणोन अर्ज केला. बराय अर्ज खातरेस आणून

पा मारीं तुह्मांस तर्फहायपैकीं अजऱ्हामऱ्हामत इनाम जमीन मऱ्हामत केली असे. छ २७ रबिलाखर.

मोर्तब सूद.

[ ९१ ] श्री. १६९९.

राजश्री भगवंतराऊ रामचंद्र सरदेसाई ता। साळसी गोसावी यांसी —

छ अखंडितलक्ष्मीअलंकृतराजमान्य सेवक परशुराम त्र्यंबक प्रतिनिधी नमस्कार सु॥ तिसा तिसैन व अलफ. मौजे चिंदर ता। मजकूर येथें हत्तीतोड व खोदमिराबाग कारकीर्द आदलशाई येहीं नवजिकीर बाग लावणी केली आहे. ते अजिवरी खाली. सा सालें दिवाणांत कमावीस चालत होती. सांप्रत राजश्री रामचंद्र पंडित अमात्य येहीं मौजे मजकूरचे कुळकर्णी राम शेणवी व गुण शेणवी यांचे स्वाधीन केले होते. सन सबासापासून सालमजकुरातागाईत त्याणीं कमाविस करून उपभोग केला. याकरितां त्यांचे बापभाऊ उभे राहून कथला कराया लागले. पुढें कुळकर्णी यांकडे बाग असिल्यानें कथला वारत नाहीं. व अवघे वतनदार हुजूर विशाळगडचे मुकामीं आले होते. त्यांचे विद्यमानें मनास आणितां सदरहू दोन्ही भाग त्याकडून दूर करावे असा निर्वाह जाहला. त्यावरून राम शेणवी व गुण शेणवी कुळकर्णी चिंदर यांकडून दोन्ही बाग दूर करून हत्तीतोड व खोदमिरा दोन्ही ठिकाणीं बागाईत यांचे माथा शेरणी दाभोळी लारी १००० एक हजार करार करून तुह्मास दिले असे.

[ ९२ ] श्री. १७००.

यादी. चंदीच्या मुकामाहून धर्मादाय व इनामती व इसाफती व नूतन वतनें कारकीर्द महाराज राजश्री छत्रपति साहेबानीं दिलीं होतीं. त्यांना विचार मनास आणितां राज्याचा बंदोबस्त न होतां ऐशा सनदा येऊन दाखल जाहाल्या. तेसमयीं श्रीमन्महाराज मातुश्री तारा आईसाहेब व सर्व राजमंडळ मिळोन निर्णय केला, येणेंप्रमाणें, बितपशील. सु॥ इहिदे अलफ.

ज्यांणीं शंभर लारीची सनद घेतली असेल, त्याप्रमाणें निमेप्रमाणें द्यावें. कलम १.

फरमान पातशाहाकडे प्रांत असतां फरमान दिलें नाहींत. कलम १.

प्रांतांत फरमान भोगवटियासी दाखवूं लागले तेव्हां दरखोरी करितां फरमानाचा निवाडा येणेप्रमाणें :—

महाल.

१ खारापाटण महाल.

१ संवदळ महाल.

१ राजापूर महाल.

१ लांझे महाल.

१ संगमेश्वर महाल.

१ साळसी महाल.

———

६

येकूण महाल सहा. या महालांतील अंमल अदिलशाहा पातशाहा याचा उठून गेला. ते समयीं इकडील लोक तिकडेस चाकरीस होते. ते समयीं आपले घरास यावयास लागले. तैनाता पावल्या नाहींत. त्यावेळेस एकंदर लोकांनीं आदिलशहास अर्ज केला कीं, आह्मीं आपल्या प्रांतास

ज्याणीं जमिनीची सनद घेतली असेल त्यास निमेप्रमाणें द्यावी. कलम १.

ज्याणीं गांव मुकासे द्यावयाच्या सनदा आणिल्या त्याचा प्रकार. ज्यास गांवसेर सारिखे असतील त्यासच द्यावे. वरकडास ऐवज मात्र द्यावा. कार्यभाग जाणून. कलम १.

खारापाटण महालांतील चौकशी मनास आणितां इदलशहाचे फरमान व थोरले शिवाजी महाराज यांचीं पत्रें भोगवटियासीं घेऊन वतनदार ह्मणवीत होते. त्यांची दरखोरी करितां :—

१ रामाजी हरी कुलकर्णी पोंभुर्लें यांच्या वडिलांनीं खारेपाटण महालचीं देसगतचीं राजपत्रें व फर्मान घेतलें; परंतु याचा भोगवटा अव्याहत नाहीं. वर्षें तूट जहालीं. सबब पत्रें खोटीं. कलम १

जबानीई सुबाजी बिन हुसनजी नीा मुखरी दाखल मुखरी मुकादम याचें नकल जाहलें. त्यास वर्षें ६२ बासष्ट झालीं. इतकेंत मालेराई जाहाली. तेव्हां कोणी वतनदार गांवीं नाहींत. जो भेटेल तोच वतन-

जातो, आह्मांस पैका पावला नाहीं. पुढें आह्मीं काय करावें? आपलीं ठाणीं उठोन आलीं. त्या प्रांतीं साहेबाचा नक्षा राहे ऐसें द्यावें. तेव्हां ज्यास जे गोष्टीचें अगत्य त्याप्रमाणें फरमान मागितलें. त्याप्रमाणें दिलें. फरमानाचा कर हातास येणेचा. मुनसीस सांगावें कीं, फरमान अमुक कार्यास पाहिजे. त्याप्रमाणें मुनसीनें अर्जबेगास सांगावें कीं, फलाणा गृहस्थ फलाण्या कार्यास फरमान मागतो. अर्जबेगानें आदिलशहा पाछाहास अर्ज करावा कीं, अमुक जमादार आपले घरीं जात आहे, पैका पावला नाहीं, आणि साहेबाचीं ठाणीं प्रांतांतील उठोन आलीं, पैका न दिलें याकरितां अफाट शिरपाव मागतात, साहेबीं द्यावें, ह्मणजे प्रांतांत साहेबाचा नक्षा राहील. हें जाणून सर्वांस मागितलेंप्रमाणें फरमान देविलें. फरमानाचा चक लहान कार्य असल्यास येणेप्रमाणें.

सिरस्ता:—

| मुनसी | अर्जबेग | नजर |
|---|---|---|
| २ | २ | ५ |

दार ह्मणून मारीत आणावे. वसूल घेत. रोखा पोता कौल करार त्याच्याच नांवचा. वतनदाराचा उजूर नाहीं. ते समयीं दादन मुखरीच्या निसबतीनें सेवा केली. ते वेळचीं पत्रें माझे नांवचीं आहेत. ऐशी हे राजगत भोगली आहे. पत्रें रूप करणार धणी समर्थ आहेत. पत्रें भोगवटीचीं. मीं वतनदार नव्हे; परंतु मुखरीचा ऐसा ह्मणवीत आलों आहे. याचा हें सुबाजी व मुखरीचा गुमस्ता ह्मणोन पत्र करून दिल्हें आहे. कलम १.

थोर कार्य असल्यास रुा १६, नजर पातशाह १०, मुनसी ३, अर्जबेग ३.

याप्रमाणें फरमाचा बंद शिरशाईत जाहला आहे. कलम १.

[ ५२ ] श्री. ६ नोव्हेंबर १७०५.

राजीनामापत्र शालिवान शके १६२७ पार्थिव नाम संवत्सरे मार्गसीर शुद्ध द्वितीया बुधवार, दर जागा किले प्रसिद्धगड उर्फ रांगणा, हजीर मजालस बेहुजूरः—

दिवाण लोक राजमुद्रा.

राजश्री जयसिंग जाधव-
राऊ सेनापति.
श्री
राजारामचरणीं दृढ-
भाव। सेनापति धना-
जी जाधवराव ॥

श्री पत्याचार्य.
राजश्री हंबीर राऊ मोहिते
सरलष्कर.
श्री
शिवचरणीं दृढभाव।
सरलष्कर मोहिते
हंबीरराव ॥

राजश्री बिंबाजी पालकर
मुद्राधारी किल्ले प्रसिद्धगड
श्री

राजश्री बारानजी मोहिते
नामजाद जंजिरे सिंधुदुर्ग.
श्री
राजाराम नरपतेस्तस्य
सेवक बराणजी मोहिते.

राजश्री खंडोजी निकम
समशेरबहाद्दर.

राजश्री संताजी पांढरे
शरफन मुलूक.
श्री
पाळकी॥ शिवचरणीं तत्पर।
संताजी पांढरे निरंतर॥

राजश्री बजाजी नाईक
देशमुख पा फलटण.
बजाजी नाईक देसमूक
निंबाळकर.

राजश्री नेमाजी सिंदे.
शिवचरणीं वंदे
नेमाजी शिंदे.

देकोजी खांडे व कारकून
कर्यात कापशी.

महालहाय:—————————

तर्फ खारेपाटण

विठ्ठल विष्णु ठाकूर
देसाई ता मा.

रामाजी आपाजी देशकुल-
कर्णी ता मजकूर.

गोविंद विश्वनाथ प्रभू बंदर-
निवीस व जाहाजनिवीस
ता मा.

तर्फ साळसी

खंडो नानदेऊ जानीव
सरदेसाई तर्फ साळसी.

अनंत प्रभू देसाई ता
साळसी.

माहाद सावंत भोसले
नाईकवाडी ता मजकूर.
कट्यार.

सुर्याजी साटम नाईकवाडी
तर्फ मजकूर.
कट्यार.

मामले परंडे

शाहामलिक पा मोकदम
मौजे सेंदरी बि॥ राघो
भिवाजी कुलकर्णी.
नांगर.

सुभानजी पा मोकदम
मौजे नाळगांव.
नांगर.

तर्फ तारळें.

राघो हरी कुलकर्णी ता
येमघोल मेनघोल देहाय ३२.

तर्फ चांदगड.

पांडुरंग भिमाजी देशकुळकर्णी
व गांवकुळकर्णी ता मा.

तर्फ अजिरें.

देसकानी.

कानोजी नाइवर
नामोद्दीन आमद.
शिक्का.

त्रिंबकजी कानोजी सरदेसाई. रवळोजी कानोजी देसाई.
शिक्का.

संभाजी खंडोजी देसाई. नरसोजी रामजी देसाई.

शामराऊ मलारी नाडगौडा ता। मजकूर.

हरजी निकम पाटील निमे
मौजे उतूर.

रोवळोजी बिन भेनोजी
बंडगा पाटेल मौजे हरली
वु॥.

नेमाजी बिन सोमाजी
ठिका पाटेल
कि नी----

सुभा परगणे कुडाळ
पुंडलिक राम नाडकर्णी
पा। मजकूर.

अंताजी राम कुलकर्णी
मौजे माणगांव ता। माणगाऊ.

गोपाळ बाबाजी कुलकर्णी
मौजे परंडले.

नारो राम कुलकर्णी मौजे
काबरे ता। पाट.

नारो बाबाजी कुलकर्णी
मौजे धामापूर ता। वराड.

कर्यात कापशी.

मदार बुदरुक देसाई का।
मजकूर.

तिमाजी निलकंठ
व वेंकाजी कृष्ण
देशकुलकर्णी
का। मा।र
बि। डी.

यादो सिवदेऊ
नाडगौडा का।
मजकूर.

प्रा। वांई ————————

यमाजी नागनाथ कुल-
कर्णी मौजे किणई सा।
कोरेगाऊ.

हजीर मजालसी समस्ता हुजूर रामाजी विठ्ठल शेणवी व कृष्णाजी बाव शेणवी व अंताजी मल्हार शेणवी देशकुळकर्णी व गांवकुळकर्णी देहाय तर्फ अजिरें यांनीं राजश्री रामचंद्र नीळकंठ भारद्वाजगोत्री देशकुळकर्णी व गांवकुळकर्णी तर्फ अजिरें यांस लिहून दिलें पत्र ऐसे जे:— तर्फ मजकूरचें देशकुळकर्ण व गांवकुळकर्ण बुन्यादी विठ्ठल माद शेणवी याचें होतें. त्याच्या वडिलापासून आपल्या वडिलांनीं तिसरी तकपीम देशकुळकर्ण व गांवकुळकर्ण विकत घेतलें. गांवहि विभागाप्रमाणें तिसरे तकपिमेचे वाटून दिले. त्याप्रमाणें आपले वाडवडील परंपरा खात आले. विठ्ठल माद शेणवीहि आपले परंपरेनें दोनी तकपिमा देशकुळकर्ण व गांवकुळकर्ण खात आले. ईश्वरगतीनें विठ्ठल माद शेणवी मृत्य पावला. त्याचे पोटीं कोणी संतान नाहीं. अगर त्यास कोणी दाईज गोत्रज नाहीं. नकल जाहालें. वृत्ती दिवाणची देखोन महाराज राजश्री साहेबीं तुमासीं अगरामन्हागत करून देतां सारें वतन विठ्ठल माद शेणवी याचें समजोन अर्बा तिसैनच्या सालीं स्वामीनीं आपला मुतालीक तिमाजी गोविंद वतनावरी पाठविला. तो महालासी जाऊन तर्फमजकूरचें देशकुळकर्ण व गांवकुळकर्ण अनभवूं लागला. धणी चंदीस दूर प्रांतें असतां हा करीना कोणास सांगावयाकरितां आपण बाहीर पडोन देशावरी गेलों. वडिलापासोन तिसरी तकपीम आपला भोगवटा, त्यास विक्षेप जाहला देखोन, बेळगांवीं राहोन कथळा केला. त्यावरी सन अर्बा मयामध्यें महाराज राजश्री छत्रपतिसाहेबाची स्वारी प्रसिद्धगड ऊर्फ रांगणा या जागा जाहाली. ते प्रसंगीं राजश्री त्र्यंबकजी कानोजी सरदेसाई व रवळोजी कानोजी देसाई व संभाजी रामाजी देसाई व शामराऊ मल्हार नाडगौडा तर्फ मजकूर हे राजश्री साहेबाच्या दर्शनास आले. त्याबराबरी कृष्णाजी बाव शेणवीही आले. त्यांणीं तुमची भेटी घेतली. ते प्रसंगीं देशकास तुम्हीं विचारिलें कीं, रामाजी विठ्ठल शेणवी हे बेळगांवास जाऊन आमच्या वतनास कथळा करितात ह्मणोन. त्यास त्याणीं सांगितलें जे, देशकुळकर्ण व गांवकुळकर्ण तर्फ मजकूर येथील तिसरी तकपीम त्याची, त्याचा भोगवटा चालत आला आहे, त्याप्रमाणें त्याची तकपीम त्यास

द्यावी, आणि त्यास तुह्मीं समाधानरूप राखोन तकषमिप्रमाणें वतन अनभवून असावें, ऐसें आमच्या विचारें आहे, ऐशियास, शफतपूर्वक वचन द्याल तरी रामाजी विठ्ठल शेणवी यासी बेळगांवींहोऊन भेटीस घेऊन येऊन ह्मणोन. त्यावरून तुह्मीं देशकाची गोष्टी मान्य करून देशमुखास व कृष्णाजी बात्र शेणवी यासी शफतपूर्वक सांगितलें कीं, रामाजी विठ्ठल शेणवी यास घेऊन येणें. त्यावरी देशक व कृष्णाजी बात्र शेणवी महालास गेलेयाउपरी रामाजी विठ्ठल शेणवी यास बेळगांवींहोऊन आणून छ १६ रजब सन सीत मया ये दिवशीं राजश्री त्रिंबकजी कानोजी सरदेसाई व रखळोजी कानोजी देसाई व संभाजी खंडोजी देसाई व शामराऊ मल्हार नाडगौडा आह्मास भेटीस घेऊन आले. आमच्या तुमच्या भेटी जाहाल्या. तेसमयीं आह्मा समक्ष देसाई तर्फ मजकूर यास विचारिलें कीं, रामाजी विठ्ठल शेणवी व कृष्णाजी बात्र शेणवी व अंताजी मल्हार शेणवी यांची देशकुळकर्णाची व गांवकुळकर्णाची तिसरी तकषीम आहे ह्मणतात ते कशी आहे ते आपले बेताळीस स्मरोन सांगा, तुह्मीं देशमूख, आह्मांस व त्यास वडील आहा, जें सांगाल त्यास आह्मीं मान्य आहों. ऐसें ह्मणितलें. त्यावरी देशकांनीं सत्य स्मरोन वृत्तीचा करीना सांगितला कीं, तर्फ मजकूरचें वतन देशकुळकर्ण व गांवकुळकर्ण पूर्वीं विठ्ठल माद शेणवी याची, त्यास त्याच्या वडिलावरी पूर्वीं दिवाणचा कसाला पडिला. तेव्हां रामाजी विठ्ठल शेणवी व कृष्णाजी बात्र शेणवी व अंताजी मल्हार शेणवी यांच्या वडिलांनीं देशकुळकर्णाची व गांवकुळकर्णाची तिसरी तकषीम विकत घेतली. त्या दिवसापासून तिसरे तकषिमेचा भोगवटा त्यांचा चालत आला आहे, त्यास विठ्ठल माद शेणवी मृत्य पावला, त्याचे पोटीं कोणी संतान नाहीं, अथवा त्यास कोणी दाईज गोत्रज नाहीं, नकल, वृत्ती दिवाणची, धणियानें तुमास दिली, तरी दोनी तकषिमा विठ्ठल माद शेणवी याच्या देशकुळकर्ण व गांवकुळकर्ण तुह्मीं अनभवणें, एक तकषीम देशकुळकर्ण व गांवकुळकर्ण विठ्ठल माद शेणवी याच्या वडिलीं रामाजी विठ्ठल शेणवी व कृष्णाजी बात्र शेणवी व अंताजी मल्हार शेणवी यांच्या

वडिलास विकत दिली, त्याप्रमाणें विभागाचे गांवहि पूर्वीच वाटले आहेती ऐसें सांगितलें. तें मनास आणून, त्याउपरि देशक तर्फ मजकूर व गोत बसवून आह्मांस वतनाचा करीना पुसतां आह्मीं सांगितला कीं. तर्फ मजकूरचें देशकुळकर्ण व गांवकुळकर्ण विठ्ठल माद शेणवी याच्या वडिलाचीं असतां त्याच्यापासून आपल्या वडिलीं देशकुळकर्णाची व गांवकुळकर्णाची तिसरी तकसीम विकत घेतली. तदारभ्य आमचा भोगवटा तिसरे तक्सिमेचा चालत आला आहे, आह्मी कांहीं विठ्ठल माद शेणवी याचे दाईज गोत्रज नव्हे, तुह्मास महाराज राजश्री साहेबीं, विठ्ठल माद शेणवी निपुत्रिक, त्याचे वौशीं कोणी नाहीं, वृत्ती दिवाणची ह्मणोन तर्फ मजकूरचें वतन विठ्ठल माद शेणवी याचें, ऐसें समजोन दिल्हें, त्याउपरि तुह्मीं आपला मुतालीक तिमाजी गोविंद वतनावरी पाठविला, ता वतनाचा कारभार करूं लागला, त्याची आमची कटकट जाहाली, धणी चंदीस दूर प्रांतें असतां हा करीना आह्मी कोणास सांगावा, याकरितां आह्मीं बाहीर पडोन देशावरी गेलों होतों, ऐशियास विठ्ठल माद शेणवी याच्या दोनी तक्सिमा देशकुळकर्ण व गांवकुळकर्ण, आमची तिसरी तक्षीम देशकुळकर्ण व गांवकुळकर्ण येणेप्रमाणें पूर्वापार भोगवटा आहे, त्याप्रमाणें तुह्मीं आपल्या दोनी तक्सिमा वतन अनुभवावें, आमची तिसरी तक्षीम आह्मांस द्यावी, ह्मणजे तुह्मीं आह्मीं समाधानरूप असोन आपल्या विभागाप्रमाणें वर्तावें. ऐसें आह्मी सांगितलें. त्यावरून देशक तर्फ मजकूर व समस्त गोत यांनीं करीना मनास आणून तुह्मांस सांगितलें कीं, यांच्या वडिलीं तिसरी तक्षीम विकत घेतलें आहे, त्याप्रमाणें भोगवटाही चालला आहे, तिसरी तक्षीम देशकुळकर्ण व गांवकुळकर्ण पूर्वी विभागही जाहाला आहे, त्याप्रमाणें याचा यास देऊन तुह्मीं उभय-तानीं समजावें. त्यावरून आमच्या वडिलीं वतन विकत घेतलें, भोग-वटाही पूर्वीपासून चालत आला आहे, याकरितां आमची तिसरी तक्षीम आह्मांस देशकुळकर्ण व गांवकुळकर्ण तर्फ मजकूरची पूर्वील वाट्याप्रमाणें दिली. आह्मी आपली तिसरी तक्षीम अनुभवून सुखरूप असावें. तुमच्या दोनी तक्सिमा वृत्ती देशकुळकर्ण व गांवकुळकर्ण तुह्मीं अनुभवून

असावें. याप्रमाणें तुह्मीं आह्मीं समाधानें असावें. याउपरि तुह्मां आह्मां-मध्यें कथळा नाहीं. ऐसें करून तुह्मीं आपलें पत्र आह्मांस लिहून दिलें, आह्मीं हें आपलें पत्र तुह्मांस लिहून दिलें. याउपरि ज्याकडोन अंतर पडेल तो गोताचा अन्यायी. पान, मान, तश्रीफ, आधीं तुमची, दुसरी आमची. देशकुळकर्णाचा कारभार तुह्मीं आह्मीं दिवाणांत करावा. दफ्तर तुमचे घरीं असावें. दिवाणांतून पुढें वतनमुळें तुमा आमांस मोडीमोडी होईल तें तक्षिमेप्रमाणें वाटोन घ्यावें. सदरहू लिहिलेंयाप्रमाणें देशक तर्फ मजकूर व गोत यांच्या विद्यमानें तुमी आमी समजलों आणि आपले रजावंदीनें एकमेकास पत्रें लिहून दिलीं असेती. त्यास अन्यथा नाहीं. हें पत्र. सही. छ १ माहे शाभान, सुा सीत मया व अलफ. वळी पत्रलेखन, सुमार १३३, एकशे तेत्तीस. याखेरीज सदर वळी ३ तीन.

---

[ ९४ ] अलीफ. ११ मे १७०७.

सर्व राजांत श्रेष्ठ, सर्व उमरावांत थोर, मुसलमानी धर्मरक्षक, राजे शाहू याणीं बादशाही सरकारास संतोष मानून समजावें कीं, महंमद अजीम मारिला जाऊन इकडील फत्ते झाल्यानंतर काय माा झालें तें लिहिण्यांत येत आहे कीं, खुजस्ते बखतर याचें दैव फिरल्यामुळें त्याणें आपले कामगाराचें सांगणें ऐकून इकडील लोभावर लक्ष न ठेवितां लढाईस आला होता. तो छ १० सफर रोज सोमवारीं आपले पुत्रा-सुद्धां मारला गेला व कितेक लोक कांहीं कामास आले. ऐशियास तुह्मीं या गोष्टीचा संतोष मानून अशी ताकीद ठेवावी कीं, तुमचे फौजे पैा कोणी पादशाही मुलखांत पैगामा करूं नये आणि रयतेस इनाम देऊन हे सर्वकाळ इकडील लोभास आपले उद्योगाचें कारण समजत जावें. छ १९ सफर, सन १ जुलूस.

---

[ ९५ ] अलीफ. १९ मे १७०७.

राजे शाहू याणीं बादशाही कृपेचे उमेदवार होऊन जाणावें कीं, तुमचें पत्र पावून लोभास कारण झालें. तुह्मास मनसब व दहा हजारी

स्वाराची सरदारी दिली असे. व बाकीचे व तुमचे सर्व मा। सैद अब-दुल्लखान बहादुर कुतुबुलमुलुख याजकडे सांगितलें आहे त्याप्रमाणें अमलांत आणावें आणि आपला वकील एक तुमचें येणें येथें होई त्यापूर्वी पाठवून द्यावा, ह्मणजे मनसबेच्या सनदा सरकारांतून तयार करविल्या जातील. छ २७ सफर, सन १ जुलूस.

---

[ ९६ ] अलीफ. २३ जून १७०७.

सर्व शूरांत श्रेष्ठ, सर्व उमरावांत थोर, इस्लामीधर्मरक्षकाचे पुत्र, रोज शाहू याणीं पातशाही कृपेतें संतोषी होऊन जाणावें कीं:— तुह्माकडील रायभान वकील याणीं विनंति केली जे, तुह्मी आपले जहागिरीचे महालीं आल्यानंतर इकडे यावयाचा इरादा केला आहे, याजकरितां राणीनें जमीदारीचा फर्मान मिळावा ह्मणोन कृत्रिमानें अर्जी लिहिली होती. तिला व तिचे चिरंजीवास कपटी समजोन त्याचें उत्तर दिल्हें नाहीं. कारण कीं, आमचे मुलकांतील राज्य व जमीदारी तुह्मांकडे असावी आणि तुह्मी आपले वडिलांप्रमाणें तेथें कायम रहावें. नंतर जे किल्ले थोरले पातशाहींतील त्या वेळेस हातीं आले नउते तेहि फौज पाठवून घ्यावे. जाणोन तुह्मी आत्मिक असें समजोन हा फर्मान पंज्यासुद्धां लिहिला आहे. तरी तुह्मीं आपले फौजेसुद्धां जलद येथें येऊन पोहोचणें. ह्मणजे तुह्मावरी कृपा आणि लोभ वारंवार उत्कृष्ट होईल. छ ४ माहे रबिलाखर, सन १ जुलूस.

---

[ ९७ ] अलीफ. १९ आगस्ट १७०७.

सर्व राजांत श्रेष्ठ, सर्व उमरावांत थोर, मुसलमानी धर्मरक्षक, राजे शाहू याणीं बादशाही कृपेचे उमेदवार होऊन जाणावें कीं, सांप्रत ईश्वर कृपेंकरून आमची फत्ते होऊन सिंहासनाधिरूढ झालो. तुमचे निष्ठेविशींचा मजकूर अमीरुलउमराव याणीं समजाविला. ऐशीयास तुह्मीं पेशजी प्रमाणें इकडील लक्षांत वागवोन मशारनिल्हे लिहितील तशी वर्तणूक करीत जावी. छ २ जमादिलाखर, सन १ जुलूस.

---

[ ९८ ] श्री. ९ अक्टोबर १७०७.

स्वस्तिश्री राज्याभिषेक शके ३४ सर्वजित् संवत्सरे कार्तिक बहुल सप्तमी सौम्यवासरे क्षत्रियकुलावतंस श्रीराजा शिव छत्रपति याणीं राजमान्य राजश्री सदाशिव परशराम यांसी आज्ञा केली ऐसी जे:—राजश्री नारो पंडित स्वामीच्या दर्शनास आले होते. हालीं आज्ञा घेऊन विजयदुर्गी रहावयास आले आहेत. ऐशास, यांचा घरटाव जिभींमध्यें आहे. बहुत दिवस तेथें राहात आहेत. प्रस्तुत ते जागां राहातील. तरी तुह्मीं हरएकविशी परामर्ष करून सुखरूप राहात असे करणें. नोबती दोघेजण पहिलेपासून याकडे होते तसे देणें. प्रयोजन प्रसंगीं सुतार गौंडा मागतील तो जंजिऱ्याकडून देववित जाणें. याकडील माणसांशीं परवानगी रसानगीविषयीं व वरकड कोण्हेविशीं कटकट होऊं न देणें. यांचें कर्जवाम कोणीं देणें असेल तें रास्ती घेतील. तेविषयीं इस्कीलकी कथळा न करणें. बहुत काय लिहिणें.

मर्यादेयं
विराजते.

---

[ ९९ ] श्री. ७ अक्टोबर १७०७.

श्रीशिवनरपति<br>हर्षनिदान। मोरे-<br>श्वरसुत नीळकंठ<br>प्रधान.

श्रीआईआदिपुरुष<br>श्रीराजाशिवछत्रपति<br>स्वामी कृपानिधि। तस्य<br>परशुराम त्र्यंबक<br>प्रतिनिधि.

स्वस्तिश्री राज्याभिषेक शके ३४ सर्वजित् संवत्सरे कार्तिक बहुल नवमी भृगुवासरे क्षत्रियकुलावतंस श्रीराजा शिवछत्रपति याणीं राजश्री सूर्याजी इंगळे मुद्राधारी जंजिरे विजयदुर्ग यासी आज्ञा केली ऐसी जे:— जंजिरे मजकुरीं जिभींमधें राजश्री नारो पंडित यांचा वाडा आहे. तेथें

त्याणीं आपले कारभारी वेदमुर्ति रघुनाथभट्ट ठेविले आहेत. ऐशियास, तुह्मीं त्यास ह्मणता जे, तुह्मीं आणले ठाईं राहणें, तें घर नामजाद लोकांस रहावयास देणें. तरी ऐसी गोष्ट ह्मणायास तुह्मांस प्रयोजन काय आहे? पंडित मशारानिल्हे हुजूर दर्शनास आले होते. यांा स्वामीनीं मागती जंजिरे मजकुरास जावयाची आज्ञा केली आहे. हे येऊन आपल्या वाडियांत राहतील. यांच्या परामर्षास अंतर पडो न देणें. याकडे पहिलेपासून जंजिरे मजकुरपैकीं नोवती दोघेजण होते, तैसे पुढें यांकडे असों देणें. पंडित मानिल्हे आपल्या वाडियाच्या जाग्यावरी श्रीचें देवालय व्हानसें बांधणार आहेत. त्यास अलिगौडा देवालय बांधायाच्या कामास नेहमीं यांकडे देविला असे. तरी देवालय मुस्तेद होय तोंवरी अलिगौडा यांकडे देणें. त्याचा रोजमुरा जंजिरे मजकुरपैकीं पावतो तैसा पाववीत जाणें. जंजिरे मजकुरीं आगत्यागत्य कार्य प्रजोजनास गौडा पाहिजे. तरी पंडित मानिल्हेस सांगोन पाठवीत जाणें. हे पाठवून देत जातील. व यांच्या दोन बागा आहेत. त्यास कांहीं कोणाचा उपसर्ग लागो न देणें. बागाखालील जमीन जे आहे त्यांत कोणी शेत पोत करील तरी यांचे आज्ञेखेरीज करूं न देणें. लेखनालंकार.

मर्यादेयं विराजते.

---

[ ६० ]  श्री आई आदिपुरुष.  १७०८.

विनंति उपरी. स्वामीनीं लिहिलें कीं, कितेक विचार सुचत जाईल, तो लिहून पाठवीत जाणें. ह्मणून लिहिलें कीं, स्वामी वडील आहेत. दया करून जें लिहिलें तें मनांत दयाच येऊन लिहिलें. श्री स्वामीस सुचला विचार आह्मीं ल्याहावा हें आह्मांस अधिकारच आहे. स्वामीच्या यशें राजियांचें कल्याण. त्यामुळें आह्मीं अवघे सुखी. आज्ञेप्रमाणें कितेक विचार सुचला, तो त्रिवर्गापाशीं सांगितला आहे; ते निवेदन करितील. त्यामध्यें जो उपेगाचा असेल तो मनास आणावा. नसेल तो राहूं द्यावा. शामळासी सख्य कोणे

रीतीनीं करावें ह्मणून लिहिलें. तरी शामल सलियास तूर्त येतो, हें तो दिसत नाहीं. कदाचित् आलाच तरी चौथाई देऊं करावी, आणि तह करावा, याहीमधें प्रसंग पाहून जें कर्तव्य तें करावें. कबिला सिंहगडीहून आणावा, कीं तूर्त न आणावा ह्मणून लिहिलें. तरी सिंहगड आपले हातीं असेल तरी चार दिवस कबिला आणूं नये. एक स्वारी मात्र आणावी. पुढें वेळ पडेल त्यासारिखें करावें. राजश्री नरहरिपंत देखील तेथेंच असों देऊन ते जागा आपल्या हातीं असो द्यावा. कुल अवघें वळण त्यातोंडें पडणार. गनीम विशाळगडास यंदा येतो, यास संदेह नाहीं. तेधवा दुसरा जागा सरदारी करावा ऐसा नाहीं. याजकरितां हा विचार स्वामीनीं मनांत आणून जें कर्तव्य तें करावें. आह्मांस सुचल्यासारिखें लिहिलें आहे. कृपा असो दीजे. हें विनंती, स्वामीनीं चिरंजीव आपाची बेडी तोडविली ह्मणून लिहिलें तरी सर्व संकट स्वामीसच आहे. चिरंजीव माधवरायाचीही बेडी तोडविली स्वामीनीं असेल. सकळही मान अपमान आमचा स्वामीस आहे. विशेष काय लिहिणें. हे विनंति.

---

[ ६१ ] श्री आई आदिपुरुष. १७०८.

विनंति उपरि. स्वामीनीं दया करून राजश्री नरसिंहपंत व तिमाजीपंत व धनाजी घाटगा याजसमागमें पत्र पाठविलें. कितेक स्वमुखें निरोप सांगोन पाठविला आहे. तें केवळ आपलीं वचनें हे सांगतील ते ह्मणून स्वामीनीं लिहिलें. पत्रार्थ व निरोप एकोन बहुत समाधान झालें. स्वामीच्या निरोपाचें प्रतिउत्तर तिवर्गाजवळ सांग सांगितलें आहे, तें निवेदन करितां चित्तारूढ होईल. स्वामीनीं आज्ञा सांगोन पाठविली तदनुरूप श्रीवरील पुष्पें व रोटी ऐसी शपथ पाठविली आहे. स्वामीनीं एक तिळतुल्य चित्तांत आनसारिखी गोष्टी येऊं न द्यावी. आमचें चित्त निखालस स्वामीच्या पायाशीं आहे. परिणामींही कळों येईल. हें जीवित आहे तें केवळ स्वामीच्या अन्नाचें आहे. त्याहीमधें ह्या प्रसंगीं केवळ आमच्या जीवाचेंच आदान होतें. परंतु स्वामी प्रसंगीं होते.

स्वामीनीं दया करून प्राण वांचविला. हे गोष्टीचा कृतोपकार आहे. जोंवरी आयुष्य असेल तों विसार पडणार नाहीं. स्वामीनीं आमचा सर्वस्व अभिमान धरिला तरी जें आमचें वंशजपण असेल तदनुरूप उत्तीर्ण होऊन श्री करील तरी स्वामीची कीर्ति दिगंतरीं प्रसार व्हावी ऐसाच अर्थ होईल. हें स्वामीस पूर्ण भरंवसा असावा. याउपरी स्वामीनीं कांहीं मनांत संदेह येऊं नेदून पत्रीं संदेहास्पद लिहित न जावें. स्वामीचें उत्तमपण आहे, तें स्वामी करितात. आह्मीं अधम कृति चित्तीं आणिली तीं इहलोकीं निंद्य. परलोकीं तो विश्वासघातकातें, नरो नरकं याति यावत् चंद्र दिवाकरौ, हा प्रसंग जो अधमपणा करील त्याचे पदरीं पडेल. स्वामीनीं विमलहस्तें श्री पूजिला आहे तावत्कालपावेतों अभिमान आहेच. ऐसा प्रसंग आहे. याविसीं विशद लेखन करावें तरी पत्रार्थ विशेष वाढतो. राजश्री रायमानजी राजे व आपण हे गोष्टी अंगीकार केला आहे, यामुळें बहुतांचें द्वेष पडतात पदरीं ह्मणून स्वामीनीं लिहिलें; तरी राजश्री रायमानजी राजे आणि स्वामी ऐसे आह्मी दोन्ही लक्षीत नाहीं. त्याहीमध्यें या प्रसंगीं त्याहीं दया केली. याहून उत्तम तें काय आहे? उभयतांनीं हे गोष्टी अंगिकारिली. स्वामीस ऐसें पुरतें चित्तांत येऊं द्यावें कीं, या गोष्टीनीं स्वामीची व त्यांची कीर्ति बहुत होते. आणि स्वामीनीं आपला पाठिंबा उभा केला, ऐसें चित्तांत येऊं द्यावें. वरकडांचे द्वेष पदरीं पडतात, ह्मणून लिहिलें तरी श्री समर्थ आहे. स्वामी आह्मीं आणि राजश्री रायमानजी राजे ऐसे एकचित्त असतां जरी आभाळ पडत असेल त्यास हात देऊं. तेथें वरकड प्रसंग ते काय आहेत? स्वामीस काय न कळेसा प्रसंग आहे तो विशद लेखन करूं! स्वामीनीं तो तैकल आमचेविशीं केलेंच आहे. त्यास श्रीस्वामीस उत्तर काय? यश पदरीं घालेत ऐसा पुरता भरंवसा असो दिला पाहिजे. आपण स्वामीस मल्हारराऊ सेना घेऊन निपळुणास येणार. यानिमित्य जातो. तुह्मी आहां तेथें आठ पंधरा दिवस असणें, बहुतसा राबिता होऊं न देणें, या दोनीच्या विचारें असिलें पाहिजे, ह्मणून स्वामीनीं

लिहिलें. तरी, स्वामींनीं पूर्वीं जे रीतीनें ठेविलें त्या रीतीनें दोन मास क्रमिले. याउपरी जे रीतीनें आज्ञा केली तदनुरूप रहाटी करून. परंतु स्वामीची दया जालियाउपरी किंचित् भाग राहिला तो राहूं देणें हें उचित नाहीं. वरकडाचे उपरोध स्वामींनीं किमपि चित्तांत येऊं न द्यावें. याहींमध्यें जे स्वामी आज्ञा करितील तदनुरूप रहाटी केली जाईल. स्वामींनीं लिहिलें कीं, आठ पंधरा दिवस. त्यास हें पत्र स्वामी-पाशीं पावे, तों आठ दिवस जाले. एका शब्दाचा तो नियत वारला. दुसरे शब्दास आठ दिवस अवकाश रहातो. यामधें स्वामीस श्री प्रेरील तें करावें; परंतु आतां उचित आहे कीं, आमचा श्रम परिहार सत्वर करावा. हें उचित आहे. स्वामींनीं लिहिलें कीं, भोजन करून खुशाल असणें. तरी, स्वामीची दया जाली तेधवां खुशालच आहों. भोजन श्रीचे आणि स्वामीचे पाय पाहूं तेधवा होईल. फराळ घेतों. खुशाल स्वामीचें पत्र पाहून आहों. वरकड साकल्य वर्तमान त्रिवर्ग सांगतां कळों येईल, कृपा असो दीजे. हे विनंति.

---

[ ६२ ] श्री. २८ फेब्रूवारी १७०८.

राजश्री खेमसावंत भोसले सरदेसाई पा। कुडाळ व महालानिहाय गोसावी यांसी :—

छ अखंडितलक्ष्मीअलंकृतराजमान्य प्रतिराजश्री राजा शिवछत्रपति. उपरि. सांप्रत राजश्री शाहूराजे यांचा फितवा निर्माण होऊन राज्यांत डोहणा जाहला. कितेक सेवकलोकीं अवक्रिया करून जाऊन, त्यास मिळोन, अनसारिखी वर्तणूक आरंभिली आहे. या प्रसंगें तुह्मीं स्वामीशीं निष्ठा धरून, निर्व्याजत्वें, एकरूप निष्ठेनें वर्तणूक केली. व राजश्री विश्राम अनंत व जीवाजीराम यांस कितेक आपले निष्ठेचा अर्थ हुजूर सांगोन पाठविलें कीं, आपण त्रिकर्णशुद्धीनें स्वामीशीं निष्ठेनें वर्तणूक करून, शाहूराजे यांकडे अनुसंधान लावणार नाहीं. सर्व प्रकारें स्वामीची सेवा करून प्रयोजनप्रसंगीं स्वामीचे आज्ञेप्रमाणें आपणाकडील हशमांचा जमाव स्वामीचे सेवेसी देऊन, आणि त्यांचा पराजय करून,

सर्वस्वें स्वामीची सेवा करून, स्वामीस संतोष पाववून, स्वामीनीं कृपाळू होऊन आपणाकडे पा। कुडाळ व चांदे व डिचोळी व सांखळी व मणेरी व पेंडणें, हे सहा महाल वतनदाखल मुकासा चालवावे, ह्मणोन विनंति सांगोन पाठविली. ते या उभयतांनीं हुजूर येऊन निवेदन केली. त्यावरून स्वामीनीं तुमचे प्रामाणिकतेचा व एकनिष्ठेचा अर्थ चित्तात आणून राजश्री रामचंद्र नीळकंठ अमात्य हुकमतपन्हा यांस व राजश्री गिरजोजी यादव यांस आज्ञा केली. याचे भेटीस तुह्मीं माणगांवीचे मुक्कामीं येऊन भेटी घेतली आणि आपलें वृत्त यांस निवेदन केलें कीं, आपण राजश्री स्वामीसीं एकनिष्ठेनें वर्तत आहों, पुढेंही स्वामीची सेवा एकरूप निष्ठेनें करून शाहूराजे यांकडे अनुसंधान लावणार नाहीं, त्यांसी विरुद्धाचरणें वर्तोन, ये गोष्टीस अंतर पडणार नाहीं. ह्मणून, एकान्तः-करणें, आपल्या आराध्य देवाची क्रिया करून वर्तावयाचा निर्वाह केला. तो अर्थ विशदेकरून यांहीं स्वामीस श्रुत करून तुमचें चालवायाविशीं विनंति केली. त्यावरून मनास आणितां तुह्मीं ह्मणजे वंशज घराणदार, प्रामाणिक, एकवचनी आहां. सदरहू लिहिल्याप्रमाणें अकृत्रिमभावें स्वामीची सेवा करून स्वामीस संतोष पाववाल, क्रियेस अंतर करणार नाहीं, हा अर्थ दृढतर चित्तारूढ जाला. आणि स्वामी संतोषी होऊन तुमचें मनोमीष्ट सिद्धीस पाववावें हें अगत्य जाणून पा। कुडाळ व चादे व डुचोळी व पेंडणें व सांखळी व मणेरी या महालीं देवाब्राह्मणांचें इनाम सर्वमान्य स्वामींचे सनदेनें आहे तें व वतनदारांचें इनाम खेरीज करून व वरकड गडाकिल्लियांचा व जंजिरियांचा तनहा व हशमांचा दुमाला सालाबाद तागायत सालगुदस्ता चालत आला असेल तो पुढेंही साल दर साल पाववीत जावा आणि सदरहू माहाल तुह्माकडे वतनादाखल चालवावे, ऐसी आज्ञा करून सनद निराळी सादर केली आहे, त्याप्रमाणें स्वामी तुमचे चालवितील. हालीं स्वामींनें तुह्मांकारणें हत्ती १, घोडा १, उरानबाव १, गुस्त १, येणेप्रमाणें पाठविलें आहे. घेणें. आणि लिहिलेप्रमाणें स्वामीसीं निष्ठेनें वर्तणूक करीत जाणें. स्वामी तुमचें चालवाया अंतर करणार नाहीं.

सुहुरसन समान मया व अलफ, छ. १७ माहे जिल्हेज. बहुत काय लिहिणें.

मर्यादेयं
विराजते.

---

[ ६३ ] श्रीरामोजयति. २९ मार्च १७०८.

स्वस्तिश्री राज्याभिषेक शक ३४ सर्वधारी संवत्सरे चैत्रबहुल पंचमी भोमवासरे क्षत्रियकुलावतंस श्रीराजा शाहूछत्रपति स्वामी याणीं समस्त राजकार्यधुरंधर विश्वासनिधि राजमान्य राजश्री नारो पंडित यासी आज्ञा केली ऐसी जेः—तुह्मीं आपलें वृत्त विस्तारें रा। गीरजोजी पिसाळ यास लिहून पाठविलें होतें तें पत्र बजिन्नस त्यांणीं स्वामीचे सेवेसी पाठविली. यावरून लिहिला आशय विदित जाहला. त्याचा सारांश हाच कीं, आपणास बंधूचा आग्रह सिंधुदुर्गास जावें, व तेथून आमंत्रणही साक्षेपयुक्त आलें आहे. त्यास, आपण निश्चय स्वामीसमीप यावें. याकरितां लोकांची स्वारी पाठऊन घेऊन जाणें ह्मणून लिहिलें. त्यावरून तुमचे निष्ठेचा अर्थ कळोन स्वामी संतोषी जाहले. तुह्मीं पुरातन लोक, स्वामीचे ठायीं आर्त धरितां, तुमचा संग्रह करून चालवावें, यापेक्षां स्वामीस आवश्यक तें काय आहे? प्रस्तुत, हें पत्र तुह्मांस लिहिलें असे. तरी गिरजोजी पिसाळ याजकडील लोक तुह्मांस बलावण्यास पाठविले आहेत. तुह्मीं स्वार होऊन अविलंबें दर्शनास येणें. तुमचे बहुमान गौरवास अंतर होणार नाहीं. प्रयोजन प्रसंगाचा अर्थ तुह्मीं कितीक लिहिला होता. तरी तुह्मीं कार्यभाग करावे, आणि स्वामीस संतोषी करावें, हें उचित आहे. तदनुरूप दर्शनास येऊन स्वामीस संतोषी करून आपला मनोदय सिद्धीस पाववून घेणें. जाणिजे. बहुत लिहिणें तर तुह्मीं सुज्ञ असा.

मर्यादेयं राजते.

---

[ ६४ ] श्री. २३ मे १७०८.

स्वस्तिश्री राज्याभिषेक शक ३५ सर्वधारी संवत्सरे, ज्येष्ठशुद्ध चतुर्दशी मंदवासर क्षत्रियकुलावतंस श्री राजा शिवछत्रपति यांणीं समस्त राजकार्यधुरंधर विश्वासनिधि राजमान्य राजश्री परशराम पंडित प्रतिनिधि यास आज्ञा केली ऐसी जेः—तुमचेविसीं कितिएक राजश्री रामचंद्र पंडित अमात्य याणीं विनंती केली. ऐसियास, तुह्मीं स्वामींचे, हितकृतकर्मे, विश्वासू सेवक आहां. तुमचें सर्व प्रकारें चालवणें स्वामीस अगत्य आहे. याकरितां तुह्मीं कांहीं संदेह न धरितां व कांहीं अनमान न करितां पत्रदर्शनीं स्वार होऊन संतुवा यासह वर्तमान निघून स्वामीसंनिध दर्शनास येणें. स्वामी तुमचें पूर्ववत् चालवितील. येविशीं आनसारिखें कांहीं न मानितां सत्वर येणें. येविशीं पंडित मजकूरनिल्हेनीं लिहिलें आहे, त्यावरून कळो येईल. बहुत लिहिणें. सुज्ञ असा.

मर्यादेयं
विराजते.

---

[ ६५ ] श्री. २३ मे १७०८.

स्वस्तिश्री राज्याभिषेक शके ३५ सर्वधारी संवत्सरे ज्येष्ठशुद्ध चतुर्दशी मंदवासर क्षत्रियकुलातंस श्री राजा शिवछत्रपति यांणीं समस्त सेनाधुरंधर विश्वासनिधि राजमान्य राजश्री जयसिंग जाधवराऊ सेनापति जप्तनमुलुख यास आज्ञा केली ऐसी जेः—तुमचेविशीं कित्येक राजश्री रामचंद्र पंडित अमात्य यांणीं विनंति केली त्यावरून विदित जाहालें. ऐसियास, तुह्मी स्वामीचे एकनिष्ठ, विश्वासू, कार्यकर्ते, सेवक आहां. तुमची ही निष्ठा स्वामीच्या पायाशीं आहे. याकरितां सर्व प्रकारें तुमचें चालवणें स्वामीस अगत्य आहे. तरी तुह्मी सर्व प्रकारें आपलें समाधान असो देऊन कांहीं अनमान न करिता व कांहीं संदेह न धरितां तेथून निघोन सदुवा यासहवर्तमान स्वामीसंनिध दर्शनास येणें. स्वामी

तुमचें पूर्ववत् विशेषात्कारें चालवितील. येविशीं सविस्तर पंडित मशार-
निल्हेनीं लिहिलें आहे. त्यावरून कळों येईल. बहुत लिहिणें. सुज्ञ असा.

मर्यादेयं
विराजते.

---

[ ६६ ] श्री. २३ मे १७०८.

स्वस्तिश्री राज्याभिषेक शक ३५ सर्वधारी संवत्सरे ज्येष्ठशुद्ध चतुर्दशी मंदवासर क्षत्रियकुलावतंस श्री राजा शिवछत्रपति यांणीं राज-मान्य राजश्री खंडप्रभू चिटनवीस यास आज्ञा केली ऐसी जेः—तुमचेविशीं कित्येक राजश्री रामचंद्र पंडित अमात्य यांणीं विनंति केली त्यावरून कळों आलें. ऐसियास, तुह्मी स्वामींचे कदीम विश्वासू सेवक आहां. तुमचे हातें सेवा घेऊन तुमचें चालवणें स्वामीस अगत्य आहे. याकरितां कांहीं संदेह न धरितां, व अनमान न करितां, विलंब न लावितां, तेथून स्वार होऊन स्वामींसंनिध दर्शनास येणें. स्वामी तुमचें पूर्ववत् चाल-वितील. येविशीं आनसारिखें न मानितां सिताब स्वार होऊन येणें. येविशीं सविस्तर पंडित मशारनिल्हेनीं लिहिलें आहे त्यावरून कळों येईल. जाणिजे. बहुत काय लिहिणें.

मर्यादेयं
विराजते.

---

[ ६७ ] श्री. १४ अक्टोबर १७१०.

६ मा। अनाम. देशमुख व देशकुळकर्णी का। ठाण सुभा प्रा। पनाळे यांसी —

रामचंद्र नीलकंठ अमात्य हुकमतपन्हा सुा। इहिदे अशर मया अलफ. वेदमुर्ती राजश्री बाळंभट बिन विश्वनाथभट, जोतिषी उपनांव वडणगेकर, सूत्र आश्वलायन, गोत्र गार्ग्य, हालीं वास्तव्य कसबे कोल्हापूर हे बहुत थोर, योग्य, शिष्ट, जोतिष विद्येंत निपुण, सिद्धांतावगत आहेत. जोशी

यासी: कुडाळकर सांवत याणें राजश्री छत्रपती स्वामीच्यापाशीं दुर्बुद्धि धरून दुष्टाचरण आरंभिलें होतें. त्यास नतिज्या पावायानिमित्य आंगेज केला. ते प्रसंगीं याणीं मुहूर्त पाहोन दिला. त्या मुहूर्तें वाडीवरी चालोन घेऊन वाडी घेतली. फत्ते झाली. यास्तव यावरी संतोषी होऊन यास नूतन इनाम कर्यात मार पो विसी पांढाच्या विवियानें अव्वल तुमसीम तिन्ही प्रतीची जमीन चावर एक बितपशील:—

मौजे वडणग अर्धा चावर ०॥०

मौजे भुये तीस बिघे ०।०

मौजे निगवे तीस बिघे ०।०

येणेंप्रमाणें एक चावर सदहूप्रमाणें जमीन दिली आहे. यापो एक तक्सिमा किर्दी व तीन तक्सिमा पडी, कुलबाब, कुलकानू, हालीपट्टी, व पेस्तरपट्टी सहित खेरीज हकदार इनामदार करून, दिल्ही असे. तरी सदहू जागा मोजून चतुःसीमा करून देऊन यास व याचे पुत्रपौत्रीं वंशपरंपरेस उत्तरोत्तर चालवीत जाणें. नव्या पत्राचा आक्षेप न करणें. या पत्राची तालीक लिहून असलपत्र परतून मोगवटियास यो जवळ देणें. सदहू जागा इनाम देविली आहे. ये विषयीं अलाहिदा देशाधिकारी यांच्या नावें सादर आहे. त्याप्रमाणें ते दुमाले करून देऊन चालवितील. जाणिजे. छ २ रमजान. निदेश समक्ष.

बार.

---

श्रीरमाकांत. २७ फेब्रूवारी १७११.

राजश्री रामचंद्र पंडित अमात्य यांसी:—

प्रति श्रीमंत मातुश्री ताराबाई. उपरि. तुह्मी पत्रें पुरवणिया ३ तीन पाठविल्या त्या प्रविष्ट झाल्या. त्यामध्यें लिहिलें कीं, सातारियास राजश्री केसो त्रिमल आहेत, त्यांकडे राजकारण करून खल करून पहावा. याकरितां राजश्री हिंदुराव व राजश्री गिरजाजी यादव याचे विद्यमानें पत्र पाठविलें आहे, कीं तुह्मी मातुश्री साहेबांचे पायांसी निष्ठा

धरून ज्या स्थळीं आहां तें स्थळ हस्तवश करून देणें, आणि आपला मजुरा करून घेणें. येवढें कार्य संपादिलियावर तुगचे नातु, निळोपंताचे स्त्रीचे पदरीं घातले आहेत, त्यास पेशवाई द्यावी. तुह्मी सर्वस्वें कारभार करावा. येविषयीं आह्मी धण्याजवळी विनंती करून अभीष्ट सिद्धीस पावितों ह्मणून विशदर्थें पत्र पाठविलें आहे. त्यांचे पुत्र राजश्री बापूराव केशव याकरवीं लेहविलें आहे. जरी साहेबाचे पुण्येंकरून तिहीं हात दिल्हा तरी मातबर स्थळ हस्तगत होतें, फिरोन मनसबाच उभा राहतो, याकरितां पत्रें पाठविलीं आहेत ह्मणून लिहिलें तें अक्षरशा विदित जालें. तुह्मी जो खल अगर श्रम कराल तो आमच्या स्वहिताचाच कराल, यदर्थीं सर्वविषयीं भरोसा तुमचा मानिला आहे. याकरितां तुह्मीं जीं पत्रें पाठविलीं तीं उत्तम पाठविलीं. त्याणीं निष्ठा धरून कार्यसिद्धि केली. यावरी त्याचें अभीष्ट तुमचें वचनाप्रमाणें सिद्धीस पाविलें जाईल. राजश्री त्र्यंबक शिवदेऊ मुतालीक दिमत सचीव याचें अनुसंधान राजश्री केसो महादेव व रामचंद्र महादेव यांणीं सांगोन पाठविलें, कीं त्र्यंबकपंतीं स्वामीच्या पायासी निष्ठा धरिली आहे, कीं सांप्रत सैन्यांत आहेत, येथून आपल्या जिल्हेस जावें आणि स्वामीचे पदरीं पडावें; गड किल्ले आदिकरून हस्तवश करून ध्यावे. ये गोष्टीस गड किल्ले तूर्त नातवान पडिले आहेत. त्यांचे बेगमीस दहा हजार रुपये द्यावे, आणि आपणास सरकारकुनीचा हुद्दा दबीरी अगर वाकेनिसी द्यावी ह्मणून व येविषयीं खासा त्याचें पत्र संकलितार्थें आलें त्यावरून राजश्री हिंदुराव व राजश्री गिरजाजी यादव ऐसे बसोन ये गोष्टीचा विचार करून त्र्यंबक शिवदेऊ यासी समाधानाचें पत्र पाठविलें. द्रव्य द्यावें, त्यास चार सहस्र रुपयांची हुंडी महादाजी कृष्ण याजकडे करून पाठविली. राहिलें द्रव्य कार्य सिद्ध होतांच द्यावें ऐसा निर्वा शफतपूर्वक करून दिला. सरकारकुनीचा हुद्दा साहेबाचे आज्ञेवेगळा मात्र करितां नये. याकरितां उभयतांनीं आग्रह केला कीं, हातीचें राजकारण जाऊं देऊं नये. याकरितां तुह्मी वाकेनिसी देतों ऐसें पत्र शफतपूर्वक तुळसी ऐसे पाठवणें. हुद्याविषयीं मातुश्री साहेबास आह्मी उभयता अर्ज

करवून देऊं ह्मणून. त्यावरून याप्रमाणें पत्रें पाठविलीं. जरी साहेबांचे पुण्येंकरून हे गोष्टी संपादिली ह्मणजे थोर कार्य जालें. शाहूराजेयाची कमरच मोडोन हतप्रभ होऊन जाताती. ह्मणून विशदर्थ लिहिलें, कीं ह्मुद्याविषयीं व द्रव्याविषयीं वचन गुंतलें आहे, खरें करावें लागेल ह्मणून. तरी, जी गोष्टी तुह्मीं योजिली, ते उत्तम आहे. आमचें राज्य सुरक्षित जालें. ज्यांणीं या समयांत सेवा केली त्याचें गोमटें न करावें तरी कोणाचें करावें? त्यामध्यें तुह्मा-सारिखे लोक मध्यस्त असतां तुमचें वचन गुंतलें तेंच आमचें वचन. ये गोष्टीस अन्यथा होतें ऐसें नाहीं. त्र्यंबक शिवदेऊ याणें लिहिल्या-प्रमाणें कार्यसिद्धि अविलंबें केली, गडकिल्ले हस्तवश करून दिले, ह्मणजे तुमच्या वचनाप्रमाणें वाकेनिसीचा हुद्दा सांगितला जाईल, व द्रव्याची अनुकूलता केली जाईल. परंतु कारितां कार्य त्वरेनें करावें. जों लष्कर प्रसिद्धगडा खाले आहे तों कार्य जाल्यानें पायेबंद बसोन बाजू सावरते. याकारणें त्वरा होय ऐसी गोष्ट करणें. रायाजी मल्हार याचे मनांत पश्चात्ताप येऊन सांप्रत त्याचें अनुसंधान आलें कीं, आपणा-वरी मातुश्री साहेब दया करितील, पूर्ववत् आपल्या हातें सेवा घेतील, तरी आपण सुभानजी आंग्रेले यासहवर्तमान निघोन त्या प्रांतें जातों, आपल्याकडे दिवाणची हमी आहे ते माफ करावी, व वरातदाराचे गैरादे आहेत त्याचें त्वष्ट न लावावें, पुढें मनःपूर्वक दया करून सेवा घ्यावी, ये गोष्टीचा निर्वाह जालिया लिहिल्याप्रमाणें कार्य करितों ह्मणून. त्यावरून त्याच्या मुद्याप्रमाणें माल करून समाधानपत्रें त्याकडे पाठविलीं आहेत. परंतु जालें वर्तमान साहेबास विदित व्हावें ह्मणून लिहिलें आहे, ह्मणून लिहिलें तें विदित जालें. राजश्री रायाजी मल्हार यास समाधान पत्रें पाठविलीं, उत्तम केलें. ते आंग्रेले देखील निघान जाऊन निष्ठेनें सेवा करूं लागले, तरी सर्व प्रकारें त्याचें चालविलें जाईल. परंतु आतां येवढ्या आठ चौ दिवसांत गेल्यानें कार्याचें. पुढें छावणीस लष्कर जाईल ते समयीं जातों ऐसें ह्मटलियानें लटिकें अनुसंधान ऐसें दिसोन येतें. याकरितां ज्यांणीं राजकारणें लाविलीं आहेत त्यांणीं, जोंवरी

तुह्मीं शाहूराजा रांगणेयाखाले गोऊन पाडिला आहे या संधीमध्यें ज्यांणीं निष्ठा धरिली आहे, त्यांणीं कार्य करून द्यावीं, ह्मणजे तुमच्या प्रयोजनाचीं आहेत. पुढें तुह्मीं शाहूस पराभवातें पाविलियावरी कोण येक शरण येईना. याकरितां तुह्मीं ये गोष्टीची चौकशी करून, ज्यास जें सांगून पाठविणें तें पाठवून त्वरा होय तें करणें. परकी माणूस राजकारणास येईल ते गडावरी घेत नच जाणें. कोणाचे हुनर कैसे असतात हें कळत नाहीं. याकरितां वरचेवरी गडाखालेंच जाबसाल देऊन वजा करीत जाणें. वरकड तुह्मी आपल्याविषयींचा अर्थ कितेक राजश्री बाळाजी माहादेव यासी लिहिला तो सविस्तर विदित जाला. घोड्याकरितां मातुश्रीची दया निदर्शनास आली, ह्मणून लिहिलें, तरी आमची दया अगर लोभ तुमचे ठायीं आहे तो घोड्यावरून अगर वस्त्रपात्राकरून तुमचे निदर्शनास यावा ऐसी गोष्ट नाहीं. तुह्मापेक्षां घोडी अगर आणखी प्रसंग विशेष आहे ऐसें नाहीं. ऐसें असतां तुह्मी घडी घडी मनांत संदेह करावा, हे गोष्टी उचित नाहीं. येविषयीं साहेबीं उदंड सांगितलें अगर लिहिलें तें तुह्मांस प्रमाण वाटतें ऐसें नाहीं. जे गोष्टी निदर्शनास येईल ते करणें. याउपरि तऱ्ही निःसंदेह होऊन राज्याभिवृद्धीस प्रवर्तले आहा, त्याप्रमाणें प्रवर्तोन संतोष पावणें. शाह्मांस तुह्मापेक्षां दुसरें वश्यक आहे ऐसें नाहीं. सर्व राज्यभार तुह्मांवरी टाकिला आहे. श्रीदयेनें तुह्मांस यश येतच आहे. जाणिजे. छ १९ मोहरम. बहुत लिहिणें तरी तुह्मीं सुज्ञ असा.

लेखन

शुध.

---

[ ६९ ] श्री. ६ जून १७१२.

राजश्री सोनजी घोरपडे नामजाद व कारकून कोट कोल्हापूर गोसावी यासीः—

छ अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य राजश्री रामचंद्र नीळकंठ हुकमतपन्हा आशीर्वाद व अनुक्रमें नमस्कार. सुा अर्बा अशर मया

अलफ. राजश्री यादवराव शिवदेऊ नाडगौडा हवेली कोल्हापूर यांणीं विनंति केली कीं, हम गांवगन्ना मोईनप्रमाणें चालत आहे. परंतु गांवगन्ना इनाम व विश्वा जकातीचा धामधुमेकरितां चालत नाहीं. तरी चालविला पाहिजे ह्मणोन विनंति केली. त्यावरून मनास आणून पेशजी चालत होतें त्याप्रमाणें करार करून दिलें असे. तितपशील:—

| जकातीस विश्वा दरबैली रुका एक ८१. | गांवगन्ना दर चावरी बिघा एक ८१. |
|---|---|

एकूण दर बैली रुका एक व चावरी बिघा एकप्रमाणें मोईन करून दिल्ही असे. सदरहूप्रमाणें कळवीत जाणें. हक पेशजी पावत आहे त्याप्रमाणें पावणें. सालदरसाल ताजा सनदेचा उजूर न करणें. तालिक लिहून घेऊन अस्सल पत्र भोगवटियास परतून देणें. जाणिजे. छ २४ जमादिलावल. निदेश समक्ष.

बार सुरु सुद बार.

---

[ ७० ] श्रीराम. ८ आक्टोबर १७१२.

राजश्री सोनजी घोरपडे हवालदार व कारकून, कोट कोल्हापूर, गोसावी यांसी:—

छ अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य स्नो। रामचंद्र नीळकंठ हुकमतपन्हा आशीर्वाद व नमस्कार. सुहुरसन अखा अशर मया व अलफ. शंकरगिरी गोसावी जटाधारी परंपरा दुर्गानाथ हे बहुत भले, परमेश्वरपरायण. यांणें विनंति केली जे,, मौजे वहिरेश्वर कसबा हवेली परगणे मजकूर येथें जलशयनस्थळ रमणीय आहे, तेथें मठ बांधोन राहावें, पुष्पवाटिका लावून जपतप करून असावें, असा हेत आहे, ऐशास, अतीत अभ्यागत येतील त्यांची व्यवस्था लागेल ये गोष्टीच्या सिद्धीस इनाम दिल्यानें राजश्री छत्रपति स्वामीस व स्वामीच्या राज्यास अभिवृद्धि चिंतून असो, ह्मणून. त्यावरून मनास आणितां गोसावी गुरुभक्त निस्पृहवृत्तीनें असतात. यांची मठस्थापना करून

दिल्यानें श्रेयस्कर. अतीत अभ्यागतास अन्न पावेल. तेणेंकरून राज्याचे अभिवृद्धीस कारण आहे. यांस मौजे मजकुरीं अर्धा चावर जमीन इनाम देणें. सन इसनेमध्यें आह्मीं व राजश्री हिंदूराव पन्हाळ्यास स्वारीस आलों ते प्रसंगीं मौजे मजकुरास मुकाम जाहला. तेव्हां श्रीचें दर्शन घेतलें. बहुत जागृत स्थल आहे. पूर्वीं राजश्री थोरले कैलासवासी स्वामींचे वेळेस श्रीचे पूजेस नैवेद्य नंदादीप यांची बेगमी होऊन ऊर्जा चालत होती, अलीकडे चालत नाहीं. ऐशास, हे सनद दिली आहे. जाणिजे. चंद्र २९ रमजान. निदेश समक्ष.

---

[ ७१ ] श्री. १७१४.

पूर्वीं मोंगलाई पादशाही प्रबळ असतां अवघे यवनकर्में या भूमंडळीं होत होतीं. देव, ब्राह्मण, गाई यांचे उच्छेद जाले. तेव्हां श्री देवास संकट पडोन शहाण्णव कुळचे मराठे होते त्यांत जातिवंत मराठे पाहून भोसले, जाधव, निंबाळकर, मोहिते, घाटगे, घोरपडे, पालकर, गुजर, अहीरराव, शिरके, माहाडिक, कांकडे, भाडवळकर, कांटे, ऐसे एकवीस कुळ आईचे व एकवीस कुळ बापाचे निवड करून हिंदुपत सूर्यवंशी व सोमवंशी नेमून राजपदवी दिली. त्यामध्यें ईश्वराचे भजनीं तत्पर, गाईब्राह्मण यांचे प्रतिपालक, अभिमानी, निरंतर भावरत, साधू, सज्जन, भले, रयत प्रतिपालक, दुष्टांचा निःपात करणार, ऐसे योजून, ईश्वरें राजश्री मालोजी राजे भोसले यासी स्वप्नीं अभय देऊन, प्रत्यक्ष गोसावियाचे रूपें येऊन, दर्शन शिखरीं देऊन, भजनास लाविलें. त्यांची स्त्री मातुःश्री उमाव्वा, साठे यांची कन्या होती. उभयतांचें निष्ठाकर्म पाहोन सत्तावीस पिढ्यांचे भोसले यांचे वंशीं राज्यपद दिलें. मालोजी राजे यांनीं शिखरीं तळें बांधिलें, जीवन केलें, जनयात्रा येऊं लागली, इमारती केल्या, व राजश्री लिंगोपंत ब्राह्मण होते, त्यांस देव वरद होऊन त्यांणीं बारव पाडिली. ईश्वर संतोषी होऊन मालोजी राजे यांचे वंशीं पुत्रसंतान दिलें. राजश्री शहाजी राजे भोसले व राजश्री स्वरूपजी राजे भोसले उभयता बंधूः—

राजश्री शहाजी राजे यांच्या स्त्रिया. जिजावा जाधवाची कन्या यांचे पुत्र.

१ रा० शिवाजी राजे
१ संभाजी राजे.
२

शिवाजी राजे यांच्या स्त्रिया.
१ सावित्रीबाई.
१ सईबाई.
२

याचे पुत्र.
१ संभाजी राजे यांची आई सावित्रीबाई.
१ राजाराम यांची आई सईबाई.
२

राजाराम यांच्या स्त्रिया
१ ताराबाईसाहेब.
१ राजसबाई घाडगे.
२

यांचे पुत्र.
१ शिवाजी राजे.
१ संभाजी राजे
२

शिवाजी राजे यांच्या स्त्रिया.
१ पार्वतीबाई
१ भवानीबाई
१ दुर्गाबाई
३

यांचे पुत्र

तुकाऊ इगळे अमदानूरकर यांचे पुत्र एकोजी राजे चंदावरास गेले.

संभाजी राजे यांच्या स्त्रिया.

यांचे पुत्र उमाजी राजे नकल जाहले.

संभाजी राजे यांच्या स्त्रिया.

यांचे पुत्र शाहू राजे याच्या स्त्रिया.

स्वरूपजी राजे भोसले यांची स्त्री गंगाव्वा यांचे पुत्र.

महादजी राजे यांच्या स्त्रिया रखमाऊ याचे पुत्र.
१ विठोजी राजे यांची स्त्री राजसबाई
१ खेळोजी राजे याची स्त्री गोदूबाई.
१ सेखोजी राजे यांची स्त्री सखूबाई.
३

त्रिंबकजी राजे यांच्या स्त्रिया.

संभाजी राजे यांच्या स्त्रिया.

१ उमाबाई.
१ आनंदीबाई.
१ जिजाबाई.
१ ————
१ ————
५

---

[ ७२ ] श्री. १० जुलै १७१४.

श्रीरामचरण
नीलकंठ सोनदेव
शरण.

आज्ञापत्र समर | राज०ुरंधर विश्वासनिधि राजमान्य राजश्री रामचंद्र पंडित हुकम | अल॥ कमाविसदार मौजे नांदवडे ता॥ खारापाटण सुहूर सन खमस अशर मया अलफ. वेदमुर्ती राजश्री अनंतभट्ट बिन महादेवभट्ट उपनाम मुंडले, गोत्र नैधृत्य, सूत्र आश्वलायन, हे भले सत्पात्र आहेत. यांच्या कुटुंबाचा योगक्षेम चालिला पाहिजे. ह्मणून यांसी पूर्वी मौजे मजकूरपैकीं वृत्ती दाभोळी करी ६० साठश्री दिल्ही आहे. त्या खेरीज हालीं राजश्री छत्रपति स्वामींनीं राजश्री अनाजीपंताच्या धारियानें दाभोळी करी २५ पंचवीसाश्री पड जमीन देविली आहे. त्यावरून हें आज्ञापत्र सादर केलें आहे. तरी सदरहू पंचवीस करीची जमीन राजश्री अनाजीपंताच्या धारियानें पड जमीन अवल दूम, सीम, तिन्ही प्रतींची मोजून देविली आहे. येविषयीं किल्ह्याच्या कारकुनास अलाहिदा पत्र आहे. त्याप्रमाणें ते पडी जमीन खेरीज हक्कदार करून मोजून देवितील. त्याप्रमाणें वतनदारांसि ठिकाण खेरीजकरून देऊन यास व यांचे पुत्रपौत्रीं वंशपरंपरेस उत्तरोत्तर चालवणें. नवीन पत्राचा आक्षेप न करणें.

या पत्राची तालीक लेहून घेऊन असलपत्र परतून मोगवटियास वेदमुर्ती-जवळी देणें. छ ४ जमादिलाखर. निदेश समक्ष.

लेखनसीमा.

समुल्लसति.

बार सुरुसुद बार.

---

[ ७२ ] श्री. १ सप्टेंबर १७१९.

श्रीरामचंद्र
चरण । नीळकंठ
सोनदेव शरण.

राजश्री यादोजी पडवळ नामजाद व कारकून, किल्ले गगनगड गोसावी यासी:—

छ अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य ी रामचंद्र नीलकंठ आशिर्वाद व नमस्कार सुा सित अशैरन मया ेफ. माा कान्होजी-राऊ व बापूजीराऊ राणे हे अजिरे प्रांतीं होते. त्यांस पूर्वी पत्रें तुह्मीं पाठविली होतीं व हुजरूनही पाठविली होतीं. त्यास, यांणीं किल्ल्याचे गांवीं व वरकड गांवीं उपद्रव केला होता. याकरितां संकोच धरीत होते. व चांदजीनें यास बुद्धि देऊन नेले. त्यावरी वतनी प्रसंग आहे तो अवघियांनीं विभागें घ्यावा. तोही होऊन न ये याकरितां बाहेर राहिले. त्यास सांप्रत देहावर येऊन निष्ठेनें वर्तावें ह्मणून चित्तीं धरून विनंतीपत्र पाठविलें. त्यावरी सर्व अन्याय क्षमा करून अभयपत्र पाठविलें. त्यावरून भूधरगडचे मुकामीं भेटीस आले. भेटी जाली. राजदर्शन केलें. त्यास रत्नागिरीहून लोकांविशीं लिहिलें. त्यावरून कान्होजीराव खासा व उभयताचे लोक पंचवीस रवाना केले, ते स्वार होऊन गेले. त्यास, यांचा सरंजाम याप्रों लोक असे. याप्र-माणें चालवणें :—

मौजे सागुळवाडी मोकासा जमावास उभयतांच्या दिली. राजपत्र सादर आहे. तुह्मीं याकडे चालवणें. तेथें उपद्रव किरकोळ यास एकंदर लागो न देणें. १

जमीन इनाम पेशजी देविली होती ते चालत नाहीं ह्मणोन विनंति केली. त्यास, तूर्त रत्नागिरीस रवाना केलें. ह्मणोन मेहेरबान होऊन इनाम जमीन भात पड्डिपैकीं देविली, बिघे:—

८९ नांदवडे.
८९ नांदणे.
८२ सेरपे.

———

८१२

हें तुह्मीं नेमून देऊन बिलाकुसूर चालवणें.

खारापाटण तर्फेचे गोविंद टिपसोडी व घाट बावडा येथें चोरघे आहे. त्यास चांदजीच खातो. हे ते चुलत भाऊ. तक्षिम देत नाहीं. याकरितां यांणीं विनंति केली कीं, निमे, त्याचें निमे आपलें उभयतांचें वतन आहे तें चालवावें. त्यावरून आज्ञापत्र सादर केलें आहे. तरी याचे विभाग असतील त्याप्रमाणें तुह्मीं गावगन्ना व जकात्यास सांगोन देवणें. चांदजीराव इस्किल करील तर त्यासही माकुल करून सांगणें. हर्शामर्श याचा त्याचा वाढो न देणें. १

याप्रमाणें बिलाकुसूर चालवणें. तूर्त कबिले पाउसाचे आणितां नयेत. याकरितां राहिले. पुढें कबिले घेऊन येतील. आपल्या वतनावरी राहतील. तुह्मीं सर्वांविशीं यांचें चालवीत जाणें. छ २४ रमजान. बहुत काय लिहिणें.

लेखनसीमा
समुल्लसति.

सुर सुद.

[७४] श्री. १३ सप्टेंबर १७१५.

राजश्री यादोजी पडवळ नामजाद व कारकून, किल्ले गगनगड, गोसावी यांसी:—

छ अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य स्नेहांकित रामचंद्र नीळकंठ आशिर्वाद व नमस्कार. सु॥ सीत अशर मया व अलफ. आर्गोजी कुसुरकर परागंदा होऊन आजरे विलातीस गेला होता. त्यास अभय देऊन आणिला आणि गांवावर पाठविला आहे. तुह्मीं याचें चालवून याच्या वतनाची सेवा गांवावरी घेऊन, गांवाची किर्दी महामुरी होऊन, ऐवज किल्यास पावेतों करणें. याणें विनंति केली कीं, आपण वतनदार आहे, पूर्वीपासून आपला विस्वा व गांवीं जमीन चालत होती ते चालवावया आज्ञा करावी. त्यावरून आज्ञापत्र सादर केलें आहे. बी॥

| | |
|---|---|
| विस्वा जकाती मोंगल शहाआलम कोंकणांत उतरला तोपावेतों चालला, त्या अलीकडे चालत नाहीं, तरी स्वामींनीं चालवावा, ह्मणोन. त्यावरून पत्र सादर केलें. तरी पेशजीं चालत होतें त्याप्रमाणें चालवणें. | जमीन मौजे कुसुर<br>१ पावाची भाटी.<br>१ बसकेची भाटी.<br>१ दखल ठिकाण.<br>—<br>३<br>——जमीन बिते ५ हे पेशजी चालली असेल त्याप्रमाणें चालवणें. |
| १. | १. |

याप्रमाणें याचें मनास आणून चालवणें. आर्गोजी खरा माणूस आहे. यापासून अंतर पडलें असेल, तें क्षमा करून अभयपत्र सादर करून आणून पाठविला आहे. तुह्मीं याचे चालवावया अंतर न करणें. गांवची कीर्दी माहामुरी याचे हातून बरी करवणें. याचे चालवावया अंतर न करणें. छ २४ रमजान. बहुत काय लिहिणें.

सुरुसुद.

[ ७९ ] श्री. २१ मार्च १७१६.

श्रीमंत महाराज राजश्री पंत स्वामीचे सेवेसीः—

विनंति सेवक गोविंद रंगनाथ कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना. स्वामीचे कृपावलोकनेकरून चैत्र शुद्ध नवमी शुक्रवारपर्यंत सेवकांचें वर्तमान मु॥ कल्याणीं यथास्थित असे. विशेष. महाराजांचे दर्शनास वेदमूर्ती राजश्री कान्हो पाध्ये औरंगाबादेहून आले. त्याबरोबरीं आह्मीं आपल्या वर्तीनें प्रसंगाचें वर्तमान स्वामीचे सेवेसी लिहोन पाठविलें होतें, त्यावरून विदित जाहलें असेल. व स्वमुखें उपाध्येबावांनीं निवेदन केलें. त्याप्रमाणें अभ्यंतर्गत अवगत जाहलें असेल. परंतु त्याप्रमाणें पारिपत्य होऊन आलें नाहीं. आह्मीं अवघ्र एक मासपर्यंत मार्ग लक्षिला. त्याउपर आह्मीं निजामउन्मुल्ख व तुरुकताजखान यांची आज्ञा घेऊन स्वार होऊन गेलों. तेव्हां तेथल्या कर्जदारांनीं अडविलें. त्यांची निशा करावयास अवघ्र पंधरा दिवस लागले. शेवट रुपयास जमान गणेश विश्वनाथ आमचे जावाई यांस ठेऊन स्वामीकडे यावयास तयार जाहलों. तों संगमनेरीहून खान अजम महमद उमरखान सुभेदार प्रांत संगमनेर व नाशिक व कल्याणभिंवडी याचें पत्र तुरुकताजखान यांसी व आह्मांस आलें कीं, गोविंद पंडित वकील यांसि पाठविणें, वतनाचा अमल देऊन. त्याजवरून आह्मीं छ १९ मोहरमीं स्वार होऊन संगमनेरास आलों, तों उमरखान बागलाणांत मौजे अभोणें नजीक करेलीमोरेली येथें जाऊन वेढा घालून बैसले होते. तेथें आह्मीं जाऊन त्यांची भेट घेतली. स्वामीचे तर्फेनें त्यास पत्र व अष्टगोळी सह्रा दिधला. बहुत समाधान पावला. त्यांजवर अंमलाचे जप्ताचिठी मागितली. ते ह्मणों लागले कीं, आह्मांस सेरणी काय देतां? तेव्हां आह्मीं बहुत प्रकारें रदबदली केली. परंतु हे मोंगली लोक, त्यांहींमधें पठाणतरीन, आपला हेका न टाकित! दुसरी गोष्ट. पूर्वील कारभारी, जे नुटअल्लीखानापाशीं होते, ते हल्लीं याजपाशीं आहेत. त्यांणीं पूर्वील कबुलायतीची हकिगत त्यांस जाहीर केली. त्याप्रमाणें मागों लागला. तेव्हां आह्मीं बोलिलों कीं; दरबारीं औरंगाबादेस खर्च आह्मांस बहुत

लागला. याकरितां आह्मांस पांच हजार रुपये देवत नाहीं. तेव्हां निदान प्रसंग जाणोन आह्मांशीं शामजी महादेव व रामाजी गोविंद दिवाण यांसी खानानें रदबदलीस घालून पांच हजार रुपये करार केले आहे. याखेरीज त्याचे नायब कल्याणीचे अजम कालेखान व पातशाही दिवाण शरीफ अलीखान व चौधरी व कारमारी व किरकोळी लोक ऐसे मिळोन दोन हजार रुपये पाहिजेत. वग हजर करावयास कापड हजारा रुपयांचें पाहिजे. एकूण सहा हजार रुपये खर्च करावे, तेव्हां तो सोनवळाच्या अदकाराचा अंमल दरोबस्त हातास येतो आणि सुरळीत धंदा चालतो. त्यास ऐवज तो मिळत नाहीं अगर सावकारही मिळत नाहीं. या प्रांतीं काळ बहुत विषम पडला आहे. याकरितां रुपयांस कोण्ही बघत नाहीं. वतनाचें कार्य तो महत् कष्टेकरून कळसास आणिलें आहे; परंतु सहा हजारांकरितां तटोन पडलें आहे. महाराजांस असत्य वाटेल, याकरितां कोणे जातीनें रुपये खर्च होतील त्याची नांवनिसीची याद अलाहिदा पाठविली आहे, त्यावरून विदित होईल व महाराजांस उमरखान यांनीं पत्र लिहिलें आहे त्याजवरून श्रुत होईल. त्यास, स्वामी ह्मणतील कीं, तुह्मांस ऐवज देविला होता, तो आणवून कार्यसिद्धि करावी होती. तरी, स्वामीनें रायाजी प्रभूकडे पांच सहस्र रुपये देविले. त्यांत आज ता। हजार रुपये पावले. त्याचा खर्च कैसा जाहला ह्मणाल तरी, रा। काशीपंत बुंदखानी याचे गुजारतीचे कर्ज रुपये ४९२ फारीख केले. तेव्हां ते गेले. त्याजवर निजामन्मुलुख आले. त्यांची भेट घेतली. तेव्हां त्याचे दरबारी खर्च जाहला. एकंदर जाहला रुपये २०४।. बाकी राहिले रुपये, त्यांपैकीं उमरखानास शेला व किरकोळी नजर व चोपदार व खिजमतगार मिळोन खर्च जाहला रुपये ९४॥. बाकी निवळ ऐवज राहिला तो लोकांदेखील आमच्या पोटास खर्च जाहाला, रुपये २४९।. ऐसे हजार रुपये खर्च जाहले. त्याखेरीज आपणास कर्ज रुपये ८३७ जाहलें आहे. बाकी रुपये रायाजी प्रभूकडे चार हजार राहिले. त्याबद्दल अवरंगाबादेहून त्याजकडे चार वेळां पत्रें

व मनुष्यें पाठविलीं. परंतु त्याजपासून एक रुपया प्राप्त नव्हे. हालीं बाळाजी विश्वनाथ यांच्या कमाविसदारांनीं रायाजी प्रभूचा प्रांत बळकाविला; आणि प्रभूचे कमाविसदार होते ते पळोन रायाजी प्रभूपाशीं गेले. धामधूम बहुत गंगथडीस जाली ते पत्रीं काय ह्मणोन लेहावी? हें वृत्त सविस्तर रा० कानो पाध्ये यांस श्रुत आहे, त्यांस स्वामीनें विचारिलें पाहिजे. आतां तरी खंडेराव दाभाडा व रायाजी प्रभु व नरसोजी मोऱ्या व राजजी थोरात ऐसे एकत्र होऊन, गंगाजी त्रिंबक याचे फौजेस सामील होऊन, त्यासगवेत फौजेनसी येवलें प्रांतें खंडेराव दाभाडे याच्या लेकी दोन व सासू व मेहुणा ऐशीं माणसें सहा अंबोजी देशमुख यांणीं धरिलीं आहेत. तरी सोडवावयास आले आहेत. कोणाचे चाकर हाहि निर्वा कळत नाहीं, ऐसा प्रसंग जाला आहे. याउपर आह्मांस रायाजी प्रभु कोठून रुपये देऊं पाहातो? स्वामीच्या वतनाचें कार्य तो रुपयावीण अटकलें आहे. आह्मीं तो रुपयांचे तरतुदेबद्दल उमरखानाचा निरोप घेऊन फाल्गुन वदि दशमीस कल्याणास आलों. मागाहून खानही येणार आहेत. रुपयांकरितां स्वामीचे शेवेसी विनंती पत्र लिहिलें असे. तरी, कृपाळू होऊन सध्यां पोतांतून वतनाच्या अमलाबद्दल ऐवज तूर्त रुपये ६००० पाठविले पाहिजेत. या उपर अनमान करावयाचा प्रसंग नव्हे. नाहीं तर अपकीर्ति होते. विशेष लेहावें तरी स्वामी धनी आहेत. सेवेसी श्रुत होय.

---

[ ७६ ] श्री. १७१६.

श्रीआईआदिपुरुष
श्रीराजा शिवछत्रपति कृपानिधि। तस्य परशराम
त्र्यंबक प्रतिनिधि.

यादी वतनी मजमू श्रीपाद स्वामी सत्यपूर्ण पन्हाळ्याच्या मुक्कामीं

सन खमसांत माघ बहुल चतुर्दशी शिवरात्रीचे दिवशीं आले. ते समयीं आपली वतनी मजमू दिली होती. त्याचें पत्र सालमजकुरीं सन सीतामध्यें पाठवून दिलें तें जमा वतनी मजमू पत्र १.

शिक्का शिक्का

वतनी पत्र मजमू सत्यपूर्ण श्रीपाद स्वामी या कडील करून दिल्हें तें जमा पत्र १.

---

[ ७७ ] अलीफ. २० फेब्रुवारी १७१९.

सांप्रत अर्ज जाला कीं राजश्रेष्ठ राजे शाहू इकडील लक्षांत वागोन पंधरा हजार स्वारांनसी दक्षिणेचे सुभ्याची कुमक राखितील. त्याजवरून सहा सुभे दक्षिणेचे, त्यांची चौथाई सदरहू स्वारांचे खर्चाबद्दल घेत जावी असें ठरलें. ऐसियास, किल्लेदार, मामलतदार, जहागीरदार व करोडे वगैरे वर्तमान व भावी यांणीं सुभेमजकूरची चौथाई त्यांस देत जावी. ताकीद. छ २२ रबिलाखर, सन १ जुलूस, सुा सन ११३१ हिजरी.

---

[ ७८ ] अलीफ.

सर्व शूरांत श्रेष्ठ, सर्व उमरावांत थोर, इस्लामाचे रक्षक, शाहू राजे यांणीं बादशाही कृपेस आपला सत्कार समजोन जाणावें कीं:—सांप्रत अमीरुलउमराव यांणीं अर्ज केल्यावरून तुमचे कदीम राज्यांतून दहा लक्ष रुपये पेषकषी द्यावयाचें मुकरर करून हा फर्मान तुह्मास लिहून दिल्हा असे. तरी पेषकषीचा ऐवज, चौथाई रोख घेऊन, बाकी किस्तीप्रमाणें द्यावा. आणि सदोदित इकडील लक्षांत वागोन मुलकाची आबादी व मुफसरांस तंबी पोहोचवीत जावी. व इकडील दौलतीची किफायत करण्यांत आपलें कल्याणाचें कारण जाणावें. छ ४ जमादिलोवल, सन १ जुलूस, सुा सन ११३१ हिजरी.

| | | |
|---|---|---|
| ४ तारळें. | ५ कोळें. | ६ मरळी. |
| ७ नाणें वाळें. | ८ पाटण. | ९ निंग. |

(५)

प्रा खटाव तर्फा ११.

| | | |
|---|---|---|
| १ हवेली. | २ मळवडी. | ३ मांगी. |
| ४ निंब. | ५ मायणी. | ६ अळगुंडे. |
| ७ औंद. | ८ विटें. | ९ माळवणी. |
| १० खानापूर. | ११ कळेढोण. | |

(६)

प्रा माणदेश तर्फा ६.

| | | |
|---|---|---|
| १ दहीगांव. | २ वेळापूर. | ३ म्हसवड. |
| ४ आटपाडी. | ५ फलटण. | ६—— |

(७)

प्रा मलकापूर तर्फा ४.

| | | |
|---|---|---|
| १ हवेली. | २ वारुण. | ३ कासेगांव. |
| ४ शिराळें. | | |

(८)

प्रा तारळें तर्फा ५.

| | | |
|---|---|---|
| १ हवेली. | २ असवली. | ३ अरळें. |
| ४ खानापूर. | ५ घोळ. | |

(९)

प्रा पन्हाळा तर्फा १०.

| | | |
|---|---|---|
| १ गळचोर. | २ कोडोली. | ३ सातवें. |
| ४ ठाणें. | ५ बोरगांव. | ६ आहो. |
| ७ अळतें. | ८ रुकडी. | ९ वाळवें. |
| १० वडगांव. | | |

(१०)

प्रा अजरें तर्फा ११.

| | | |
|---|---|---|
| १ हवेली. | २ अंभेरी. | ३ गणेगांव. |
| ४ करटोळी. | ५ अंबोली. | ६ महागांव. |
| ७ येळोशी. | ८ कापशी. | ९ खानापूर. |
| १० लोणी. | ११ नितळी. | |

(११)

प्रा जुन्नर तर्फा १३.

| | | |
|---|---|---|
| १ खेड. | २ नारायणगांव. | ३ निवोज. |
| ४ हिंदुरे. | ५ येळगांव. | ६ मदेखोरें. |
| ७ महाकुंगें. | ८ वेरुळ. | ९ चाकणखोरें. |
| १० वाकेरी. | ११ मनथर. | १२ पावळ. |
| १३ अशेरी. | | |

(१२)

प्रा कोल्हापूर तर्फा ९.

| | | |
|---|---|---|
| १ हवेली. | २ कागल. | ३ रायबाग. |
| ४ साठगांव. | ५ शिवलिंग. | ६ भलम. |
| ७ वाहळ. | ८ भेगळे. | ९ —— |

मलकापूर सरहद्दींत सहा प्रगणे जे खालीं लिहिले आहेत, त्यांचे सरहद्दींत सहा किल्ले राजे शाहू यांचे हातीं आहेत. राजे महसुफ इकडील लक्षांत वागतात त्यापेक्षां या किल्ल्यांचे किल्लेदारांस मनसबा वगैरे नाहींत. यांजला एक हजार रुपये सालीना दर किल्ल्यास बारा हजार रुपये खर्च आहे. परंतु मरुल्याचें जें जमावयाचें तें किल्ल्याकडे खर्चीं मिळून.

| | |
|---|---|
| १ किल्ले महीपतगड. | २ किल्ले भुजंगगड उर्फ राजदुर्ग. |
| ३ किल्ले कागल. | ४ किल्ले महीपाळगड. |

५ किल्ले सुरगड. ६ किल्ले बहादूरगड.

यांचे खर्चास महाल सरकारांतून द्यावे.

१३ प्रा मळगाव. १४ प्रा सुपेगाव. १५ प्रा गदग.
१६ प्रा लक्ष्मेश्वर १७ प्रा भुजंगगड. १८ प्रा कोपळ.
१९ प्रा हल्याळ. २० प्रा नरगुंद.

(२१)

तळकोंकण.

प्रा रामनगर वनदेवीसुद्धां तर्फा—६.

१ चिपळोण. २ नागनाथ. ३ अमरघार.
४ वकुंर्ने. ५ असामती. ६ माळे.

(२२)

प्रा भीमगड तर्फा ५.

१ मांडे. २ पारणें. ३ मर्करें.
४ सांगली. ५ हरोळी.

(२३)

प्रा भिवंडी तर्फा १२ कसबे ५ सुद्धां १७.

१ सुरत. २ दासुद्री. ३ मुरळी.
४ नानारे. ५ गुरेघर. ६ तडे.
७ आगटी. ८ अकुर्ते. ९ राहुडें.
१० खेड. ११ घाग. १२ दुर्गी.
१३ अनूण. १४ इमारताल. १५ माळे.
१६ असेगांव. १७ चंद्रवाडी.

(२४)

प्रा कल्याण तर्फा २०

१ कल्याण. २ अमरनाथ. ३ वाखळ.
४ सोरटी. ५ शेर. ६ वाडा.

| | | |
|---|---|---|
| ७ कोथळेखडाळें | ८ कांत्रळी. | ९ घासें. |
| १० अरुथ. | ११ ओंकारडंग. | १२ बरानपूर. |
| १३ मलठण. | १४ वाशी. | १५ पोळी. |
| १६ झटवळी. | १७ निसाखळ. | १८ मोठे. |
| १९ वासे. | २० चांदे. | |

## ( २५ )

### प्रा महाड तर्फा १२.

| | | |
|---|---|---|
| १ मोरगांव. | २ गोवेळ. | ३ मोत्रे. |
| ४ दिठे. | ५ श्रीवर्धन. | ६ ह्मसवें. |
| ७ निजामल. | ८ वीरवाडी. | ९ मांडगांव. |
| १० मोहरे. | ११ मांडवी. | १२ मोळें. |

## ( २६ )

### प्रा जावळी तर्फा १८.

| | | |
|---|---|---|
| १ वीरवाडी. | २ सोमेश्वर. | ३ वासें. |
| ४ खोरें. | ५ वळें. | ६ वेहळें. |
| ७ कोंडवी. | ८ चांदेश्वर. | ९ त्रिजावळी. |
| १० आठेगांव. | ११ माद्रणी. | १२ माहुली. |
| १३ होतें. | १४ मेढेंखोरें. | १५ जोरखोरें. |
| १६ साळवें. | १७ बालेखोरें. | १८ घरठाण. |

## ( २७ )

### प्रा राजापूर तर्फा १८.

| | | |
|---|---|---|
| १ खारेपाटण. | २ सहस्त्रे. | ३ सौंदळ. |
| ४ राकापूर. | ५ अक्तोळे. | ६ देवरथ. |
| ७ इतघाणे. | ८ हडकरी. | ९ भूवळकोट. |
| १० देवळे. | ११ खळतगांव. | १२ ढेणशी. |
| १३ मारुशी. | १४ शाखंत्ररी. | १५ गडवले. |
| १६ संगमेश्वर. | १७ प्रभावळी. | १८ धामणशी. |

( २८ )

प्रा कोळे तर्फा ५.

| | | |
|---|---|---|
| १ हवेली. | २ शिवनेर. | ३ कडूर. |
| ४ कण्हेरडे. | ५ कडत. | |

( २९ )

प्रा कुडाळ तर्फा १५.

| | | |
|---|---|---|
| १ हवेली. | २ हासवड. | ३ ढवळें. |
| ४ अस्मारे. | ५ बुसरलें. | ६ निघोतीं. |
| ७ नायगांव. | ८ झेळपूर. | ९ मारुळ. |
| १० पइरी. | ११ पाट. | १२ माकडी. |
| १३ बेरडे. | १४ करनोळी. | १५ माणगांव. |

इतर ६ प्रा आहेत.

एकूण ३५.

---

[ ७९ ] अलीफ. ३० जून १७१९.

राजे शाहू याणीं बादशाही कृपेस आपला सत्कार जाणोन समजावें कीं, सांप्रत थोरले बादशाह याणीं कैलासवास करण्यापूर्वी तीन चार दिवस आह्मीं दौलतीचा अधिकार करावा असें सांगितलें. त्याजवरून छ २० रजब सन ११३१ रोज शनिवार तक्तनिसीन जाहालों आणि खजिना व हुकूम शिक्का वगैरे स्वाधीन जाला. याजकरितां तुह्मास हा फर्मान लिहिला आहे. तरी तुह्मीं एविशीचा संतोष मानून पूर्ववत् लक्षांत वागण्यांत आपलें कल्याण जाणावें. आणि अलमअलीखान वजीर व त्याजकडील कामगार व ठाणेदार यासी मदत देऊन असा बंदोबस्त राखावा कीं, बादशाही मुलखांत बंडें वगैरे कोणतेही रीतीनें खराब न करीत. छ० २७ रजब, सन १ जुलूस.

[ ८० ] अलीफ. २२ सप्टेंबर १७१९.

राजे शाहू याणीं बादशाही कृपेस आपला सत्कार समजोन जाणावें कीं, सांप्रत थोरले बादशाह यांस तापाचा आजार होऊन कैलासवासी जाले आणि ईश्वरकृपेनें आह्मी राज्याधिकारी जालों. सा। तुह्मास फर्मान लिहिला आहे. तरी तुह्मींही येविशीचा संतोष मानून पेशजीची प्रों इकडील लक्षांत वागवण्यांत आपले बढतीचें कारण समजोन अब्दुलखान वजीर व त्याजकडील उमराव यांसी सख्य राखून सुभेदार व ठाणेदार यास मदत देत जावी आणि असा बंदोबस्त राखावा कीं, कोणीही मुफसद बादशाही मुलखांत बंड न करूं शके. छ १९ जिलकाद, सन १ जुलूस.

---

[ ८१ ] श्रीरामचंद्र. १७२०.

यादी. पहिले बोली आहे जे:—

सातारियापासून जिल्हा घ्यावा, गडकिल्ले कोट स्वाधीन करून देऊं, ऐसें महाराज राजश्रींचें वचन आहे. स्वहस्तें यादी आहे. शपथ देऊन आणिलें. त्यास, येथें धणियास विचार पडला. समर्थ लोकीं वचन दिलें तें सत्य करावें, हें उत्तम आहे. पुढें राज्य सुटेल. सेवा घ्यावी. याचें संकटच पडलें असेल, तर निदानी :—

| जिल्हे | किल्ले कोट ताबीन करावे. |
|---|---|
| १ कऱ्हाड सुभा. | १ वसंतगड. |
| १ मिरज सुभा. | १ महीमंतगड. |
| १ पन्हाळा सुभा. | ——— |
| १ मलकापूर सुभा. | ——— |
| १ तारळे सुभा. | ——— |
| १ आजरें सुभा. | —— |
| १ बेळगांव सुभा. | कोट वडगांव. |
| १ हुकेरी सुभा. | कोट इसलामपूर. |

| | |
|---|---|
| या प्रांतें आमचीं वतनें व इनाम गांव आहेत. मुा या यादीप्रमाणें पत्रें करून द्यावीं. | कोट अष्ट. कोट शिराळें. याचा बळें पुढें राज्य सोडवूं. धणियाचें पुण्य, आमचे कष्ट. |
| मूतालिकाचा सरंजाम बोलीप्रम", बहुमान हत्ती, घोडे, भूषणें. | मदतीस सरंजामी फौज<br>२ हुजूर पथकें.<br>१ रायाजी जाधव.<br>१ ———— |
| साहित्य पत्रें.<br>सरदारास व काटकास देशक सनदा व ताकीद् पत्रें. | १ शिदोजी थोरात.<br>२ सेनापतीकडील फौज पथकें दोन हजार.<br>—<br>९ |
| | आह्मांकडील नीा चाकर व कारकून, ब्राह्मण यांचीं गांव वतनें पत्रें करून द्यावीं. |

येणेंप्रमाणें द्यावें. धणियाची क्रिया सत्य होईल. आह्मीं एकनिष्ठेनें सेवा करूं. नाहींतर शेवटीं निरोप द्यावा. छ.

---

[ ८२ ] श्री. १७२३.

श्री राजा शंभु-
छत्रपति चरणीं
तत्पर । बहिरजीसुत
रत्नोजी साळोंखे
निरंतर.

अज दिवाण कोट कोल्हापूर ता। गोकदमानी बहिरेश्वर कर्यात हवेली सुहूरसन आर्बा अशरैन मया अलफ. मौजे मजकुरीं शंकरगिरी गोसावी हे बहुत थोर अतीत त्यास श्री देवाची भक्त्युत्तमविशिष्ठ ऐसें जाणोन महाराज राजश्री स्वामीनीं पेशजी पड जमीन इनाम ०॥० निग्रचावर दिला आहे. त्यापैकीं कांहीं कीर्दी जाहली आहे. कांहीं जमीन कीर्दी होणें आहे. त्यास गोसावीचावास जमीन सदरहूप्रमाणें कुल अवघी नेमून देणें आणि त्यांचें इनाम अविछिन्न चालवणें. जमिनीस खलेल एकंदर न करणें. या पत्राची प्रती लिहोन घेऊन असल पत्र भोगवटियास गोसावी यापाशीं लिहून परतून देणें. जाणिजे. रवाना. मोर्तब सुद.

मोर्तब
सूद.

---

[ ८३ ] श्री. १ जानेवारी १७२३.

श्री
राजा शंभुछत्रपति हर्ष-
निधान । रघुनाथसुत
तिमाजी पंडित मुख्य
प्रधान.

श्री आई आदिपुरुष श्रीराजा
शंभुछत्रपति स्वामी कृपानिधि ।
तस्य कृष्णाजी परशुराम
प्रतिनिधि.

स्वस्तिश्री राज्याभिषेक शके ५० शोभकृत्‌नाम संवत्सरे पौष बहुल द्वितीया सौम्यवासरे क्षत्रियकुलावतंस श्री राजा शंभुछत्रपति स्वामी याणीं राजश्री देशाधिकारी व कारकून वर्तमान व भावी सुभा प्रा तारळे यांसी आज्ञा केली ऐसी जे:—रा० गोविंद नरहरी गोत्र भारद्वाज राशिवडेकर हे बहुत भले मौजे राशिवडे येथें राहतात. श्रीभजनीं तत्पर श्रीज्ञानेश्वरी-पारायण कारितात. कुटुंबवत्सल. यांचे योगक्षेमाची अनुकूलता केलियानें कल्याणावह, याकरितां स्वामी कृपाळू होऊन यास नूतन इनाम कुलबाब कुलकानू, खेरीज हक्कदार व इनामदार करून, मौजे कुरकुली ता। तारळे

प्रा मा येथें भात जमीन बिघा ८१ एक बिघा रास इनाम करून दिल्हा असे. तरी तुह्मीं सदरहू जमीन यास मोजून चतुःसीमा करून देऊन वंशपरंपरेनें चालवणें. ये सनदेची तालीक घेऊन अस्सल परतोन देणें. लेखनालंकार.

मर्यादेयं विराजते.

रुजू सुरनवीस.

तेरीख १६,

रबिलाखर, सुा आर्बा अशरीन.

बार सुरू सूद बार.

---

[ ८४ ] श्री. २ जानेवारी १७२३.

प्रधान शिक्का. प्रतिनिधि शिक्का.

स्वस्तिश्री राज्याभिषेक शके ५० शोभकृत्नाम संवत्सरे पौषबहुल चतुर्थी भृगुवासरे क्षत्रियकुलावतंस श्री राजा शंभुछत्रपति स्वामी याणीं रा० रखमाजी सालोंखी मुद्राधारी व कारकून कोट कोल्हापूर यासी आज्ञा केली ऐसी जे:—रा० रवळो नरहर हे उमेदवार होते. स्वामिकार्याचे देखोन यांची असामी सभासदांत घालून पाठविले आहेत. यांचें चालवणें, हें स्वामीस परम आवश्यक आहे. तरी तुह्मीं यांचे हातें स्वामिकार्य घेत जाणें. यास वेतन सालीना देखील चाकर होन पा ५०० पांचशे रास केले असत. इा पैवस्तगी पासून वजावाटाऊ दंडकप्रों वजा करून उरलें वेतन शिरस्तेप्रमाणें पावीत जाणें. यास जमान— तुह्मीं कोट मजकूर घेणें. जमान कतबा हुजूर पाठवणें.

लेखनालंकार.

मर्यादेयं विराजते.

रुजू सुरनिवीस.

तेरीख १७,
रविलाखर, सुा आर्बा अशरीन.

बार सुरु सूद बार.

---

[ ८५ ] श्री. २ जानेवारी १७२३.

स्वस्तिश्री राज्याभिषेक शके ५० शोभकृत्नाम संवत्सरे पौष बहुल चतुर्थी भृगुवासरे क्षत्रियकुलावतंस श्री राजा शंभुछत्रपति स्वामी याणीं राजमान्य राजश्री आपाजी पंडित व रामराव बाळाजी यासी आज्ञा केली ऐसी जे:—राजश्री भगवंतराव अमात्य हुकमतपन्हा यासी कीतेक स्वामिकार्याची आज्ञा करून त्या प्रांतें रवाना केले आहेत. हे स्वामिकार्याविषयीं तुह्मास लिहितील व सांगोन पाठवितील. तरी तुह्मीं आपल्या जमावानसी यास सामील होऊन यांचे आज्ञेप्रमाणें स्वामीकार्य करीत जाणें. बहुत काय लिहिणें. लेखनालंकार.

मर्यादेयं विराजते.

सुरु सूद बार.

---

[ ८६ ] श्री. ३ जानेवारी १७२३.

स्वस्तिश्री राज्याभिषेक शके ५० शोभकृत्नाम संवत्सरे पौष बहुल चतुर्थी मंदवासरे क्षात्रियकुलावतंस श्री राजा शंभुछत्रपति स्वामी याणीं देशमुख व देशपांडे तर्फ तारळे यांसी आज्ञा केली ऐसी जे:—राजश्री भगवंतराऊ अमात्य हुकमतपन्हा यांसी त्या प्रांतें रवाना केलें आहे. तरी तुह्मीं जमावानसी यांचे आज्ञेंत राहोन स्वामिकार्य करीत जाणें. आणि आपले सेवेचा मुजरा करून घेऊन स्वामीस संतोष पावणें. जाणिजे. लेखनालंकार.

मर्यादेयं विराजते.
रुजू सुरनिवीस.
सुरु सूद बार.

---

[ ८७ ] श्री. ६ जानेवारी १७२३.

स्वस्तिश्री राज्याभिषेक शके ५० शोभकृत्‌नाम संवत्सरे पौष बहुल अष्टमी भौमवासरे क्षत्रियकुलावतंस श्री राजा शंभुछत्रपति स्वामी याणीं राजमान्य राजश्री बाबाजी सिगाडे यासी आज्ञा केली ऐसी जे:—राजश्री भगवंतराव अमात्य हुकमतपन्हा यांसी या प्रांतें रवाना केले आहेत. हे स्वामिकार्याविषयीं तुह्मांस लिहितील व सांगोन पाठवितील. तरी तुह्मीं आपले फौजेनसी यासी सामील होऊन यांचे आज्ञेप्रमाणें स्वामिकार्य करणें. बहुत काय लिहिणें.

मर्यादेयं विराजते.

सुरु सूद बार.

---

[ ८८ ] श्री. ३१ आगष्ट १७२४.

स्वस्तिश्री राज्याभिषेक शक ५१ क्रोधीनाम संवत्सरे भाद्रपद बहुल अष्टमी भानुवासरे क्षत्रियकुलावतंस श्रीराजा शंभूछत्रपति स्वामी याणीं राजमान्य राजश्री यशवंतराव गोपाळ व दामाजी हरी यासी आज्ञा केली ऐसी जे:—

राजश्री रामराव दादाजी हे स्वामीच्या राज्यांतील पुरातन एकनिष्ठ सेवक स्वामीच्या पायांशीं त्रिकर्णशुद्धीनें निष्ठा धरून सेवा करीत होते. यांचें चालवणें हें स्वामीस परम अवश्यक, याकरितां स्वामी यावरी कृपाळू होऊन यांस नूतन इनाम कुलबाब कुलकानू हालीपट्टी पेस्तरपट्टी-सहित, खेरीज हकदार व इनामदार करून, मौजे सोलंकुर ता। तारळें हा गांव इनाम अजरामरहामत करून दिल्हा असे. मौजे मजकूर मा-निले वंशपरंपरेनें इनाम अनभवितील. तुह्मीं मौजे मजकुरास तोसीस तगादा लागो न देणें. जाणिजे. बहुत काय लिहिणें.

मर्यादेयं
विराजते.

सुर सुद बार.

---

[ ८९ ] श्री. ८ सप्टेंबर १७२४.

स्वस्तिश्री राज्याभिषेक शके ५१ क्रोधी नाम संवत्सरे आश्विन शु॥ प्रतिपदा इंदुवासरे क्षत्रियकुलावतंस श्रीराजा शंभुछत्रपती स्वामी

याणीं कमाविसदारान

० श्री ॅ ॅ ० व लोकान दिगत

राजाशंभुछत्रपति श्रीआईआदि पंचोत्रा यासी आज्ञा

हर्षनिदान। रघुना पुरुषश्रीराजा

थसुततिमाजीपंडि शिवछत्रपतीस्वामि

तमुख्यप्रधान कृपानिधितस्य

परशुरामत्र्यंबक

प्रतिनिधि

केली ऐसी जे:—

मौजे सोळंकूर ता॥ तारळे हा गांव राजश्री रामराव दादाजी यासी स्वामीनीं इनाम दिल्हा आहे. पंचोत्राही देऊन तुह्मांस हें आज्ञापत्र सादर केलें असे. तरी तुह्मी हें जाणून मौजे मजकुरास पंचोत्र्याचा तगादा न लावणें. निदेश समक्ष.

मर्यादेयं

विराजते

सुरसुदबार

---

[ ९० ] जलसेन श्री. ७ सप्टेंबर १७२५.

० श्री ॅ

राजाशिवसेवेसीतत्पर

संताजीसुतपिराजी

घोरपडे निरंतर

आज्ञापत्र समस्तसेनाधुरंधर विश्वासनिधि राजमान्य राजश्री पिराजी घोरपडे ता॥ मोकदमानी, मौजे बहिरेश्वर, हवेली कोल्हापूर,

सुा सन सित् अशैन मया अलफ:--मौजे मजकुरीं श्री थोर देवस्थान आहे. तेथील पूर्वी उत्साह नंदादीप नैवेद्य पूजा पुरस्कार चालत होती. अलीकडे घागघुमीमुळें राहिली होती. ऐशियास, तुज राजश्री रामचंद्र पंडित हुकुमत्पन्हा यांहीं इनाम जमीन सनदा करून दिल्या आहेत.

| | |
|---|---|
| श्री देवास जमीन | शंकरगीर परंपरा दुर्गानाथगीर |
| चावर ०॥० | गोसावी ते मठ बांधून राहतील. |
| | यास मंडान्याकारणें जमीन ०॥० |

येकूण एक चावर जमीन दिली आहे. त्याप्रों बिलाकुसूर चालवणें कोणीं हिला हरकत करील त्यास ताकीद होईल. श्रीचा देवद्रोह लागेल थोर देवस्थान आहे. यास खलेल कोण्हीं करावयास गरज नाहीं. सुरळीत चालवणें. जाणिजे. छ १९ रबिलाखर.

बार | लेखन
सीमा.

[ ९१ ] श्रीरामचंद्र समर्थ. ९ जून १२७.

श्रीरामचंद्रचरण
नीलकंठसोनदेव
शरण

नेमणूक सनदा गल्ला सरदारी किल्ले गगनगड सुमासमान अशरीन मया अलफ गल्ला देसरी सोळुखें मार्गे नागली वरिया भात.

| कारकून व आश्रित एकूण देसरी सोळुखें | लोकानी गल्ला देसरी सो॥ मार्गे नागली, वरीया भात खंडी |
|---|---|
| २ अपाजी गोपाळ | ०॥२ |
| १॥० सातो गोविंद | १ रवळोजी शिंदे |
| १ नारो शिवदेऊ | ०१४ रायाजी मोन्ये |

२ इंद्रा पाध्ये
०।३ ब्राह्मण पूजा

६॥३
खासगत चाकर गल्ला सो॥
०॥= येसू आगवी
०॥२ नरा
०॥२ अवटा
०॥= कमळा
०॥= अर्थ

किता लोक पथकें
एकूण गल्ला देसरी सो॥
२ दिमत शिद सावंत
१ खासा
१ आ॥ ४

२
२॥० दिमत विठोजी सावंत
१ खासा
१॥ लोक ९

२॥

४॥

१॥ जदीद असामी ६
दर पावप्रमाणें

६

०॥२ सोनजी दळवी
०।४ खंडोजी पोवार
०॥२ भोजजी जाधऊ
०॥२ भानजी कदम
०॥० घावजी पवार
०॥० माहादजी साळवी
०।१ तानजी सांवळ
०।१ संभाजी सावत
०।१ संताजी जाधव
०।१ रुद्राजी काळे
०।१ माणकोजी तरळ
०।१ कृष्णाजी माळकर
०।१ संभाजी शिंदा
०।१ दादजी पवार.
०।४ रायाजी संगपाळ
०।१ मोतजी काऊर
०।१ बहिरजी शिंदा
०।१ केदारजी खागकर
०।० रवळ सावंत
०।० भिकाजी धोंड
०॥२ सबा सुतार
०।२ मेघोजी मोरे
०।० नागोजी टोणा
०।० पिलजी तावरे
०।० पोसजी कर्णकार
०।० तुकोजी शिंदा
०।१ भिकाजी जाधव
०।१ बयाजी सूर्यवंशी

| तेरीज गल्ला | ०।१ संताजी घाटगा |
|---|---|
| ६॥२ | |
| २ | |
| ६ | ०॥२ अली मुराद |
| १२८१ | |
| २८॥४ | १२८१ |

एकूण गल्ला देसरी सोळलें मापें साडेअठाविस खंडी चार मण रास चाकरी माफीक देणें. जाणीजे. छ १ जिल्काद. निदेश समक्ष.

लेखन सीमा
समुल्लसति

[ ९२ ] श्री. १७२८.

राजमान्य राजश्री भगवंतराव रामचंद्र यांसीः—

आज्ञा केली ऐसी जे:— तुम्ही विनंतिपत्र पाठविलें, तें प्रविष्ट झालें. लिहिला अभिप्राय सर्व कळों आला. व गोविंद वेंकटाद्री पाठविलें याणीं तुमचा भाव गर्भ विदित केला. ऐशास, तुम्हीं राज्यांतील पुरातन सेवक. वडील परंपरेनें सेवा करीत आला आहां. ज्यामधें धण्याची रजावंदी त्याप्रों वर्तावें, उचित. ऐसें असतां अवलंबिला प्रसंग तुम्हां योग्य आहे ऐसें नाहीं. अैशानें कोणाचे परिणाम लागले आहेत? या उपरी तऱ्ही धण्यासी निष्ठा धरून आज्ञेप्रमाणें वर्तणूक करणें. आपल्या कदीमाईस बोल न लागे तो विचार करणें. तेही तुमचे पूर्ववतप्रों सर्वस्वें चालवीतील. सूज्ञ असा.

[ ९३ ] श्रीगोपाल. १७२८.

राजश्री पंतआमात्य हुकुमतपन्हा गोसावी यांसीं—

ध्रु. सकल गुण अलंकरण अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य स्नो. उदाजी चवाण हिंमतबहादर ममलकतमदार कृतानेक दंडवत विनंति उपरी येथील कुशल जाणून स्वकीय कुशललेखनाज्ञा केली पाहिजे. यानंतर

रा० रामराऊ यांजबरोबर कितेक अर्थ मुखोत्तरें व पत्रीं लिहून पाठविलें. पाहोन सकल अर्थ अवगत झाला. ऐशास आह्मीं पुरातन तुमचे. दुसरा अर्थ किमपि नाहीं. दूरस्थ असिलों तरी चित्तवृत्ती आपलेठायीं निर्विकल्पवृत्तीनें असे. तेथें इतर पदार्थ कल्पना नाहीं. आह्मीं आपले मैत्र ह्मणविल्यास मैत्रीस अंतर सहसा न घडे. एतद्विशींचा प्रसंग सविस्तर राजश्री रामराऊ यांसीं सांगितला आहे. सांगतां विदित होय. बाबतीच्या अमलाचा चौका बसवावा, याविसीं सिरोळ अकीवाट दोहीं स्थळीं अधिकारी ठेविले आहेत. त्यास आज्ञा करणें ती केली आहे. यथाशक्त्या चाकरीस अंतर करणार नाहींत. वरकड प्रसंगास आह्मीं कोठेंहि असलों तरी समीपच आहों, ये रीतीनें चित्तांत असो द्यावें. प्रसंगास चुकतों असें नाहीं. विशेष काय लिहावें. कृपा असो. हे विनंती.

---

[ ९४ ] श्री. २४ फेब्रुवारी १७२८.

राजमान्य राजश्री भगवंतराव अमात्य हुकमतपन्हा यांस आज्ञा केली ऐसी जे:— नारायण हरकारा याजबरोबर तुह्मीं सांगोन पाठविलियाप्रमाणें अक्षरशा विदित करितां श्रुत झालें व शफतपूर्वक निष्ठापूर्वक सेवकपणाचा अर्थ सांगोन पाठविला त्यावरून बहुत संतोष जाहला. तरी याच अन्वयें दिवसेंदिवस तुह्मीं सेवा करून ममता संपादावी आणि स्वामींनीं अकृत्रिमपणें तुमचे मनोदयानुरूप चालवावें हेंच अवश्यकता आहे. दुसरा अर्थ नाहीं. तुमचे वडिलांनीं या राज्यांत श्रम साहस करून राज्य रक्षिलें. त्यांचे पुत्र तुह्मीं आहां. त्यांचे प्रमाणेंच सर्व भाराभार तुह्मांवर देऊन सेवा घेऊन चालवावें हेंच उत्तम आहे. ऐशास. स्वामी तीन वर्षें स्वारीस होते. प्रस्तुत आगमन जाहलें. तुह्मीं दर्शनास येऊन संतोषी करावें हें चित्तांत आहे. त्यास, श्रीचा उत्साव रामनवमीचा आला आहे. येथें येऊन संपादावा हें स्वामींचे चित्तांत विशेषेंकरून आहे. तुह्मीं चित्तांत कांहीं संदेह न मानितां स्वामीवर भार

घालून यावें. उत्सावप्रसंगीं कर्जवाम होईल तर श्रीकृपेनें कर्म फारिक होईल. तुह्मीं मागील जाले गोष्टीचा खेद चित्तांत न आणावा. स्वामीचा तो चित्तांत कोणे येक गोष्टीचा संशय नाहीं. मध्यस्ताचा विचार तर, या उपरी तुह्मीं आपलें यश अपेश धन्यावर घालोन दृढतर विचार करून यावयाचें करणें. सर्व मान अपमान व तुह्मांस बरें वाईट ते गोष्टीस खासा स्वामीच मध्यस्त धनी आहेत. तुह्मीं या उपरी किमपि संदेह न मानितां यावयाचें करणें. रा० गोपाळ रामराऊ यांसीं दर्शनास नवेक चालवावयाविसी सांगोन पाठविलें. येवरून आज मंदवारीं प्रातःकाळीं दर्शनास आणून समाधान करून ,वस्त्र दिल्हें. ज्याचे वडिलांनीं राज्यांत सेवा केली त्याचें चालवावें हेंच अवश्यक. ऐशास तुमचे आगमनानंतर तुमचे विचारें जो प्रसंग करणें तो केला जाईल. तुमचे येण्याचे प्रसंगास येथून कोणास पाठवावयाचें ते लिहून पाठवावें. त्याप्रमाणें रवाना करून पाठवूं. येविसी तप-शिलें सुभजी भोसले वा। मूळ व नारायण हरकारा यासि आज्ञा केली असे. आज्ञे प्रमाणें सांगतां कळेल. तदनुरूप उत्तर सत्वर पाठवावें. सकलादेविशीं सांगोन पाठविलें. सकलाद न मिळे यास्तव स्वामीचा फर्गोल पांघरता पाठविला असे. घेवणे. जाणिजे. रवाना चंद्र २४ माहे रज्जब. सुज्ञ असा.

---

[ ९९ ]          श्री.          १७ एप्रिल १७२८.

स्वस्तिश्री राज्याभिषेक शके ५४ कीलकनाम संवत्सरे अधिक वद्य पंचमी सौम्यवासरे क्षत्रिय कुळावतंस श्रीराजा शंभु छत्रपति स्वामी यांणीं समस्त राजकार्यधुरंधर विश्वासनिधी राजमान्य राजश्री भगवंतराऊ अमात्य हुकमतपन्हा यांसी आज्ञा केली ऐसी जेः—तुह्मीं चित्तांत एक प्रकार आणून तेथें श्रीमंत मातुश्री साहेबापाशीं आज्ञा मागता ह्मणोन वर्तमान विदित जालें. तरी तुह्मीं स्वामीचे यखतियारी सेवक आणि साहेबाची ममता विशेषाकारें तुमचे ठायीं हें पत्रीं विस्तारें लिहावें तर मनोगन साक्ष असे. तुमचा हेत स्वामीचे ठायीं व स्वामीची ममता

तुह्मांवर असे. स्वामी सेवक एक, ऐसे असोन कोणी सांगणारांनीं काय सांगोन तुमचें चित्ताचा विपर्यास केला हें न कळे! या उपर कोणेक प्रसंग चित्तांत न मानितां समाधान असो देणें. राजश्री पंतीं या राज्यांत श्रम साहास करून कीर्त संपादिली. त्याचे पुत्र तुह्मीं आहां. पंताचे घराशीं स्वामीचा द्वैत विचार नाहीं, हा निशा असो देणें. या उपर चित्तांत संदेह मानाल तरी तुह्मांस पंताची व श्री रामचंद्राची व स्वामीचे पायाची शपथ असे. समाधान असो देणें. उदईक साहेबाचा मुक्काम गड मुडसिंगी येथें असे. तुह्मीं तेथें जमावानिसी स्वामीचे दर्शनास येणें. दर्शनांतीं सर्व चित्ताचा खुलासा होईल. समागमें राजश्री कोंडाजी सुभेदार यांसी घेऊन येणें. वरकड वृत्त शेख महंगद आज्ञेप्रमाणें सांगतां कळेल. सारांश गोष्ट जे, साहेबाचा तुह्मांस भरवंसा असिला तर दुसरा अर्थ न समजतां दर्शनास येणें. जाणिजे. किमपी लक्ष प्रकारें चित्तांत संदेह न मानितां मुडशिंगीचे मुक्कामीं दर्शनास येणें. जाणिजे. सुज्ञ असा.

---

[ ९६ ] श्री. १७२८.

राजश्री भगवंतराऊ अमात्य हुकुमतपन्हा यांसी :—

श्रीमंत मातुःश्री राजसबाईसाहेब उपरी सुहुर सन तिसा आश्विन मया अलफ. तुह्मीं विनंतीपत्र जिवाजी शिवदेऊ यासमागमें पाठविलें तें येऊन प्रविष्ट जालें. पत्रार्थ सविस्तर निवेदन जाला. धण्यांहीं इमान क्रियापुरस्कर राजश्री उपाध्ये व राजाजी वैद्य व शिवाजीपंत व राजश्री हिंमतबहाद्दर पाठविले. त्यावरून आपण हाजीर जालों. धण्यांहीं आश्वासन जतन करून उर्जित करावें. बहुमानें चालवावें. जिवाभ्य एकरूप निष्ठेनें सेवा करून. आपण लेकरें आहों. अन्याय असले, तथापि धणी मायबाप, क्षमा करावी. हेंही रूप धण्याचें आहे. दया करून चालवावें. ह्मणऊन तपसिलें तुह्मीं विनंति पत्रीं लिहिल्यावरून अक्षरशः विदित होऊन संतोष जाला. ऐशास, तुह्मीं

वंशपरंपरागत साहेबांचे धुरंधर सेवक. सर्वहिविषयीं क्षमा करून तुमचें चाळवावें हेंच चिरंजीव राजश्रीस व साहेबांस अवश्यक आहे. अतःपर याविषयीं तुह्मीं आपल्या चित्तांत अणुमात्र संशय न धरितां आपलें समाधान असो देऊन याउपरी दर्शनाची त्वरा करणें. साहेबांचे आज्ञेवरून व राजश्री हिंमतबहादूर यांचे वचनें चिरंजीव राजश्री शिवरामपंतास आणविलें, उत्तम गोष्ट केली. चिरंजीव राजश्रीचेंही पत्रें व आज्ञा सांगोन पाठविणें ते त्यांणीं तुह्मांस सांगोन व लिहोन पाठविलीच आहे. त्या वचनास सर्वथा अन्यथा होणें नाहीं. साहेबांसही तुह्मांपेक्षां दुसरें अधिकोत्तर नाहीं. साभिमानयुक्त तुमचें गोमटें करून चाळवावें, तुमच्या हातें महत्कार्य प्रयोजनें सिद्धीस नेऊन उत्तमपणाचेंच परिणाम करणें, हेंच अगत्य आहे. याविषयीं राजश्री उदाजी चव्हाण हिंमतबहादर यांसी आज्ञा केल्यावरून लिहितां कळेल. बहुत लिहिणें तरी तुह्मीं सुज्ञ असा.

विलसति लेखनावधि

---

[ ९७ ] श्री. २९ एप्रिल १७२८.

स्वस्तिश्री राज्याभिषेक शके ५४ कीलक नाम संवत्सरे वैशाख शुा द्वितीया इंदुवासरे क्षत्रियकुलावतंस श्री राजा शंभु छत्रपती स्वामी यांणीं समस्त राजकार्यधुरंधर विश्वासनिधी राजमान्य राजश्री भगवंतराव अमात्य हुकमत पन्हा यांसीं—

आज्ञा केली ऐसी जे:—तुह्मीं विनंतिपत्र पाठविलें तें प्रविष्ट जालें. व शेख महंमद या बरोबर कितेक सांगोन पाठविलें तें यांणीं सविस्तर सांगितलें. त्यावरून विदित जालें. त्याप्रमाणें सौभाग्यवती गोदूबाई व राजश्री धोंडो भास्कर, व नारो हणमंतराव, बाळाजी महादेव, याजवळ स्वामीनीं आज्ञा करून यांचा निशा केला आहे, त्याप्रमाणें हे तुह्मांस लिहितील. व सौभाग्यवती गोदूबाई आली आहे तेंही सांगतील. त्यावरून कळेल. तरी तुह्मीं कोण्हेविषयीं दुसरा विचार चित्तांत न

आणितां स्वामी संनिध येणें. अतःपर तुमच्या चित्तांत कांहीं संशय असेल, तर ज्यास तुह्मीं पाठवा ह्मणाल ते लेहून पाठविणें. स्वामी त्यास पाठवून देतील. बहुत लिहिणें तरी सुज्ञ असा.

मर्यादेयं विराजते.

---

[ ९८ ] श्री. ३१ मे १७२८

स्वस्तिश्री राज्याभिषेक शके ५४ कीलकनाम संवत्सरे जेष्ट शु ॥ चतुर्थी भृगुवासरे क्षत्रियकुलावतंस श्रीराजा शंभुछत्रपति स्वामी याणीं समस्त राजकार्यधुरंधर विश्वासनिधी राजमान्य राजेश्री भगवंतराव अमात्य हुकमतपन्हा यासी आज्ञा केली ऐसी जेः—तुह्मी विनंतिपत्र पाठविलें तें प्रविष्ट जाहालें. पूर्व पद्धतीप्रमाणें सेवा घेऊन ऊर्जित केल्यास हाजीर आहों ह्मणून कितेक लिहिलें व राजश्री बाळाजी महादेव व नारो हणमंत यांणींही लिहून पाठविलें त्यावरून विदित झालें. ऐशास, तुह्मीं स्वामीचे परंपरागत सेवक आहां. तुमचें पूर्वपद्धती-पेक्षांही स्वामी विशेषाकारें ऊर्जित करून चालवितील. येविशीं तुह्मी समाधान असो देणें. सविस्तर उभयतां बरोबर अगोदर सांगोन पाठविलेंच आहे. हालीं राजश्री शिवाजी शंकर यांस पाठविले आहेत. आज्ञेप्रमाणें सांगतां कळेल व रा उदाजी चव्हाण हिंमतबहादर याजकडील शिवाजी शिवदेव यास ही पाठविलें आहे. याउपरी स्वामीचे दर्शनाचा प्रसंग सत्वर होऊन ये तें करणें. बहुत लिहिणें तरी सुज्ञ असा.

मर्यादेयं विराजते.

---

[ ९९ ] श्री. १७२८.

राजश्री पंतअमात्य हुकुमतपन्हा स्वामीचे सेवेसीं.

छ श्रीमंत सकलगुणालंकरण अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य राजश्री द्वारकोजी यादव कृतानेक साष्टांग दंडवत विनंति उपरी येथील कुशल

जाणून स्वाम्योदये कुशललेखनपरामर्ष करीत असावें. यानंतर आपण वार्तिकासमवेत श्रीमंत सकलसौभाग्यादिसंपन्न मातुःश्री बयासाहेबास पाठविलें तें विदित करून अक्षरशः श्रवण केलें. आह्मांस पत्र पाठविलें, तेंही प्रविष्ट होऊन सविस्तर वर्तमान कळों आलें. पेशजी आपलीं पत्रें आलीं व हालींही तुमचीं पत्रें आलीं. कितेक विस्तारें लिहिलें. त्यांत मायेममतेचा अर्थ काय लिहिला न लिहिला हें तुमचें तुह्मांस दखल आहे. आह्मां सामान्य लोकास दरम्यान मध्यस्तीस घालावें आणि ऐसें स्वामीनीं लिहित जावें, यांस महत्वास भूषार्ह आहेसा अर्थ नाहीं. या राज्यांत थोरले महाराज राजश्री यांणीं आह्मां लोकांचीं घरें वाढविलीं. तीर्थरूप राजश्री निळोपंत आजे, राजश्री रामचंद्रपंत बाप, त्यामागें आह्मीं सेवा केली. काळ साह्य होता, तों धणी यांनीं वाढविलें. आजी ता। चालत आलें. तीन पिढ्या सेवा केली, त्याचें सार्थक जालें! ज्याणीं दिलें त्याणीं घेतलें, हा दंडक कोठेंही नव्हता! या राज्यांत पाहिला! विश्वासू कारकून पाठवावा तरी कोणीं पाय घेईनात. ऐसें कितेक पर्यायें लिहिलें. तरी तुह्मीं सरकारकून, परंपरागत या राज्यांतील सेवक, सर्वांनीं तुह्मां जवळून सिकोन जावें, असें असोन तुह्मीं धण्यासी माया ममता न दर्शवितां इतराच्या दुर्बुद्धी ऐकोन, धण्याचे पायाशीं अमर्यादा होऊन, लोकोत्तर इतकेंच पदरीं पडले! धण्यास कितेक शब्दारोप ठेऊन लिहिलें तरी धण्यासी तुह्मीं अथवा कोणीं शब्द ठेवावा ऐसें नाहीं. कोणें एकाचे चालविलें नाहीं. आबालवृद्धापर्यंत धण्यांनीं लोभ करून, अंतरें महदंतरें पडलीं तरी क्षमा करून, सर्वापराध पोटांत घालून चालविलें. ल्हानाचे थोर केलें. पुढें त्यांचीं महत्वें विशेष वाढवावीं हेंच चित्तीं सर्वात्मना आहे. तुह्मीं किल्ले पनाळा असतां धण्यास नाना प्रकारचे संकटांमध्यें प्रसंग प्राप्त केले. किंबहुना, अरिवर्ग असतील त्यांच्यानेंही ऐशीं अमानुष कर्मे होणार नाहींत. ऐसें असोन तुह्मीं आपले आचरणास चुकला नाहीं. तत्रापि इतकेंही धण्यानीं पोटांत घालावयासी कारण कीं, तुह्मीं परंपरागत सेवक, तुमचे वडिलांनीं

या राज्यांत श्रम साहस आपले जिवाभ्य करून, ऐशास पात्र जालें. त्यामागें तुमचें चालवावें, तुमचे हातून महत्कार्यें घ्यावीं, असें चित्तांत असता, इा पासून निग्रही वल्गनायुक्त आचरणें होता राहिलीं नाहींत. तुमचे तीर्थरूप राजश्री रामचंद्र पंडित यांणीं थोरले महाराजासंन्निध कोणें रीतिनें वर्तणूक केली हे लोकांत कीर्ती प्रख्यात आहे. महाराज राजश्री या प्रांतीहून चंजीप्रांतें जाणें जाले तत्समई संपूर्ण राज्य व लोक लोकपाळ स्वामित्व राजश्री पंडितमाारनिले यांचे गळा घालोन खासा स्वामीनीं चंजी प्रांतें स्वारी केली. त्या मागें सबळ रिपुवर्ग यांचा उद्भव जाहला. तत्समई यवन उन्मत्त होते. त्यास इत्यादि अमर्यादकांस शासनें करून, त्यांचा संव्हार करून, दमसर्द केलें. राज्य शर्थीनें राखिलें. तदोत्तर महाराज राजश्रीचें आगमन चंजीहून या प्रांते जालें. तेव्हां पंडितमशारनिलें यांणीं बहुत विशेषाकारें नम्रता धरून जाते समई, राज्य व लोक लोकपाळ व गड किले स्वाधीन केलें होतें, त्याप्रमाणें धण्याचे धण्यासंन्निध वोपून आपण विनीत प्रकारें होऊन, पुढें सेवकास आज्ञा कर्तव्य काय? ह्मणून पंडित माारनिले याणीं विनंती केली. हें किमर्थ कीं आपण ब्राह्मणलोक, परंपरागत सेवक, जीवित हें क्षणभंगुर आहे, ज्या धणियाचे कृपांजळें हें पद प्राप्त जालें, त्यासी निमकहराम न होता कल्याणाभिवृद्धि इच्छिल्यानें आपल्यास श्रेयस्कर, येणें करून धर्म, अर्थ, काम, मोक्ष, चतुर्विध पुरुषार्थ प्राप्त होतात. मागें पुढें कोणी दूषण ठेवीना. ऐसे अभ्यंतःकरणें विवेक वर्तत आले जे, हे श्रीचे वरदीराज्य, यासी दिल्लीश्वरादि कोणी स्वधर्मकर्तव्यतेस प्रवर्तले त्यांचा गर्व हत होऊन पराभव पावते जाले. यांकरितां धण्यासी मर्यादेनें असावें. ऐसे नितांत आणून तुमचे वडील चालत आले. तुह्मांसही पंडितमाानिले याणीं सकलकलाविद्यासंपन्न केलेंच होतें. प्रस्तुत त्यामागें आपण प्रतिदिनीं पुराणश्रवण देवब्राह्मणाचे ठायीं भक्ति धरिली. धर्मशास्त्र इत्यादि सर्वही नीत तुह्मांस करतळामल. तेव्हां सर्व अर्थ तुह्मांस नकळेसा काय? असें असोन, कोणेक गोष्टीचा युक्त विचार नाहीं. सितोळे घोरपडे यांचा कजिया लागोन कलह वाढला,

आणि निरपराधें आह्मावरी जुलूम होऊन सर्वस्वें अपहार केला, ह्मणून लिहिलें. तरी घोरपडियाचे अथवा तुमचे तरी धण्यांनीं काय वाईट केलें होतें? सोबतीच्या लघु मनुष्यांच्या बुद्धीस लागोनें नसती कल्पना वाढवून धण्याचा मनसबा नामोहरम केला. स्वामिद्रोह मात्र पदरीं घेतला! तुमचे वडील पंडितमाारनिले कोणें रीतीनें वर्तले, त्यांचे वर्तणुकीचे निदर्शन तुह्मीं स्वल्पकाळेंच दाखविलें. राणोजी घोरपडियाची व आपाजी सितोळयाची स्पर्धा वाढली, ह्मणोन लिहिलें. तरी तें जालें तरी मराठे माणूस, तुह्मीं सरकारकून, तुमचे वक्रानें त्याणीं वर्तावें, कोणीं बदराह वर्ततील तरी तुह्मां लोकांनीं बुद्धिवाद सांगावा जे, धण्यासी हे अमर्यादा कार्याची नव्हे, परिणाम लागणार नाहीं. असें सांगावें. ऐसें तुह्मां लोकांच्या नीति असोन, हे एकीकडे ठेऊन, ते आपण एक होऊन, धन्यासी वळी बांधिली. वलगनाही मनःपूत केल्या. प्रांतांत उपद्राप केला. हाच मुलूक मारिला. रयत देशांतरास उठोन गेली. जवळचे चार हुजरे होते त्यांचे गांवखेडियांचे निसंतान केलें. धण्यासी केवळ प्रतिमल्लतेचाच प्रसंग जाहल्यावरी वरकडांनीं चित्तांत आणावेंसें काय? तत्रापि सेवक जवळचे ह्मणजे लेंकरें, यांस क्लेश जाहल्यावरी धण्यास ये गोष्टीचें वैषम्य न वाटेसें काय? तत्रापि धण्यांनीं इतकेंही किमपी चित्तांत न आणितां मागती तुह्मांवरी दया करावी, इतके दिवस वर्तणूक जाली ती क्षमा करावी, या अर्थे एकवेळ रामजी संकपाळ पाठविले. त्या बोलीचा परिणाम काय लाविला? त्याउपरी सोनजी तांबट पाठविले. तेव्हांही तुमचें चित्त सपक्क जालें नव्हतें. तदुत्तर चिकोडीचे मोकामीं असतां तुह्मांस संकट कोणेंप्रकारचें प्राप्त जालें होतें अथवा नव्हतें, हें तुमचे तुह्मीं चित्तांत विचारून पाहणें. ऐसा तुमचा संकटाचा प्रसंग धण्यानीं पाहून, तुमचे अमर्यादेचा प्रसंग किमपी न आणितां, कृपाळू होऊन, राजश्री बहिरो व्यंकाजी व रघोजी जाधव या उभयतांस तुह्मांकडे पाठवून, हुजूर आणावें या अर्थे उभयतामाारनिलेस तुह्मांकडेस पाठविले. त्यांणीं तुह्मांस घेऊन आले, ते परस्परें चावड्यास गेला. ते समयीं धण्यासन्निध येता तरी तुह्मांस हें श्लाघ्यच होतें; परंतु हा विचार न

पाहतां त्रावड्यास राहिला. तेथेंही मागती तुह्मांकडील कोणी भला माणूस आणवून बोलीचाली करावी याकरितां तुह्मीं राम ठाकूर व भगवंतराव पिंगळे ऐसे उभयतास येथें बोलाचालीस पाठविले. बोलीचाली लागली असतां तुह्मीं परमारें साल्वणावरी स्वारी करून दंगा केला. बोलीस भला माणूस पाठवून ऐसे दंगे करिता, कोठे ऐकिलें आहे कीं काय? किंबहुना हेही तुह्मांपासून घडलें, तेव्हां धणियांनीं क्षमा कोठपर्यंत करीत यावें? ये गोष्टीचा विचार स्वहिताहित ज्याचा त्याणें चित्तांत आणावा तरीच बरें. सांगितले गोष्टीचा परिणाम लागणें नाहीं. प्रस्तुत तुह्मीं पत्रें दिवाणांत लिहिलीं, त्यांत निर्भत्सना करून लिहिलें. यांत तुह्मां लोकांस भूषण कोणतें? पदें कागदींपत्रीं लिहावीं, हे सामान्याची कमाई! तुह्मांस योग्य नव्हे. जीं पत्रें येतात त्यांत किमपि तुमचे निष्ठार्थ नाहीं. जे लिहिणें तें विडंबर लिहितां. यावरून तुह्मांविशीं धण्यास अर्ज करणारानें कसा काय करावा? धण्यास तरी कृपा कशी उपजेल? या राज्यांत विवेक, विचार, शहाणे लोक, सभ्य, चतुर, विद्यावंत नाहींत, राजश्री शाहूराजे यांचे राज्यांत सरकारकून लक्षाचे लक्ष जिल्हे मामले खाऊन सुखरूप आहेत, ह्मणून लिहिलें. तरी तिकडील सरकारकुनानें अथवा सरदारानें धण्यासी अमर्यादा केलीसी नाहीं. धण्यासी निष्ठेनें वर्तोन, आपलें नंगानें राहोन, कीर्ति संपादून घेतल्या. यद्यपि कोणी अमर्यादी वर्तणूकेस प्रवर्तले तरी तत्क्षणीं त्यास शिक्षा होईल, या भयेंकरून जे जे आहेत ते बहुत मर्यादेनें असतात. धणीही त्यांचे निष्ठेप्रमाणें भूषणें वाढवितात. जिल्हे मामले देतात. त्याजला स्वामिसेवेवितरिक्त दुसरे नाहीं. सुखरूप दौलता खाऊन आहेत. त्यांची साक्षी उपसाक्षी देऊन तुह्मीं लिहिलियानें साम्यतेस येणार नाहीं. तुह्मांसही धण्यानीं सरंजाम दिलाच आहे. त्यामध्यें तुह्मीं आपले पदाप्रमाणें वर्तोन, धण्याची सेवा करून, कृपा संपादून घ्यावी. तुह्मांवरीं धण्यांनीं दया करावी असेंच उभयपक्षीं उचित आहे. असा प्रसंग असता तुमचे इस्तकबिलीपासून एकही सुप्रयुक्त वर्तणूक नाहीं. धण्यासच आरोप ठेवून लिहिता, यामध्यें तुह्मास कोणतें

उचित असे? आह्मां सारिख्यांनीं लिहिलें तरी तुह्मांस विषादावह वाटेल; परंतु तुह्मांजवळचे कारकून भले माणूस आहेत. त्यासच ये गोष्टीचा पर्याय विचारणें. तेच तुह्मांस काय ह्मणतील, हे गोष्टीचा प्रत्यय पाहणें. हा आपले जागीं विचार न पाहतां, ज्या मर्जी भरिता त्या मर्जी भरोन कागदपत्र लिहिता, यांत स्वार्थ कोणता? घोरपडे, सितोळे यांजेच भर्जी भरोन अव्यवस्थित वर्तणूक करून तस केलें. असें असतां तुह्मीं लिहिलें जे, आपले आज्याचे लग्नास लक्ष दोन लक्ष रुपये खर्च करून लग्नें केलीं, सरकारकुन्या दिल्या, ऐसें तीन पिढ्या चाललें, आणि आपल्यावरीच निकर्ष धण्याचा! ह्मणोन लिहिलें. तरी स्वामिद्रोहपणाची वर्तणूक तुमच्या त्रिपूर्वजांत ऐसें कोणांपासून तरी कर्म अवलंबिलें होतें काय? धण्यानीं लक्ष दोन लक्ष रुपये लाऊन लग्नें केलीं, पदें दिल्हीं, याणीं सेवा केली, त्याचें सार्थक निदर्शनास आणिलें. ते वडिल चालत आले त्यांच्या वर्तणुकीप्रमाणें तुह्मीं वर्तावें, राज्याचा बंदोबस्त करावा, लोकांत कीर्त संपादावी, हें तुमच्या वांट्यास न येता, मनस्वी लोकांच्या बुद्धी ऐकोन त्याचें निदर्शन जे खवारी जाली, दुराचरणाचें निदर्शन तुह्मास आलें. याउपरी तरी तुह्मीं सर्व अर्थ चित्तांत आणून, एकाग्र चित्तें धण्याचे पायाशीं लक्ष लावून, धण्याची कृपा संपादून घ्यावी. आपण आह्मांस लिहिलेसारखें यश आह्मास द्यावें. असें मनःपूर्वक आपलें चित्तीं बेकिलाफानें संदेह न धरितां चित्तीं असेल तरी त्याप्रमाणें जो विचार कर्तव्य उपयुक्त असेल तें करावें. सारांश, सुगतीस दुर्गतीस तफावत फार आहे! सुबुद्धिदुर्बुद्धीचीं फळें नारदमुनीस व मार्कंडेयासी प्रत्यय आला, हें कथापुराणान्तराश्रयें आपण ऐकिलींच असेल. आपलीं पदें महत्वें भारी आहेत. याकरितां दुसरियाच्या सांगितल्या बुद्धीवरी जाऊं नये, यांत श्रेयस्कर आहे. आपल्यास हें पत्र विस्तारें लिहिलें आहे. जें उपयुक्त असेल तें चित्तांत आणावें. एक भला माणूस येथें निःसंशयरूपें पाठवून धण्याशीं सख्य करून घ्यावें, यांत उत्तम आहे. तरी आपण अगत्यरूपें भला माणूस पाठवून गोष्टीचा विचार करावा. येविशीं विलंबावरी न घालतां गुप्तरूपें सत्वर पाठवावा. विदित जालें पाहिजे. हे विनंति.

[ १०० ] श्री. ६ मे १७२८.

स्वस्तिश्री राज्याभिषेक शके ५४ कीलक नाम संवत्सरे वैशाख शुद्ध अष्टमी इंदुवासरे क्षत्रियकुलावतंस श्री राजा शंभूछत्रपति स्वामी यांणीं राजकार्यधुरंधर विश्वासनिधी राजमान्य राजश्री भगवंतराव अमात्य हुकुमतपन्हा यांसी आज्ञा केली ऐसी जे: —

तुह्मांस दोन पत्रें स्वामीनीं यावयाविषयीं पाठविलीं. तुमचेविषयीं स्वामीचे चित्तीं कांहीं संशय असेल तर श्रीची शपथ असे, तुह्मासही श्रीची शपथ असे, ह्मणोन लिहिलें व सांगोन पाठविलें. परंतु तुह्मीं चित्तांतील संदेह दूर केला नाहीं. तरी स्वामिसंनिध यावयास अनमान केला हें तुह्मांस उचित नव्हे. स्वामीस तुह्मांपेक्षां दुसरा अर्थ कांहीं विशेष आहे, ऐसे नाहीं. तुह्मीं मात्र निष्ठुरता धरीत आहे. हें स्वामी हृद्गत तुह्मांस कळावें, व तुमचेंही स्वामीस विदित व्हावें, या करितां हालीं राजश्री लक्ष्मणराव शामजी व अंताजी बल्लाळ यांसी आज्ञा करून पाठविले आहेत. हे स्वामीचे आज्ञेप्रमाणें तुह्मांस सांगतील, तें चित्तांत आणून याउपर कोणेविषयीं संदेह न धरणें आणि आपलें हृद्गत सांगोन पाठविणें. तुमचें ठायीं ज्याचा विश्वास असेल, त्यांस सांगोन पाठविणें. स्वामी त्यांस तुह्मांकडे पाठवितील. समाधान असो देणें. बहुत लिहिणें तरी सुज्ञ असा.

मर्यादेयं विराजते.

---

[ १०१ ] श्रीशिवायनमः १३ आगस्ट १७२८.

यादीदास्त राजश्री भगवंतराऊ अमात्य याणीं मुकसुद लेहून पाठविलें त्याचें उत्तर सुा तिसा अशरीन मया अलफ :—

| | |
|---|---|
| पूर्वापार अकृत्रिम रुणानुबंध चालत आला आहे. त्यापेक्षां अधिकोत्तर ममता करून सर्व | कोकणप्रांतें वतन व इनाम व मुकासे गांव आहेत. त्यास कांहीं उपसर्ग लागो न द्यावा ह्मणोन |

प्रकारें परामृश करावा ह्मणोन लिहिलें. तरी यापेक्षां विशेष काय आहे? सर्व प्रकारें परामृशास अंतर होणार नाहीं. शपथ असे.

किल्ले गगनगडचे व खासगत गांवीची हबसीपट्टी माफ करावी ह्मणोन लिहिलें. तरी तें बाब हबशाची आहे. आह्मास रुपये भरून द्यावे लागतात. यास्तव हबशीपट्टी दूर होत नाहीं.

मौजे उपळें व मौजे तारळें हे दोन गांव हिरसांवत याजकडेस मुकासा चालवावयासी लिहिले, तरी हरदूगांव जंजिरे विजयदुर्गचे तनखेयांचे आहेत. याकारिता त्याजकडे चालणार नाहींत.

सांवतास तुह्मीं आह्मीं मिळोन नतिज्या द्यावा, मुलुख सुटेल तो निमा तुमचा व निमा आमचा, ह्मणोन लिहिलें. तरी सांवतास नतिज्या द्यावयाविशीं समर्थक अर्थ कळलियावरी विचार होणें तो होईल.

तो सोमाळे येथील देशमुखी सुरळीत चालवावयाविशीं लिहिलें. तरी येविशीं प्रस्तुत लिहावें ऐसें काय आहे? याचा निवाडा होणें लिहिलें. तरी त्या प्रांतीचें कार्यपुरुषास आज्ञा करून पत्रें सादर केलीं आहेत. उपद्रव लागणार नाहीं.

रत्नागिरीच्यासी वाडा व लोक सोडून द्यावयासी लिहिले. तरी केल्या नेमाप्रमाणें वर्तावें, गैररहा वर्तणूक न करावी, ये विशींचा अर्थ पूर्वीं तुह्मांस लिहिला होता. हे गोष्टीस मध्यस्थ जाहल्यास लोक व सिबादीस निरोप होईल. प्रस्तुत तें स्थल तुमच्या हुकुमाखेरीज जाहलें आहे हे गोष्टीचा निश्चय करून लिहून पाठविल्यानंतर लोकांची मुक्तता होईल. रत्नागिरी आपले हातीं खातरी करून देऊं.

श्रीच्या उत्साहास वार्षिकप्रमाणें अनुकुलतेविशीं लिहिलें. तरी समयीं अनुकूल व्हावयास अंतर होणार नाहीं.

आह्मांकडील कारकून व आश्रित यांचीं घरें कोकणांत आहेत, ते याजला द्यावयाविशीं लिहिलें. तरी तुमचे आश्रित व कारकून कोणे गावीं नाहीं ऐसें नसे. जे आहेत ते कारकून आश्रित तुम-

तो पूर्वीच होऊन गेला असे. | चेच आहेत. ऐसियास आगत्यागत्य मनास आणून ज्यास द्याव-याचें त्यास देऊं.

याप्रमाणें लिहिलें, याचें उत्तर लिहिलें आहे. छ १८ मोहरम.
मोर्तब सूद.

---

[ १०२ ] श्री. १९ नोव्हेंबर १७२८.

स्वस्तिश्री राज्याभिषेक शके ५५ कीलकनाम संवत्सरे कार्तिक बहुल दशमी भृगुवासरे क्षत्रियकुलावतंस श्रीराजा शंभूछत्रपति स्वामी यांणीं समस्तराजकार्यधुरंधर विश्वासनिधि राजमान्य राजश्री भगवंतराव अमात्य हुकुमतपन्हा यांसीं—

आज्ञा केली ऐसी जेः— तुह्मीं विनंतिपत्र पाठविलें तें प्रविष्ट जाहलें. कितेक निष्ठापूर्वक व श्लोकयुक्त लिहिलें. व राजश्री नरसो तिमाजी व राजश्री रघुराव व तुकोजी खांड्या या समागमें सांगोन पाठविलें. तेणेंप्रमाणें यांणीं निवेदन केल्यावरून विदित जाहलें. ऐशास स्वामिमानपूर्वक स्वामीस तुमचें अगत्य आहे. त्याप्रमाणें तुमचें चालवावयास स्वामी अंतराय करणार नाहींत. हा अर्थ वारंवार लिहावा असें नाहीं. हालीं तुह्मांकडून उभयता आले, याजवळ सांगितलें आहे. सांगतां कळेल. सर्वप्रकारें समाधान असों देणें. व राजश्री शिवराम रामचंद्र यांचा उजूर स्वामीचे दर्शनास धरिला. तरी स्वामींचें दर्शन त्वरित तुह्मांस व्हावें, हें स्वामीस बहुत अगत्य. या करितां सत्वर स्वामींचें दर्शन तुह्मांस होय तें करणें. व राजश्री श्रीनिवास शिवदेव यांकडील गांवचीं पत्रें द्यावीं, ह्मणून तुह्मीं लिहिलें. त्यावरून मशारनिल्हेकडील गांवांस ताकीदपत्रें दिलीं आहेत. बहुत लिहिणें तरी सुज्ञ असा.

मर्यादेयं
विराजते.

---

[१०३] श्री. १७२९.

स्वस्तिश्री राज्याभिषेक शके ९९ कीलक नाम संवत्सरे क्षत्रियकुलावतंस श्रीराजा शाहूछत्रपति स्वामी यांणीं राजश्री भगवंतराऊ रामचंद्र व मोरेश्वर रामचंद्र व शिवराम रामचंद्र अधिकारी ता। सोनवळें प्रांत भिवडी यांसी आज्ञा केली ऐसी जे :—

तुह्मीं हुजूर सातारियाचे मुक्कामीं येऊन विनंती केली कीं, ता। सोनवळें प्रांत मजकूर येथील अद्‍कारपणाचें वतन कदीम आहे. परंतु मुरार मानजी गोतज यांच्या वडिलीं आमच्या वडलाचा मारा मौजे भादाणे ता। मजकूर येथें केला. आणि जबरदस्तीनें वतन खात होता. तेव्हां आपले तीर्थरूप राजश्री रामचंद्र निळकंठ यांणीं पत्रें लेहोन गोविंद रंगनाथ मुताळीक कल्याणास अजम जेनुद अल्लीखान व काकाजी नाईक दिवाण यांजकडे पाठविला. त्याणें तेथें जाऊन पत्रें देऊन हकीकत श्रुत केली. त्यावरून हकिमांनीं कल्याण भिवडीचे जमीदार आणवून गोतमुखें उभयताचा निवाडा करविला. जुन्या हकीकती गोतानें मनांस आणून गोतमुखें मुरार मानजी खोटा जाला. ता। मजकूरच्या वतनास लाभत नाहीं, ऐसें खरें जालें. तेव्हां हें वर्तमान लेहोन तेथून अवरंगाबादेस गेले. तेथें दाउदखान वंनी, किलिजखान, व ध्यानदखान दिवाण यांणीं मनास आणून परवाने करून दिधले. ते परवाने दिल्लीस पाठविले. तेथें बाहादूरशाहा पातशहाजीस जुल्फुकारीखा दिवाण यांणीं श्रुत करून पातशाही फरमान करून दिधला. तो व परवाने मनास आणून आपलें वतन आपले दुमाले करून चालवावयाची आज्ञा केली पाहिजे, ह्मणोन विदित केलें. त्याप्रमाणें मनास आणून तुह्मांवरी स्वामी कृपाळू होऊन ता। मजकूरचे अद्‍कारपणाचें वतन तुमचे दुमाले करून हें वतनपत्र दिलें असे. तरी तुह्मीं या वतनाची सेवा करून पुत्रपौत्रादि वंशपरंपरेनें वतन अनभवून सुखरूप राहणें. या वतनास हक लाजिमा व इनाम इसाफत गाव मुदागत चालत आले आहेत वगैरे तपसील.

इनामगतीचे गाव कदीम दस्ताप्रा
१ मौजे भादाणें
१ मौजे कुळासे
——
२

इनाम गावगन्नाचे व बाभाणें कदीम चालत आलें आहे त्याप्रमाणें चालवणें कलम १ व इसाफती वतनी वाडे व झाडझाडोरा व रावते महार सुदामत प्रमाणें १

तामिजकूरचे देखील कसबे देहे ८४ येथील हक्क लाजिमा सुदामत प्रमाणें कलम १ बंदर व रहदारी दर गोणीस हक्क पक्के पैसे.

तामिजकुरीं पेठ व बाजार आहेत, तेथे शेव व धार व दसकी सुदामत प्रमाणें कलम १

येणें प्रमाणें हक्क लाजिमा करार केला असे. तो घेऊन वतनाची सेवा करून सुखरूप राहणें. जाणिजे.

---

[ १०४ ] श्री. तारीख८ डिसेंबर १७२८.

स्वस्तिश्री राज्याभिषेक शके ५५ किलक संवत्सर मार्गशीर्ष बहुल तृतीया रविवासरे क्षत्रियकुलावतंस श्रीराजा शाहूछत्रपति स्वामी यांणीं चौधरी व देशकुलर्णी व शेटे माहाजन व पाटील व खोत ता। सोनवळें प्रां भिवंडी यांसी आज्ञा केली ऐसी जेः— राजश्री भगवंतराऊ रामचंद्र व मोरेश्वर रामचंद्र व शिवराम रामचंद्र यांनीं सातारियाचे मुक्कामीं हुजूर येऊन स्वामीसंनिध विनंति केली कीं, तामारीचे अदकारपणाचें वतन कदीम आपलें आहे, व या वतनास हक्क व लाजिमा व इसापती गांव पेशजी चाळत आले आहेत, त्याप्रों चालावयासी आज्ञा केली पाहिजे ह्मणून. त्यावरून हें आज्ञापत्र सादर केलें आहे. तरी तुह्मीं तामारीचे अदकारपणाचें वतन यांचें यास चालवणें व हक्कलाजिमा व इसापतीचें गांव इनाम शेतें बांधाणें सुदामत चालत आलें आहे त्याप्रमाणें यांस व यांचे पुत्रपौत्रादि वंशपरंपरेनें चालवणें. या पत्राची प्रती लेहोन घेऊन अस्सल पत्र भोगवटियास परतोन देणें. जाणिजे.

---

[ १०९ ] श्री. १८ डिसेंबर १७२८.

स्वस्तिश्री राज्याभिषेक शके ५५ कीलकनाम संवत्सरे मार्गशीर्ष बहुल चतुर्दशी सौम्यवासरे क्षत्रियकुलावतंस श्रीराजा शंभूछत्रपति स्वामी यांणीं समस्त राजकार्यधुरंधर विश्वासनिधि राजमान्य राजश्री भगवंतराव अमात्य हुकुमतपन्हा यांसी आज्ञा केली ऐसी जेः– तुह्मी बावडियाहून उत्तरेकडेस स्वार होऊन गेला. तेव्हां स्वामीस विनंतिपत्र पाठविलें कीं, चिरंजीव राजश्री आप्पाजीराव स्वामिसंनिध आहेत, साहेबीं हुद्दा मामला सांगोन उर्जित करावें, वडिलीं या राज्यांत सेवा चाकरी केली आहे. ऐसे कितेक विशदें लिहिलें. ऐशास, तुह्मीं परपक्ष अवलंब करून गेला. आपाजीराव स्वामीसंनिध राहिले. याकरितां मनमूचा हुद्दा व जिल्हा मामला पूर्ववत्प्रमाणें त्यास सांगोन जंजिरे रत्नागिरीस रवाना केलें. जंजिऱ्याचा नातवानीचा प्रसंग. त्यामध्यें राजश्री कान्होजी आंगरे सरखेल यांचा शह. लोकांस भक्षावयास नाहीं. तेव्हां स्वामीनीं यांसी जिल्हे, मामले, गांव, खेडीं यांचा ऐवज बेगमी करून यांणीं कर्जवाम करून ऐवज दिला. स्थळ रक्षण केलें. ऐसें असतां तुह्मीं रासिवडे, सांगरुळचा मोबदला ह्मणून पोंबुर्लेवर रोखा करून दीडशें रुपये घेतले. याकरितां त्यांणीं चिंदरत्रिंबकावरी गोबद-लियाचा रोखा केला. मात्र निमित्य ठेवून तुह्मी मो॥स केली व नंदगांव व नाडगौडी ता। तारळें येथें रोखे केले, कीं मौजे मजकूरचा ऐवज दुसरियाकडे एकंदर वसूल न देणें, ह्मणून वरातदारास सांगोन धुंध केली. यामुळें गांव परांगदा जाहले. ऐशास, स्वामीचे आज्ञेप्रमाणें यांणीं खेडियांचा वसुल थोडाबहुत घेतला असतां तुह्मी येविषयींचा कथला करार करावा ऐसें नाहीं. आपाजीराव यांसी स्वामींनीं लिहिलें आहे. याउपरी तुमचे खेडियांवरी रोखे करणार नाहीं. व तुह्मी यांच्या खेडियांवरी व नाडगौडीवर केलें तें मना करणें. आपाजीरायाकडील खासगत गांवपैकीं जो ऐवज घेतला असेल तो परतोन देणें. या कागास नारोराव हरकारे पाठविले आहेत. बहुत लिहिणें तर तुह्मी सुज्ञ असा.

मर्यादेयं
विराजते.

[ १०६ ] श्री. २ जानेवारी १७२९.

स्वस्तिश्री राज्याभिषेक शके ५५ कीलक नाम संवत्सरे पौष शु॥ चतुर्दशी गुरुवासरे क्षत्रियकुलावतंस श्री राजा शंभुछत्रपति स्वामी यांणीं समस्तराजकार्यधुरंधर विश्वासनिधि राजमान्य राजश्री भगवंतराऊ अमात्य हुकुमतपन्हा यांसी आज्ञा केली ऐसी जे:—

तुह्मीं विनंतीपत्र पाठविलें तें प्रविष्ट जाहलें. व राजश्री नारो हणमंत व बाळाजी महादेव यांसमागमें सांगोन पाठविलें तेणेप्रमाणें यांणीं सांगितल्यावरून कळों आलें. ऐशास, स्वामीचे तुमचे दर्शनास बहुत दिवस जाहले, यानिमित्य त्वरेनें तुह्मीं येऊन दर्शन घ्यावें, हें स्वामीस अगत्य. त्यास, राजश्री शिवराम रामचंद्र याकडील गुंता सांगोन पाठविला तरी त्याकडील उजूर धरावा लागला आहे, हे गोष्ट उचितच आहे. त्यास, तेविशींही बहुतसा साक्षेप करून याउपरी स्वामीचे तुमचे दर्शनास दिवसगत न लागे तें करणें. रत्नागिरीकडील प्रसंग लिहिला. तरी जें होणें तें राजश्री गोपाळ रामराव यांचे अमर्यादेमुळेंच जालें. व धनसंपदा लटिकी, सर्व अर्थ दो दिवसाचे आहेत, ह्मणून कितेक परमार्थ युक्तीनें लिहिलें. तरी जें तुह्मीं लिहिलें तें उचितच. परंतु हे मार्ग हे तुह्मां लोकांस बोलिले आहेतसें नाहीं. अजरामरवत्प्राज्ञो विद्यामर्थं च साधयेत्, ऐसें आहे. स्वामिकार्यनिष्ठा चतुर्विध अर्थ घडतच आहेत. तुह्मांस कांहीं न कळेसें नाहीं. वरकड त्रिवर्ग लिहितां कळेल. व मल्हारजी सूर्यवंशी यासमागमें तुह्मीं सांगोन पाठविलें तेणें विदित केलें. हालीं यांजवळ आज्ञा जाली आहे. सांगेल. बहुत लिहिणें तरी सुज्ञ असा.

मर्यादेयं.
विराजिते.

---

[ १०७ ] श्री. १७ फेब्रूवारी. १७२९.

स्वस्तिश्री राज्याभिषेक शके ५५ कीलकनाम संवत्सरे फाल्गुन शुद्ध प्रतिपदा इंदुवासरे क्षत्रियकुलावतंस श्रीराजा शंभुछत्रपति स्वामी

याणीं समस्तराजकार्यधुरंधर विश्वासनिधि राजमान्य राजश्री भगवंतराव अमात्य हुकुमतपन्हा यांसी आज्ञा केली ऐसी जे :—

तुह्मीं विनंतीपत्र पाठविलें तें प्रविष्ट जालें. पूर्वी राजश्री रामचंद्र पंडित यांवरी धण्यांनीं दया केली. त्याणींही निष्ठेनें राज्यांत सेवा केली. आपणही स्वामीचे सेवेसी अंतर केलें नाहीं. याकारितां स्वामींनीं आपला अभिमान असेल तरी चालवावें. घरफुट झाली आहे. राजश्री आपाजी-राव याणीं आपल्या बारगीरवस्ता रत्नागिरीस होत्या त्या आटोपिल्या आहेत. त्या त्यास आज्ञा करून देववाव्या. ह्मणून कितेक आद्यंत विस्तारेंकरून लिहिलें तें अक्षरशः विदित जालें. ऐशास, तुह्मीं जें लिहिलें तें अवघें यथार्थच लिहिलें. त्यांत कांहीं अन्यथा आहे ऐसें नाहीं. तुमचे वडिलीं सेवा केली त्याप्रमाणें तुह्मींही सेवा करावी. स्वामींनीं तुह्मांवरी कृपा करून चालवावें. तुमचें जगनामोश तुमचें वडिलाप्रमाणें व्हावें, हेंच स्वामीस अगत्य. त्याप्रमाणें स्वामींनीं तुमचें चालवायास अंतर केलें ऐसें नाहीं. आणि पुढेंही स्वामीस तुमचें चाल-वावें ये गोष्टीचा अभिमान अगत्य आहे. ऐसें असोन तुह्मीं इतकें पारहाळयुक्त ल्याहावेंसें काय आहे? घरफुटीचा प्रसंग तर हा विचार तुमचे घरचा आहे. यास स्वामींनीं काय करावें. वरकड तुमचे हुद्दा मामला बहुमान यास स्वामीकडून अंतर जालें नाहीं, पुढेंही होणार नाहीं. येविशीं समाधान असो देणें. मल्हारजी सूर्यवंशी याजवळ आज्ञा केली आहे. सांगतां कळेल. बहुत लिहिणें तरी तुह्मीं सुज्ञ असा.

मर्यादेयं
विराजते.

---

[ १०८ ] श्री. २७ फेब्रुवारी १७२९.

स्वस्तिश्री राज्याभिषेक शके ५५ कीलक नाम संवत्सरे फाल्गुन शुद्ध दशमी गुरुवासरे क्षत्रियकुलावतंस श्रीराजा शंभुछत्रपति स्वामी याणीं समस्तराजकार्यधुरंधर विश्वासनिधि राजमान्य राजश्री भगवंत-राऊ अमात्य हुकमतपन्हा यांसी आज्ञा केली ऐसी जे :—

तुह्मीं विनंतिपत्र पाठविलें तें प्रविष्ट जाहलें. राजश्री मोरेश्वरराव यांणीं मागती खटला आरंभिला. वस्तभाव ओळखिली आहे, ते देत नाहीं. स्वामींनीं न्यायतः त्यांस आज्ञा करावी. अंगानिराळे टाकिलें, ऐसें सत्य असलिया आपण पाहून घेऊं, ह्मणून कितेक तपसील लिहिलें तें विदित जाहलें. ऐशास, तुमचे घरगुती प्रसंग घरचेनरीं त्यांणीं तुह्मी समजावें. स्वामीकडे या गोष्टीचा कांहीं गुंता आहे, ऐसें नाहीं. ह्मणून पाहिलेंच तुह्मांस लिहिलें. तथापि तेंच तें तुह्मी लिहितां. स्वामींनीं अंगानिराळें टाकिलेंसें सत्य असलिया पाहून घेऊं ह्मणून लिहिलें. तरी मोरेश्वररायाचें अगत्य धरून तुमचा प्रसंग अंगानिराळा टाकिला, ऐसें तो कांहीं जालें नाहीं. न्यायतः सांगावें, त्यास, तुह्मी उभयतांहि सन्निध नाहीं. सन्निध आल्यानंतर न्यायताही सांगणें तसें सांगितलें जाईल. मांजिलें पत्रें, नवांजिलें मरें! साहेबीं पायीं लोटूं नये ह्मणून कितेक लिहिलें. तरी ऐसें लिहावेसें काय जालें आहे? सर्व प्रकारें तुमचें चालवावयास स्वामीपासून अंतराय कांहीं होत नाहीं. यलकेचीसाल व वाघ्याच्या शेंगा व काठ्या पाठविल्याप्रमाणें प्रविष्ट जाहल्या. वरकड मल्हारजी सांगतां कळेल. बहुत लिहिणें तरी सुज्ञ असा.

मर्यादेयं
विराजते.

---

[ १०९ ] श्री. ३ एप्रिल १७२९.

स्वस्तिश्री राज्याभिषेक शके ५५ सौम्य नाम संवत्सरे चैत्र बहुल प्रतिपदा गुरुवासरे क्षत्रिकुळावतंस श्रीराजा शंभुछत्रपति स्वामी याणीं समस्तराजकार्यधुरंधर विश्वासनिधि राजमान्य राजश्री भगवंतराऊ अमात्य हुकुमतपन्हा यांसी आज्ञा केली ऐसी जे:—

तुह्मीं विनंतिपत्र तुकोजी खाडे व मल्हारजी सूर्यवंशी यां समागमें पाठविलें तें प्रविष्ट जाहलें. आपण स्वामीचे हुकुमतारदार सेवक,

स्वामीचे आज्ञेपेक्षां विशेष आपणांस कांहीं नाहीं, धनसंपदा सर्व स्वामीची आहे, आपण साहेबांचीं लाविजे झाडें आहों, आपला अभिमान स्वामीस आहे, उतगेमातगे चाकर नहों, ह्मणून कितेक तपसिलें निष्ठापूर्वक लिहिलें तें सविस्तर विदित जालें. व तुह्मांकडील हरदू जणांनींही केलें. ऐशास तुह्मीं जें लिहिलें तें यथार्थ आहे. तुह्मांस स्वामीचे आज्ञेपेक्षां कांहीं विशेष आहे किंवा तुह्मांजवळ जे धनसंपदा आहे ते स्वामीची, एतदर्थी कांहीं अन्यथा आहे ऐसें नाहीं. जो स्वामीचा मनोदय तेंच तुह्मांस परमावश्यक आहे. तेथें उतगेमातगेपणाची संभूति ही तुह्मांकडे येणें नाहीं. स्वामीचीं लाविजीं झाडें ह्मणविता तद्वतच स्वामीस पूर्ण तुमचा अभिमान आहे. त्याप्रमाणें तुमचें साभिमानपणें चालवायास स्वामी अंतराय कदापि होऊं देणार नाहींत. येविशीं हल्लीं जोत्याजी दळवी वा मुल तुह्मांकडील एकजण यासमागमें बेलरोटी पाठविली आहे. येविशीं विशदेकरून ल्याहावें तरी मनोमन साक्ष आहे. तत्रापि दर्शनानंतरही कळेल. हाल्लीं पाठविले आहेत हे आज्ञेप्रमाणें जबानी सांगतां कळेल व गांवांविशीं लिहिलें तरी राजश्री नारो हणमंत तुह्मांकडे गेले आहेत. त्यास त्या गांवचा प्रसंग ठाउका आहे. तथापि ते हुजूर आल्यावरी त्याजवळ आज्ञा केली जाईल. वरकड कोणेविशीं संदेह धरावासे नाहीं. जें जें स्वामी बोलिले आहेत त्यास सर्वात्मना तफावत होणार नाहीं. येविशीं राजश्री नानाजी वैद्य व राजश्री केशव त्र्यंबक लिहितां कळेल. जाणिजे. सुज्ञ असा.

---

[ ११० ] श्री. ६ एप्रिल १७२९.

स्वस्तिश्री राज्याभिषेक शके ५५ सौम्यनाम संवत्सरे चैत्र बहुल चतुर्थी रविवासरे क्षत्रियकुलावतंस श्री राजा शंभुछत्रपति स्वामी याणीं समस्तराजकार्यधुरंधर विश्वासनिधि राजमान्य राजश्री भगवंतराऊ अमात्य हुकुमतपन्हा यासी आज्ञा केली ऐसी जे :—

तुह्मीं हाल्लीं विनंतिपत्र पाठविलें तें प्रविष्ट होऊन लिहिलें वृत्त विदित जालें. ऐशास रत्नागिरीबावत हल्ली आपण स्वामीस नजर करून

रत्नागिरीचा प्रसंग आपले स्वाधीन जाल्यावरी आधीं हे गोष्ट कर्तव्य, आपण कांहीं आपाजीराव नव्हों, ह्मणून तुह्मीं कितेक नारोराम हरकारा व मल्हारजी सूर्यवंशी यांसमागमें सांगोन पाठविलेंत, त्यावरून यदर्थी अपूर्व कार्य आहे कीं, तुह्मीं सेवक असेच आहा! वडीलवडिलापासून स्वामिकार्यप्रसंगें धण्यास संतोषी करून आपली नामना संपादित आलेस, तेथें वरकड गोष्टीचें अगाध आहे ऐसें नाहीं. त्यास, तुह्मीं रत्नागिरीचा प्रसंग उत्तर लिहून हातीं घेऊन त्यावड्यास आलेस, हत्ती स्वामीस देणार, ऐसें वर्तमान परस्पर व तुह्मांकडील येथें आले गेले त्यांनींही सांगितलें. तेव्हां तुह्मींही बोलिले होतेस तदनुरूपच हे चर्चा आहे, ऐसें स्वामींनीं मनांत आणून जोत्याजी दळवी यासमागमें हत्ती पाठवून द्यावयाविशीं लिहिलें. त्यावरी तुह्मीं जोत्याजी दळवी व सूर्याजी खाडे व मल्हारजी सूर्यवंशी यांसमागमें सांगोन पाठविलें कीं, हत्ती नजर करीतच आहों, त्यास गोपाळराव यांचे समजाविसीस स्वामींनीं एक हत्ती द्यावा व आपला अभिमान धण्यास असावा, ये गोष्टीचें अभय शपथपूर्वक आपणास असावें. ह्मणून सांगून पाठविलेंत. त्यावरून स्वामींनीं तुह्मास बेलरोटी, पत्र पाठविलें. गोपाळरायास एक हत्ती द्यावयाची गोष्ट ती सामान्य केली. आणि तुह्मांकडील आले होते त्यांजवळ राजश्री नानाजी वैद्य व केशव त्र्यंबक यांचे विद्यमानें निश्चयपूर्वक होऊन जोत्याजी दळवी व तुकोजी व मल्हारजी यास तुह्मांकडे पाठवून दिलें. प्रस्तुत तुह्मीं हुजूरचे पत्रीं लिहिलें कीं, नानाजी वैद्य व केशव त्र्यंबक यांस लिहिलें आहे ते विदित करितील. त्यावरून त्यास तुह्मीं काय लिहिलें ह्मणून मनास आणितां, जें तुह्मीं लिहिलें तें अव्यवस्थच लिहिलें! तरी हे चर्चा कांहीं स्वामींनीं केली नसतां, तुह्मीं ऐसें काल्पनिक ल्याहावें हें उचित नव्हे. तुह्मीं होऊन बोलिलेस आणि स्वामीस सांगोन देखील पाठविलें कीं, आपण आपाजीराऊ नव्हों. त्यास, गोपाळरायाचे समजाविसीची ही गोष्ट स्वामींनीं मान्य केली होती. किंबहुना, गोपाळराव स्वामीची आज्ञा घेऊन जाऊं लागले तेव्हां त्याणींही विनंति केली ते समई त्यासही स्वामींनीं सांगितलें कीं, भगवंतराव यांचें दर्शन जाहल्यावरी तुमचेंही

समाधान स्वामी करितील; परंतु तुह्मीं शेवट ऐशी गोष्ट केली. त्यास, क्षुद्र मनुष्याचे बोलें वर्तता! आजवरी क्षुद्राचे विचारें जें जालें तें तुमचें तुह्मांस ठाउकें आहे. पुढेंही प्रत्ययास येईल. वरकड स्वामींनीं क्रियापूर्वक तुमचें चालवूं ह्मटल्यास स्वामीकडून अंतर होणेंच नाहीं. परंतु तुमचें तुह्मांसच अनुभवास येईल. वरकड हत्तीचा विषय बहुतसा नाहीं. स्वामींनीं हत्ती बहुत गिळविले, बहुत पाळिले, आणखीही पाहिजेत ते मिळतील. परंतु तुह्मींही होऊन सांगोन देखील पाठविलेंत त्याचा परिणाम लवकर कळला हें बरेंच जालें. आपाजीराव आपण नव्हों ह्मटलेंत. त्यास, आपाजीरायानीं करायाचें तें केलें. स्वामीस कांहीं हत्तीचें अगत्य आहेसें नाहीं. हत्ती तुह्मांस असो देणें आणि आपलें समाधान असो देणें. स्वामीस हत्ती मिळतील. कांहीं चिंता नाहीं. तुमचें समाधान राहिलें, ह्मणजे सर्व झालें. येविशीं जोत्याजी दळवी यास आज्ञा केली, सांगतां कळेल. सुज्ञ असा.

---

[ १११ ] श्री. १७३०.

राजश्री भगवंतराव पंडित अमात्य हुकुमतपन्हा गोसावी यांसीः—

छ सकलगुणालंकरण अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य स्नो फत्तेसिंग भोसले दंडवत विनंति उपरी येथील कुशल जाणून स्वकीय लेखन केलें पाहिजे. विशेष. पत्र पाठविलें प्रविष्ट होऊन लेखनार्थ अवगत झाला व कितेक वर्तमान रा० गोविंद व्यंकटाद्रि यांनीं निवेदन केलेवरून कळलें. ऐसियास राजश्री स्वामींनीं तीर्थरूप राजश्री काकासाहेबांस आणावयास राजश्री नारबा यास व राजश्री प्रतिनिधीस रवाना केलें आहे. ते लौकरीच दर्शनास येतील आणि आपल्याकडेही राजश्री भवानीशंकर यांस पाठविलें आहे. आपण आलियावरी त्यांचें व तुमचें सौरस्य आपल्या मनोदयानुरूप करून द्यावें, कदाचित् मनोदयानुरूप गोष्टी घडो न ये तरी आपल्या स्थळास आपल्यास आज्ञा देऊन पाठवावें, ऐसा निश्चय करून आपल्यास पत्र

लिहिलें आहे. तरी राजश्री स्वामीच्या पत्राचा अर्थ मनांत आणून आपण अविलंबें दर्शनास आलें पाहिजे. दर्शनानंतर ज्या गोष्टी आपले चित्तीं आहेत त्या होऊन येतील. तरी कोणेविशीं चित्तांत संदेह न आणितां अविलंबें दर्शनास आलें पाहिजे. रवाना छ १९ जिल्हेज. बहुत काय लिहिणें. लोभ असो दीजे. हे विनंति.

लेखनावधिमुद्रा.

श्रीशिवशंभुस्वामिनि
शाहूभूपेशपार्थिवोत्तंसे ॥
परिणतचेतोवृत्तेः फतेसिं-
हस्य मुद्रेयम् ॥

---

[ ११२ ] श्री. १७३०.

राजमान्य राजश्री भगवंतराव पंडित यांसी आज्ञा केली ऐसी जे:— तुह्मीं विनंतिपत्र पाठविलें तें प्रविष्ट झालें. लेखनार्थ अक्षरशा अवगत झाला. तुह्मांकडून गोविंद व्यंकटाद्रि आले, यांणीं विनंति केली त्याजवरून सविस्तर कळों आलें. ऐसियास, चिरंजीव राजश्री संभाजी राजे यासी भेटीस आणावयाबद्दल चिरंजीव राजश्री फत्तेसिंग भोंसले व राजश्री श्रीनिवास पंडित प्रतिनिधि व राजश्री नारो रामचंद्र मंत्री व राजश्री बाळाजी बाजीराऊ रवाना केले आहेत. हे चिरंजीव राजश्री यास घेऊन येतील. तुह्मांसही हुजूर दर्शनास यावयाची आज्ञा करून राजश्री भवानीशंकर मोरेश्वर यास पाठविलें आहे. हे स्वामींचीं आज्ञावचनें सांगतील. तरी तुह्मीं कोणेविशींचा संदेह चित्तांत न आणितां पत्रदर्शनीं स्वार होऊन हुजूर दर्शनास येणें. तुमचे मनोदयानुरूप विवेक करून दिल्हा जाईल. कदाचित् बनाव न बसे तरी तुह्मांस तुमचे स्थळास याल तैसे पोहोंचाऊन दिल्हें जाईल. निःसंदेहरूप पत्र पावेल ते क्षणीं स्वार होऊन येणें. विलंबावरी न घालणें. कि

आज्ञा करणें ते गोविंद त्र्यंबकाद्रि यांस केली आहे. सांगतील त्यावरून कळों येईल. जाणिजे. सुज्ञ असा.

---

[ ११३ ] श्री. १७३०.

श्रीमंत राजश्री पंत अमात्य हुकमतपन्हा स्वामीचे सेवेसीः— विनंति सेवक द्वारकोजी यादव कृतानेक विज्ञापना विनंति स्वामीचे दयेनें वर्तमान यथास्थित असे. विशेष. आपण पत्र पाठविलें तें श्रीमंत सकळसौभाग्यादिसंपन्न मातुश्री बाईसाहेबांस विदित केलें. त्याचें प्रत्युत्तर पाठविलें आहे. त्यावरून अभिप्राय कळों येईल. मुख्य गोष्ट स्वामी थोर आहेत, आणि आह्मीं सामान्य सेवक, असें असोन आह्मांस खोल पाण्यांत घालावयाचें नव्हतें. यद्यपि हीं थोरपणें स्वामीचींच आहेत त्याचें निदर्शन कीं, आपला कोणी भला माणूस कारकून विश्वासूक इमानीइतबारी व विनंतिपत्र ऐसें हुजूर पाठवून द्यावें. येथील मर्जीमाफक स्वामींनीं वर्तणूक करावी. बोलल्या वचनाप्रमाणें कार्यभाग घडोन हें यश स्वामींनीं आह्मांस द्यावें, नाहीं तरी वारंवार स्वामीकडील पत्रें येतच आहेत. एकवेळ मल्हारी आला. दुसरे खेपेस-दुसरा माणूस पाठविला, असें असतां धन्यास तरी कोणप्रकारें अर्ज करावे?. मुख्य गोष्ट, धन्याचे पायाशीं निष्ठा धरून आणि आपलेंसें करून घ्यावें यांतच उत्तम, लौकिकहि बराच आहे. याउपरि स्वामींनीं दुसरें तिसरें कांहीं ह्मणों नये. धन्याचे पायाशीं दृढ निश्चयें मिठी घालावी. त्याणीं तुमचें सर्वप्रकारें चालवावें, येणेंकरून उभयपक्षींहीं बरें दिसतें. नाहींतरी तुमचें विनंतिपत्र हुजूर येणें तें आह्मां लघु मनुष्यास स्वामींनीं गौरव दिल्ह्यासारिखा आह्मांस यश द्यावें. कारकून विश्वासू इमानीइतबारी ऐसा सत्वर पाठवावा. विलंबावरी घातल्यानें एक प्रकारें दिसतें. इतके दिवस झालें तें झालें. याउपरि स्वामींनीं विलंबावरी घालावें ऐसें नाहीं. स्वामीचें वचन ह्मणजे शापादपि शरादपि ऐसें आहे. आह्मांस यश देऊन धन्याची तुमची गोष्ट होय

तो अर्थ करावा. विशेष लिहावें तरी स्वामीस मानमार्ग न कळेसा काय आहे? जेणेंकरून लोकोत्तर यशकीर्ति आम्हां लघु मनुष्यास सांगितल्यास सांगितल्याप्रमाणें घडावें हे उत्कंठा आहे. यश दिल्हें पाहिजे. हे विज्ञापना. याउपरी जें पूर्वी झालें तें उत्तम न झालें. जरीकरितां आपले विचारें गोष्टी करावी असें असलें तरी पत्रानें उत्तर व कारकून ऐसें सत्वर पाठवावें, नाहीं तेंहि पत्रानें उत्तर पाठवावें, म्हणजे आम्हासारख्यांची स्थिर राहील. आधीन आपली इज्जत थोडकी ते रक्षिलियानें बरें. याउत्तर साफ जाब सत्वर पाठवावा. दिवसगत लावावीशी नाहीं. तथापि हा विचार न होय तरी, आपण सरकारकून, हे धनीच आहेत, तेथें आम्ही काय ल्याहावें? हे विज्ञापना.

---

[ ११४ ] श्री. १७२०

विनंति उपरि. येथील कुशल आषाढ वद्य चतुर्दशीपावेतों यथास्थित असे. विशेष. आपण त्रिंगो रघुनाथ यासमागमें पत्र पाठविलें तें पावलें. त्याउपरि त्याची रवानगी करावी तों स्वामीकडे अगोदर आम्हाकडील राजश्री आनंदराव पाठविले होते ते व आपणाकडील रा० रामाजी शिवदेऊ पत्रें घेऊन आले. अनुक्रमें दोनही पत्रांवरून व मानिल्हेच्या मुखांतरावरून आद्यंत कळोन समाधान झालें. ऐशास, आपण राज्यांतील धुरंधर, धन्यानीं दिवसेंदिवस कृपा करावी, हेंच उचित आहे. प्रसंगोपात्त जें होणार त्यास ईश्वरइच्छा; तथापि आपणानिराळे कोणी नाहींत. प्रस्तुत सविस्तर अर्थ महाराज राजश्री स्वामीचे सेवेसी विदित करून उभयतांस दर्शन करविलें. याजकडूनही जो अर्ज करवणें तो करवून अवघा अर्थ श्रवण झाला. त्यास, सारांश गोष्ट, स्वामीकडून सभ्य मनुष्य येऊन बोलीचाली व्हावी, याकरितां धन्यास विनंति केली. त्यावरून राजश्री नारो केशव यास आणावयाविशीं हुजुरून आज्ञा झाली आहे व उभयतांसही धन्यानीं स्वमुखें आज्ञा केली असे. तरी कोणेविशीं संदेह न धरितां नारोपंतास येथवरी पाठवून द्यावें. बोलीचालीमुळें बनाव होऊन

आल्यास मग कांहीं चिंता नाहीं. हे गोष्ट न व्हे तेपक्षीं नारोपंतास निश्चयात्मक पावून देऊन मागील प्रसंगाकरितां कोणी पाय घेत नाहीं ह्मणून लिहिलें. तरी तो विचार आणिला होता. आतां आह्मीं आहों. आमची रीत आपणास न कळे ऐसें नाहीं. तरी सत्वर मानिल्हेस पाठविलें पाहिजे. येविशीं सविस्तर मानिल्हे सांगतां कळों येईल. मुख्य धनी यांची दया संपादून घ्यावी, यांत सर्वही स्वामीचें स्वहित आहे. येविशीं मानिल्हे सांगतां कळों येईल. बहुत काय लिहिणें. कृपावर्धमान केली पाहिजे. हे विनंति.

---

[ ११५ ] श्री. १७३०.

राजमान्य राजश्री भगवंतराऊ अमात्य हुकमतपन्हा यासी आज्ञा केली ऐसी जे:—तुह्मीं नारायण हरकारा यासमागमें तपशिलें विनंति सांगोन पाठविली याप्रमाणें विदित करितां श्रुत झाली. ऐशास, स्वामीस तुह्मापेक्षां दुसरें अधिकोत्तर कांहीं आहे ऐसें नाहीं. तुह्मीं चाकरी करावी आणि दिवसेदिवस उर्जित करून चालवावें हेंच अवश्यक आहे. तुह्मास पेशजी क्रिया दिली तेच आहे. दुसरें कांहीं नाहीं. रा० गोपाळ रामराऊ याचा प्रसंग सांगोन पाठविला तर उत्तम. ते धण्याचे चाकर. त्यांनें चालवावें हें आवश्यक. येविशीं मा। मल्हारजी सांगतां कळेल. याउपरि येथील प्रसंगास तुह्मीं चित्तांत संशय मानावा ऐसें नाहीं. स्वामीचें आगमन बहुतां दिवशीं झालें, दर्शनास येऊन संतोषी करणें येविशीं स्वमुखें मल्हारजीस आज्ञा केली असे. नारायणास सत्वरीच पाठविणें. सुज्ञ असा.

---

[ ११६ ] श्री. १७३०.

सकलगुणालंकरण अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य राजश्री भगवंतराव पंडित स्वामी गोसावी यांसी:—

पोष्य बाजीराव बल्लाळ कृतानेक नमस्कार विनंति उपरी येथील कुशल जाणोन स्वकीय कुशल लिहीत असलें पाहिजे. विशेष. आपण

पत्र पाठविलें तें पावोन संतोष जाहला. राज्यांतील विचार प्रसंग व थोरपण संरक्षण व्हावयाचा व कितेक वरकड विचार विस्तारें लेख केला. व रा। संभाजी पडवळ आले याणीं मुख वचनें निवेदन केलें. त्याजवरून साकल्य अर्थ कळला. ऐशास, आमचा विचार आपणासी आणिका सारखा आहे असें नाहीं. कायावाङ्मनसा आपले अभीष्ट असेल तेंच करावें हें अत्यावश्यक आहे. परंतु राज्यांतील विचार प्रसंग प्रस्तुत कोणे प्रकारचा जाहला आहे, तो आपणास न कळेसा काय? सारांश, आह्मीं उत्तरप्रांतें गेलों होतों ते आलों. राजश्री स्वामीचे दर्शनास जाऊन तेथें आपला प्रसंग सविस्तर राजश्री स्वामीस विनंति करून आपले साहित्यास सर्वथा आह्मांपासून अंतर होणार नाहीं. आह्मीं आपणाखेरीज नाहीं. एतद्विषयींचा कितेक अर्थ रा० संभाजी पडवळ यांस सांगितला आहे. हे आपणास निवेदन करतील. याजवरून कळों येईल. बहुत काय लिहिणें. लोभ असो दीजे. हे विनंति. आह्मीं सातारियास आलियावरी मा।रनिलेस आह्माजवळ पाठवून दीजे. हे विनंति.

---

[ ११७ ] श्री. १७२०.

राजश्री भगवंतराव पंडित अमात्य यासीः—

प्रति सौभाग्यादि संपन्न उपरी येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लिहिणें. यानंतर तुह्मी पत्र पाठविलें तें पावोन लेखनार्थ अवगत जाला. आह्मास बंधु ह्मणविलें त्याचा अभिमान धरून उर्जित करावें ह्मणून कितेक तपशिलें लिहिलें व स्वमुखें रा० शिवाजी मल्हार याणीं मुखवचनें अर्थ निवेदन केला. ऐशास, तुह्मीं पुरातन राज्याचीं संरक्षणें करून यशें विशेषाप्कारें संपादिलीं. त्यांतून विशेष सेवा करून दाखवून मजुरा करून घ्याल हा पूर्ण निशा आहे. बंधु ह्मणविलें त्याचाही पूर्ण अभिमान आह्मांस आहे. कोणेविशीं अंतराय होणार नाहीं. समाधान असो देणें. वरकड सविस्तर मा।निल्हे यास आज्ञा केली

आहे. हे मुखवचनें सांगतां कळों येईल. जाणिजे. छ ५ रमजान. बहुत लिहिणें तर सुज्ञ असा.

---

[ ११८ ] श्रीबालकृष्ण. १७३०.

राजश्री भगवंतराव पंडित अमात्य हुकमतपन्हा यासी :—

प्रति सौभाग्यादि संपन्न बाईसाहेब उपरि येथील कुशल जाणोन स्वकीय लेखन करणें. विशेष. शिवाजी मल्हार याजसमागमें विनंतिपत्र पाठविलें तें प्रविष्ट होऊन लेखनाभिप्राय अक्षरशा अवगत जाहला. दर्शनास यावयाचा मजकूर लेख केला. ऐशास येविशीं राजश्री स्वामीस विनंति करून पेस्तर आज्ञापत्र सादर केलें जाईल. तुमचें सर्वप्रकारें साहेबास आवश्यक आहे. तुम्हास वस्त्रें पाठविलीं आहेत, त्यांची यादी अलाहिदा आहे, तेणेंप्रमाणें घेऊन उत्तर पाठवावें. तुम्हीं जिनस पाठविला तो प्रविष्ट जाहला, व मागाहून मोहे नारळ सुमार ७ सात पाठविले तेही प्रविष्ट जाहले. जाणिजे. छ ९ रमजान. बहुत काय लिहिणें. लेखनसीमा.

रुजु सही.

---

[ ११९ ] श्री. १७३०.

राजमान्य राजेश्री सेखोजी आंगरे सरखेल यासी आज्ञा केली ऐसी जे:—जंजिरे रत्नागिरी येथें तुम्हाकडील उपसर्ग लागतो, येणेंकरून उस्तवारी होत नाहीं, म्हणून हुजूर विदित झालें. ऐशास, राजश्री भगवंतराऊ पंडित स्वामी संनिध आले. आपले निष्ठेचा अर्थ निवेदन केला. त्याचे सर्व प्रकार अभिमान धरून चालवणें व जंजिरेयाची उस्तवारी करणें स्वामीस आवश्यक. असे असतां तुम्हीं उपद्रव करावा हे गोष्ट उत्तम नव्हे. तुम्हीं तेथील साहित्य करावें, उपसर्ग न द्यावा, हें उचित आहे. हालीं हें आज्ञापत्र सादर केलें आहे. तरी जंजिरे मजकुरास कोणेविशीं उपद्रव लागो न देणें. सर्व प्रकारें साहित्य करून जंजिरे माची उस्तवारी होय, स्वामी संतोष पावत, तो अर्थ संपादणें.

वरकड कितेक श्रीनिवास शिवदेऊ तुह्मांस लिहितील त्याप्रमाणें साहित्यास अंतर न करणें. सुज्ञ असा.

---

[ १२० ] श्री.

छत्रपति

राजश्री चिटकोबा गोसावी यासी :—

७ अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य स्नो गुजाजी गाईकवाड सरखवास रामराम विनंति उपरि येथील कुशल जाणोन स्वकीय कुशल लिहित जाणें. विशेष. तुह्मीं पत्र पाा तें पावोन लिहिला मजकूर कळो आला. वो राजश्री केशवभट्ट गोटखिंडीकर याचा मजकूर लिहिला तो कळला. ऐसियासी येविशीं श्रीमन्महाराज राजश्री स्वामीचे सेवेसी अर्ज करून आज्ञा होईल त्याप्रों मागाहून लिहिलें जाईल. बावडेस रवाना करणेचे लाखोटे दोन पाा आहेत. येऊन पोहोंचतील. वहुत काय लिहिणें. हे विनंति.

---

[ १२१ ] श्री. १७३०.

राजमान्य राजश्री भगवंतराव अमात्य हुकमतपन्हा यासी :—

आज्ञा केली ऐसी जे :—तुह्मीं याउपरि कोणेविशीं संशय न धरितां स्वार होऊन स्वामिसंनिध येणें. तुमचेविशीं स्वामीचे मनांत कांहीं संदेह असेल तरी श्रीची शपथ असे, व तुह्मींही संदेह धराल तरी तुह्मांस शपथ असे. परिवारसहवर्तमान सत्वर येणें. सुज्ञ असा.

---

[ १२२ ] श्री. १७३१.

सरंजाम राजश्री रामचंद्र पंडित अमात्य वारणेचा उत्तरभाग.

कित्ता सरंजाम देहाय प्रांतहाय
१० प्रांा पन्हाळा.
१ मौजे आईतवडे लोकांचें ताा कोडोली.

कित्ता.
३ पाा पुणें.
१ मौजे बोपेगांव ताा कऱ्हेपठार.
१ मौजे भिवंडी ताा कऱ्हे-

१ मौजे चिकुर्डे ता। कोडोली.
१ मौजे पेट नजीक नेरलें ता। कोडोली.
१ कसबा कासेगांव ता। मजकूर.
१ मौजे आंकलखोप ता। बाजेकर्यात.
४ ता। वाळवें.
१ कसबा वाळवें.
१ मौजे येळूर.
१ मौजे गोटखेंडी.
१ मौजे बाहे.

---

४
१ मौजे कुरडुप पा। कोल्हापूर.

---

१०
६ ता। वारुण.
१ मौजे चांडोली.
१ मौजे उखळु.
२ धनगरमहाल.
१ मळा.
१ पांचगणी.

---

२
१ कसबा चारण.
१ मौजे आरळें.

---

६

पठार.
१ मौजे पाटळून ता। पाटस.

---

३
७ प्रांतकडे वळीत.
१ मौजे खंडाळें ता। मांडोगण.
१ मौजे बांबुरडी ता। पेडगांव.
१ मौजे जेऊर ता। नगर.
१ मौजे सेंडी ता। नगर.
१ मौजे पारगांव ता। चांभारगोंदें.
१ मौजे पिंपळगांव माळी ता। नगर हवेली.
१ मौजे आकुळनेर देखील वाड्या ता। नगर हवेली.

---

७
८ ता। कर्डे रांजणगांव.
१ मौजे तांदळी नजीक काष्टी.
१ रांजणगांव सांडस.
१ मौजे हिवरें.
१ वाडगव्हान.
१ मौजे मोसें.
१ मौजे टांकळी.
१ मौजे न्हावरें.
१ दहीठणें.

---

८

८ ता। शिराळें.
१ मौजे वाटेगांव.
१ मौजे कानंदें.
१ मौजे ईंगरूळ.
१ मौजे चिखली.
१ मौजे कणदूर.
१ मौजे गुजगांव.
१ मौजे देवडें.
१ मौजे नांदगांव.

---

८

१२ प्रांत कऱ्हाड.
१ कसबा मसूर.
१ मौजे तांबवें.
१ मौजे नेरळें.
१ मौजे वेहें.
१ मौजे त्रिपुटी ता। पाटण.
१ मौजे कोकिसरें ता। मरळी.
१ मौजे मारुळ.
१ मौजे बतुळें.
१ कसबा कोळें.
१ मौजे उंबरखचण ता। कोळें.
१ मौजे वडगांव ता। हवेली.
१ कसबा तारगांव.

---

१२

१ मौजे बुरली कर्यात दिगरज पा। कागल.
१ कसबा अमनापूर ता। मजकूर प्रांत रायबाग.

५ सरकार जुन्नर.
१ कसबा नारायणगांऊ.
१ मौजे कासारें ता। आळें.
१ मौजे वणकुटे ता। बेल्हें.

---

३

२ ता। आळें.
१ पिंपळवडी.
१ मौजे सुरबरी.

---

२

---

५

प्रांत तळकोंकण.
४ ता। सावर्डें सुभा दाभोळ.
१ मौजे नांदगांव.
१ मौजे निवळी.
१ मौजे पाळवण.
१ मौजे कळंबुसी.

---

४

१ मौजे अडरें ता। चिपळूण प्रांत दाभोळ.
१ मौजे गोंवळ ता। चिपळूण प्रांत दाभोळ.
६ ता। संगमेश्वर प्रांत राजापूर.
१ मौजे बुरबाड.
१ मौजे कडवई.
१ मौजे तुरर.
१ मौजे सरंद.
१ मौजे कळबस्ते.

६ प्रांत वाई.
- १ कसबा वांई.
  १ पाटखन समत निंब.
  १ वडुथ समत निंब.
  १ मौजे खासूरणें संमत कोरेगांव.
  १ येकंबें संमत कोरेगांव.
  १ मौजे सिरादोण संमत कोरेगांव.

—

६

१ कसबा गेढें ता। गगकूर.

७ सरकार संगमनेर.
  १ कसबा वामोरी ता। राहुरी.
  १ मौजे पिंपळगांवबसवंत पा। चादवड.
  ३ पा। आकोलें.
    १ मौजे सोनारी.
    १ मौजे डुबेरे.
    १ मौजे फटोलें.

—

२

  २ हवेली संगमनेर.
    १ तळेगांव.
    १ निर्गळपिंपरी.

—

२

—

७

४ प्रात सातारा.
  १ मौजे पाडळी.
  १ मौजे कुरघोडें.

—

६

४ ता। हवेली राजापूर.
  १ मौजे आडिवरें.
  १ मौजे नाटें.
  १ मौजे गोठणेंदोनिवडें.
  १ मौजे कशेळी.

—

४

२ ता। पांवस प्रांत राजापूर.
  १ मौजे गोळप.
  १ मौजे काळंबे देखील बाग सरदेसाई.

—

२

१ कसबा प्रभावळी ता। गगकूर प्रांत राजापूर.

३ ता। नेवरें.
  १ कसबा नेवरें.
  १ मौजे पुसाळें.
  १ मौजे कोंतवडें.

—

३

२ ता। देवरुख.
  १ कसबा देवरुख.
  १ मुरादपूर.

—

२

२ तर्फ हरचेरी.
  १ कसबा दा। बंदर.

१ मौजे जिहें.
१ कसबा तारगांव ता॥ मजकूर.
१ मौजे अतीत ता॥ तारगांव.

---

४

८ कसबा भिलवडी प्रा॥ मिरज.
१ कसबा सांगली.
७ कसबा भिलवडी.
१ कसबा भिलवडी.
१ ताकारी.
१ तुफरी.
१ दुधारी.
१ नागराळें.
१ घोगारी.
१ ———

---

७

---

८

२ पा॥ पागरी सरकार परांडे.
१ मौजे कारी.
१ मौजे नारी.
१ मौजे भातंबरे.

---

३

२ ता॥ परळी प्रा॥ सातारा.
१ मौजे आलवडी.
१ पाटघर.

---

२

१ सोमेश्वर.

---

२

४ ता॥ हातखंबें.
१ आसोडें.
१ मौजे निवसर.
१ मौजे केळेंकेळें.
१ मौजे मानगांव.
० ता॥

---

४

२ ता॥ खारापाटण.
१ मौजे तिथवली.
१ मौजे दिगस.

---

२

४ ता॥ लांजे.
१ मौजे हरंचें.
१ मौजे जाडें.
१ मौजे सावड.
१ मौजे गव्हाणें.

---

४

४ ता॥ संवदल.
१ मौजे डोंगर.
१ मौजे कळंबोली.
१ मौजे आगळें.
१ मौजे मोरोसी.

---

४

---

४०

२ पा। खटाव.
  १ मौजे कातरखटाव देखील-वाड्या.
  १ वडूज.

  —
  २

१ मौजे साहली ता। मेंढें कुरणास गांव द्यावें.

वेंकटराऊ रामचंद्र यांचा सरंजाम.

१ पा। सावेंदें फैजपूर सा। आशेरी सुभे खानदेश.
६ सरकार बागलाणचारी.
२ सरकार जुन्नर ता।.
  १ ता। आळें.
  १ ता। वाडें.

  —
  २

---

[ १२३ ] श्री. २० आगस्ट १७३१.

राजश्री भगवंतराऊ पंडित अमात्य हुकमतपन्हा गोसावी यासी:—

छ सकलगुणालंकरण अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य राजश्री फत्तेसिंग भोसले दंडवत विनंति उपरि येथील कुशल जाणून स्वकीय लेखन करीत जाणें. विशेष. पत्र पाठविलें प्रविष्ट होऊन लेखनार्थ कळों आला. उभयता यजमानांची भेटी जाली. ते समयीं आपलें अगत्य करून त्यांचें आपलें सौरश करून दिलें नाहीं. आपला तो किमपि तिळप्राय अंतराय नसतां विपर्यास चित्तांत येऊन नानाप्रकारचीं दुर्निमित्यें

आपल्यावरी आणलीं आहेत. हरएकविशीं थोरले महाराजांनीं आपणास बेलभंडारा दिल्हा आहे. ऐसा कितेक अर्थ तपशिलें लिहिला. ऐसियास, भेटी जालियानंतर राजश्री स्वामींनीं आपलें स्मरण एक दोन वेळां केलें. तें समयीं आपलें आगमन जालें असतें तरी गोसावी यांच्या मनोगतानरूप सौरश होऊन येतें; परंतु आपणांस यावयास + + + + + + + अंतर होणार नाहीं. प्रसंगोचित मजकूर कळों जाईल. प्रस्तुत येथील कितेक अर्थ राजश्री लिंगो रघुनाथ सांगतां कळों येईल. जाणिजे. छ २७ सफर. बहुत काय लिहिणें. लोभ असो दिल्हा पाहिजे. हे विनंति. लेखनावधिमुद्रा.

श्रीशिवशंभुस्वामिनि
शाहूभूपेशपार्थिवोत्तंसे ।
परिणतचेतोवृत्तेः फतेसिं-
हस्य मुद्रेयम् ॥

---

[ १२४ ] श्री. १७३१.

राजश्री भगवंतराऊ अमात्य पंत साहेब:—

॥छ

अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य राजश्री नामाजी पा। दोस मौजे तांदळी दंडवत उपरि. तुह्मीं पत्र पाठविलें वर्तमान अवगत जालें. त्यांसी राजश्री राऊ पंतप्रधान यांचेंही आज्ञापत्र आलें आहे. त्यासी, आपल्या शरिरास सावकाश वाटत नाहीं. त्यासी सीमाउल्लंघन जालियावर आपण पुणियासी जातों. तेथें गेलियाउपर जे हकीकत होईल ते सेवेसी लेहून पाठवूं. बहुत काय लिहिणें. हे विनंति. महादाजी इंगवळे जबानी सांगतां कळों येईल.

---

[ १२५ ] श्री. २ मे १७३१.

स्वस्तिश्री राज्याभिषेक शके ५७ विरोधकृत् नाम संवत्सरे वैशाख शुा सप्तमी रविवासरे क्षत्रियकुलावतंस श्री राजा शंभूछत्रपति स्वामी यांणीं देशमुख व देशपांडे ताा तारळे यासी आज्ञा केली ऐसी जे:—

| ~ श्री ० | श्री आई |
| --- | --- |
| राजाशंभुछत्र-<br>पतिहर्षनिदान ।<br>त्र्यंबकसुत केशव-<br>राव मुख्य प्रधान. | आदिपुरुष श्री<br>राजाशिवछत्र-<br>पतिस्वामिकृ-<br>पानिधि ॥ तस्य<br>परशुराम त्र्यंब-<br>क प्रतिनिधि. |

राजश्री शिवाजी शंकर गोत्र शांडिल्य उपनाम गुपचुप हे स्वामीच्या राज्यांतील पुरातन एकनिष्ठ सेवक. यासी पूर्वी अरळगुंडी ताा कापसी हा गांव इनाम दिल्हा होता. तो दूर करून हालीं त्याना मुबादला मौजे आंवळी बुा ताा मजकूर हा गांव पेशजीच्या मुकासियाकडून दूर करून यासी इनाम कुलबाब कुलकानू हालीपट्टी व पेस्तर पट्टी जलतरूतृणपाषाणनिधिनिक्षेपसहित, खेरीज हकदार व इनामदार, देह १ एक रास इनाम आजरामरहामत करून दिल्हा असे. तरी तुह्मीं पूर्वमर्यादेप्रमाणें यांचे स्वाधीन करणें. प्रतिवर्षी नवीन पत्राचा उजूर न करणें. आणि मौजेमजकूर यांसी यांचे पुत्रपौत्रादि वंशपरंपरेनें इनाम सुरळीत चालवणें. या पत्राची प्रती लेहून घेऊन अस्सल पत्र याजवळ भोगवटियासी परतोन देणें. निदेश समक्ष.

मर्यादेयं
विराजते.
रुजू समस्त
मंत्री.

---

[ १२६ ] श्रीरघुवीर. १७३१.

राजश्री रघुनाथ देव यांसी आज्ञा केली ऐसी जे:—
शिवराम नामकासमागमें येथून रकारनामक व मकारनामक पाठविला

आहे. याबरोबर कितेक लग्ननिश्चयाचा निर्वाह सांगोन पाठविला आहे. तो वित्तांत ऐकोन त्याप्रमाणें तुह्मीं निर्वाहरूप याबराबरी सांगोन पाठविणें. रकार व मकारनामक येथें येऊन सांगतील ह्मणजे आह्मांस शरीरसंबंध जाला ऐसें कळेल. मकारनामकाबरोबर बिल्वपत्र पाठविलें आहे तें घेणें. माणूस पाठविलें आहे हें सांगतां कळेल. बहुत काय लिहिणें. आपण सुज्ञ असत११११

---

[ १२७ ] **श्रीशंकर प्रसन्न.** १७३१.

राजमान्य राजश्री भगवंतराव पंडित यास आज्ञा केली ऐसी जेः—
तुह्मांकडे राजश्री रामाजीपंत व विठ्ठलपंत पाठविले आहेत. ते जें सांगतील तें स्वामीचीं वचनें जाणोन त्याप्रमाणें मान करून स्वामीच्या दर्शनास मजल दरमजल येणें. नारिंग व केळें पाठविलीं आहेत तें घेणें. बहुत काय लिहीन. सुज्ञ असा.

---

[ १२८ ] **श्री पुरवणी.** १७३१.

राजमान्य राजश्री रघुनाथ देव यास आज्ञा केली ऐसी जेः—
कागलास परिघ पडला आहे. त्यास अस्मादिकांस हेंच आवश्यक आहे कीं, कागलकरास उपसर्ग न लागावा, टकापैका त्यास न पडावा, सुखरूप असावा. ऐसें जरूर आहे. तरी तुह्मीं एक करणें कीं, तेथील परिघ निघेल व टकापैका न पडे तें करणें. येविशीं अनमान न करणें. लिहिल्याप्रमाणें वर्तन करणें.

---

[ १२९ ] **श्री.** १७३१.

रा० रघुनाथ देवासी. उपरि. तुह्मीं नारो दीक्षितास व उभयतांस पत्रें पाठविलीं ते पावलीं. तर तुह्मीं आह्मांपाशीं आलियावर तुमची मजमू व तुमचा जिल्हा व तुमचें मानमहत्व चालवूं. यास अंतर करूं तर श्रीची व आबाची आण असे. तुह्मीं वडील आहां. सही.

---

[ १३० ] • श्री. १७३१.

राजश्री रघुनाथ देव याप्रति आज्ञा जे:—

तुह्मीं उभयतांसमागमें प्रेषिलें तें प्रविष्ट जालें. सकल अर्थ चित्तांत आणून समाधान पावलों. तरी याउपरि अविलंबेंच आगमनार्थ होय तें करणें, यदर्थीं तुमच्या शारदानीं व मातु:श्रीनें लिहिलें असेल. आह्मांपासून तुमचें चालवायास तिळतुल्य अंतर होणार नाहीं. येविशीं नारो दीक्षित व धोंडापंतीं लिहिलें आहे त्याप्रमाणें कार्य सिद्धीस पावणें. उभयतां आचार्य सांगतां कळों येईल. सर्व धंदा तुमचा आहे. हें पत्र सहस्त्र पत्रांचे ठायीं मानून सत्वर कार्यसिद्धि करणें. पुन: मागती उत्तर प्रत्युत्तराचें प्रयोजन नाहीं. अस्मादिकांकडील एकच वचन कीं, निर्वाह केला त्यास अंतर नाहीं. हें पूर्ण चित्तीं धरून कांहीं मीनमेष न करितां आगमन करणें. आपण प्रयाण सत्वर करणें. बहुत काय लिहिणें. सुज्ञ असा.

---

[ १३१ ] श्री. १७३१.

आज्ञा केली ऐसी जे:—

तुह्मीं विनंतिपत्र पाठविलें तें पावलें. अक्षरश: वृत्त विदित होऊन स्वामी संतोषी जाले. तुह्मीं यादी पाठविली ती चित्तारूढ करून करार केली आहे. राजश्री गोंदजी गायकवाड आले. तुह्मीं लिहिल्याप्रमाणें त्यांनें समाधान करून पुन: तुह्मांकडे पाठविले आहे. कितेक वृत्त शपथपुर:सर कार्यकर्तव्यतेचा अर्थ यांसी आज्ञा केली आहे. हे व विठ्ठल कृष्ण व तुकोजी खांडे ऐसे तुह्मांपाशीं पाठविले आहेत. हे आज्ञेप्रमाणें सांगतील तें मनाशीं आणून अविलंबें कार्य सिद्ध करून महद्यश घेतलें पाहिजे. अत:पर सर्व प्रकारें तुमच्या भरोशावरी स्वामी निश्चित आहेत. सविस्तर वृत्त राजश्री गोंदजी गायकवाड व उभयतां सांगतील त्यावरून कळों येईल. रा। रागाजीपंत व रा। गोंदजी गायकवाड व तुकोजी खांडे व विठ्ठल कृष्ण जे सांगतील ते आमचीं वचनें जाणोन कार्य सिद्धीस पावणें.

विलंबावर न घालणें. हें पत्र लक्षपत्रांचे जागा मानून सिद्धीस पावणें. दुसरिया पत्राचा मार्ग न पाहणें. बहुत काय लिहीन. सुज्ञ असा.

---

[ १३२ ] श्री. १७३१.

रा रघुनाथ देवास. उपर. उद्धवसुत येथें आले. तुमचें वर्तमान सांगितलें. तें परिसून समाधान जालें. याउपर सत्वर तुमची व आमची भेट लवकर होय ते करन. जे ठायीं राहातां तो ठाव आनीक येकदोन ठाव हाताखालीं घालण. दुसरा विचार न करण. केल कार्य सिद्धीस पावन. तुमचा अभिमान आमास असे. तुमच उतर यतान दीक्षितास करविरास पाठिवितो. चकारपूर्वक मातुःश्रीच्या दरसनास येतो. तर तुह्मीं बुद्धीस धका न खान. बहुत काय लिहिन. आपन सुदन असा.*

---

[ १३३ ] श्री. १७३२.

राजश्री उदाजीराव चव्हाण हिंमतबहादर गोसावी यासी :—

छ अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य स्नेहांकित केशव त्र्यंबक रामराम विनंति उपरि येथील कुशल जाणून स्वकीय लेखन करीत गेलें पाहिजे. विशेष. गोसावी यांनीं पत्र पाठविलें तें पावलें. तेथें लिहिलें कीं, उत्तरेकडील तहपैकीं राजश्री पंतअमात्य यांकडील खामगत खेडीं व गगनगडच्या तनखियाच्या खेड्यावरी काय पट्टी घातली तें लिहून पाठवणें. पैकियाचा निशा आह्मांकडे झाला. पट्टी लेहून पाठवणें. पैका पाठवून देऊन, राशिवडे, सांगरूळ खेरीज करून वरातदार पाठविले असतील ते आणवणें. ह्मणोन लिहिलें. त्यावरून वरातदार पाठविले होते ते उठवून आणविले. मनारोखे पाठविले आहेत. आपल्या लिहिल्यापेक्षां अधिक काय आहे? गांवगन्नांची पट्टी पाठवणें तरी राजश्री दामाजीपंत गोसावी याकडे चौथाईच्या तहाकरितां पाठविले आहेत. ते तह करून आल्यानंतर त्याप्रों पट्टी करून

---

* हें पत्र खुद्द शंभुमहाराज यांच्या हातचें असे.

गांवगन्ना आपणाकडे लेहून पाठवून राशिवड्याचे व सांगरूळचे गोसावी याकडे दिल्हेच आहेत. बहुत काय लिहिणें. कृपा असो दिल्ही पाहिजे. हे विनंति.

---

[ १३४ ] श्री. १७३२.

श्रीराजाशंभुछत्र-
पतिस्वामिचरणीं तत्पर ।
उदाजी चव्हाण हिंमतबहादर
ममलकतमदार निरंतर.

राजश्री देवराऊ गोसावी यासी : —

छ अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य स्नो उदाजीराव चव्हाण हिंमतबहादर ममलकतमदार रामराम विनंति उपरि. राजश्री पंतअमात्य हुकमतपन्हा यांचा आमचा स्नेह जो आहे तो अद्वैतभावें आहे. त्यास त्याकडील महाल.

| पंचगंगेअलीकडील महाल. | पलीकडील महाल. |
|---|---|
| १ काा वडगांव. | १ काा जुगुळ. |
| १ काा अळतें. | १ काा लाट. |
| १ काा रुकडी. | १ काा सावगांऊ. |
| —— | १ काा सदलगें. |
| ३ | १ काा एकसंबें. |
| | १ काा रायबाग. |
| | १ काा नेज. |
| | —— |
| | ७ |

येथील बाबती येणें. त्यास रयत हरामजादगी करून अमल सुरळीत देत नाहीं. याजकरितां त्यांजकडून राजश्री रामराऊ आह्माकडे आले. त्यास, त्यांची आमची बोली होऊन करारमदार झाला कीं, त्यांचा अंमल

तानेही लोक डोंगराखाले नजीक आहेत, वरचेवरी उपराळा व्हावा लागतो, ह्मणून लिहिलें तें विदित जालें. सिताबीनें तुह्मीं जमाव पाठवून डोंगर धरिला, उत्तम गोष्ट केली. सांवताचा जमाव नजीक आहे यास्तव डोंगर मजबुतीनें राखावा लागतो. त्यास तेथें लोक पाठविले आहेत, त्यांची बेगमी करून त्याणीं आणविलेप्रमाणें सामान पाठविणें. रांगणा, भूधरगड व बाळाजी देसाई व सरवडे आदिकरून गांवोगांवचा जमाव पत्रें पाठवून रवाना करविला आहे. सांवताकडील जमाव नामोहरम होऊन गेल्याउपरी, डोंगर धरिला आहे त्याचा विचार विचारेंकरून स्वामी करणें तो करतील. खडावा जोड व वहाणांचे जुते पा। ते हुजूर प्रविष्ट जाहले. बहुत लिहिणें तरी तुह्मीं सुज्ञ असा.

मर्यादेयं
विराजते.

बार.

---

[ १३६ ] श्री. ६ सप्टेंबर १७३२.

स्वस्तिश्री राज्याभिषेक शके ५९ परिधावी नाम संवत्सरे भाद्रपद बहुल चतुर्दशी सौम्यवासरे क्षत्रियकुलावतंस श्रीराजा शंभुछत्रपति स्वामी याणीं राजमान्य राजश्री गोपाळ रामराव मुतालीक दिंमत अमात्य यांसी आज्ञा केली ऐसी जे:—तुह्मीं हुजूर विनंतिपत्र पाठविलें, व राजश्री बाळाजी माणको याजवळ कितेक अर्थ सांगोन पाठविला. विनंतिपत्रावरून व याचे मुखोत्तरें सविस्तर विदित जाहलें. सारांश, लिहिलें कीं, फोंडसांवतानीं सदानंदगडास अपाय करावया विचारावरी येऊन हावभर जाहला होता. हें वर्तमान स्वामीस हुजूर विदित जाहलें, तेच समयीं स्वामींनीं राजश्री भगवंतराव अमात्य हुकुमतपन्हा यांस आज्ञा केली. तेसमयीं तुह्मीं जमावांनिसी जाऊन सांवतास ठाई ठेऊन जागा हस्तगत करून चळकटीनें आहा. पुढें त्या जागियावरून साहेबकाम करून आपले सेवेचा मजुरा करून घ्यावा, ह्मणून निष्ठापूर्वक लिहिलें, व बाळाजी

माण तो यांणीही तपशिलेंकरून सांगितलें. त्यावरून स्वामी तुह्मांवरी बहुत संतोषी जाहले. तरी तुह्मी अंगजाचे, मर्दाने, स्वामिकार्यकर्ते, सेवक तैसेच आहा! तुमचे वडिलीही स्वामिसेवा सामान्य केली आहे ऐसें नाहीं. तुमचें सर्वा गोष्टींनें उर्जित करून चालवणें यापरतें स्वामीस दुसरें अधिकोत्तर तें काय? तुह्मी आपले सर्वा गोष्टींनीं चित्तास समाधान असो देणें. किल्ला नवा वसविला आहे तेथील बेगमी जाहलियानें जागा जतन होतो, ह्मणून लिहिलें तें कळलें. ऐशास, तेथील बेगमी करणें हें स्वामीस परम आवश्यक जाणून किल्याचे बेगमीस तां। साळसीची खेडीं सुमारें ९ नऊ व तां। खारापाटण व तां। संवदळ या दो माहालांत रुपये २००० दोन हजार दिले आहेत. ते राजश्री सखोजी आंगरे सरखेल व संभाजी आंगरे सरसुभेदार आरमार यांस आज्ञापत्रें सादर केलीं आहेत. तरी तुह्मीं सदरहू दोन हजार रुपये वसूल करून घेणें. जागा जतन करून राहणें. वरकड मजकूर मा। सांगतां कळेल. बहुत लिहिणें सुज्ञ असा.

मर्यादेयं विराजते.

सुरू सुद बार.

---

[ १३७ ] श्री.

० श्री ~

सामंतकुलेशोभानु-

मंगलाख्यमहेश्वरः ।

नागसामंतमुद्रेयं जन-

भूत्यै विराजते ॥

राजश्री पंत अमात्य गोसावी यासी :—

७ सकलगुणालंकरण अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य स्नेो। नागसावंत भोसले सरदेसाई प्रांत कुडाळ व महालनिहाय रामराम येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लेखन केलें पाहिजे. विशेष. आपण पत्र

पाठविलें पावोन बहुत संतोष जाहला व रा० धोंडोपंत व रा० नरसिंगराऊ जाधव हे उभयतां आले त्याणींही कित्येक ममतायुक्त आपलीं वचनें सांगितलीं. त्यावरून चित्ताचे ठायीं हर्षोत्कर्ष जाहला ते पत्रीं लिहिनां पुरवत नाहीं. आपला आमचा स्नेह अकृत्रिम चालत आला, त्याची वृद्धि होऊन दिवसेंदिवस स्नेह अधिक चाले तो अर्थ केला पाहिजे. यानंतर मनसबेचा अर्थ चित्तांत आणून आपल्या पत्रावरून आवाडेहून कूच करून हेरेस आलों तों आपलीं पत्रें आलीं. त्यामध्यें दिरंग दिसोन आला. त्याउपर मनसबा योजावा तर प्रजन्य समीप येऊन दिवस थोडके राहिले. तेव्हां सहजच प्रस्तुत कालें मनसबेचा अर्थ राहिला. त्यातून उभयपक्षींच्या भेटीही राहिल्या. बरें! जेव्हां उभयपक्षीं चित्ताचे ठायीं दुसरा अर्थ कदाप नाहीं तेव्हां समयोचित भेटीही होतील. मुख्य गोष्ट चातुर्मास प्रजन्य काल. तो जातच आहे. त्याउपर दुसरें कारणें उभयपक्षीं भेटी होऊन जो मनसबा करणें तो पोक्ताच करावा यदर्थींचा कितेक मजकूर रा० पंत मा॥ यास स्वमुखें सांगितला असे. ते अनुक्रमें आपणास निवेदन करितील. त्यावरून कळो येईल. राजश्री संभाजी आंगरे सरखेल याजकडे आह्मांकडील भला माणूस व पत्रें पाठवावीं ह्मणोन आपण सांगोन पाठविलें. त्यावरून हालीं पत्रें पाठविलीं आहेत. पुढां आपले विचारें रवाना करून दिलीं पाहिजे. मुख्य गोष्ट, आपण आह्मांस कोणही प्रसंग अनकूल करून द्यावा ऐसें चित्तीं जाहलें. तेव्हां सर्व भरीभार आमचा आपणाचवर आहे. त्यास पत्रें लिहिलीं आहेत. त्यानें समर्पक उत्तर आलेनंतर येथून भला माणूसही पाठवून देऊं. घडीघडी पत्र पाठवीत असावें. वरकड कितेक मजकूर पंतमशारानिलेजवळ सांगितला असे. बहुत काय लिहिणें. हे विनंति.

विलसति
लेखनसीमा.

---

[ १३८ ] श्री.

तीर्थस्वरूप राजश्री काका वडिलांप्रति प्रीतिपूर्वक सकल सौभाग्यादिसंपन्न गनाबाई सरदेसाईण प्रांत कुडाळ व माहालानिहाय दंडवत विनंति येथील कुशल जाणोन स्वकीय कुशल लेखन केलें पाहिजे. विशेष. बहुतां दिवशीं आशीर्वाद पत्र पाठविलें प्रविष्ट होऊन बहुत समाधान झालें. याचप्रकारें सर्वदां पत्र पाठवून स्नेहाची अभिवृद्धि जाली पाहिजे. यानंतर पत्रीं कितेक स्नेहभाव आणून वडीलपणें बुद्धिवाद लिहिला तो यथार्थच आहे. आह्मींही आपणाठाईं किमपि दुसरा अर्थ धरीत नाहीं. आपले स्नेहाची जोडी केली ते दिवसेंदिवस वृद्धीतें पावोन विशेषाकारें व्हावी हेंच आह्मांस आवश्यक. यांत दुसरा पदार्थ नाहीं. मातुःश्री आह्मांठायीं स्नेह धरीत होती तैसा तुह्मीं धरावा ह्मणून विशदार्थें लिहिलें. तरी वडिलांठाईं आह्मीं आपणास मानितों. हरयेकविशीं आपणच प्रीति संपादोन स्नेह वर्धमान करावा हें उचित. वरकड भेटीचा मजकूर लिहिला यापेक्षां अधिकोत्तर आणिक काय आहे? असते पदार्थ तुमचे स्नेहाची जोडी केली आहे. येविशीं मुख्यांसही परम आवश्यक आहे. तो विस्तार लिहितां पुरवत नाहीं. हालीं तुह्मीं भाद्रपदमासीं भेटीचा निश्चय लिहिला तो येथूनही करार करून आपणास पत्रें पाठविलीं आहेत. भेटीच्या प्रसंगास एक महिना अवध राहिली आहे. याउपरि अविलंबेंच भेटी होऊन उभयपक्षीं जो कर्तव्यार्थ करणें तो आपले चित्तानुरूप होईल. आह्मीं अपत्यासमान, निरंतर पत्रीं परामर्ष करून स्नेह वर्धमान करवीत असावें. बहुत काय लिहिणें. हे विनंति.

---

[ १३९ ] श्रीविठ्ठल.

० श्री ०

सामंतकुलशोभानु-
मांगलाख्यमहेश्वरः ।
श्रीनागसामंतमुद्रेयं
जनभूत्यै विराजते ॥

राजश्री पंत अमात्य हुकमतपन्हा
गोसावी यांसीः—

७ सकलगुणालंकरण अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य स्नो नाग सावंत भोसले सरदेसाई प्रां कुडाळ व महालानिहाय रामराम विनंति येथील कुशल जाणून स्वकीयानंद लिहित असलें पाहिजे. विशेष. बहुत दिवस क्रमोन पत्र पाठविलें. आदरें परसोन श्रवणें चित्त संतोषातें पावून समाधान वाटलें. याचप्रमाणें प्रतिक्षणीं साकल्य वृत्त लिहून संतोषाभिवृद्धि केली पाहिजे. यानंतर महाराज राजश्री स्वामींनीं उभयतांकडील सौरस्याचा मजकूर लिहिला. अक्षरशा श्रुत जाहाला. त्या कर्तव्यें एकसा विचारें जे आपणाकडील विवेक होऊन आला नाहीं हेंच आह्मांस अयुक्त वाटलें. बरें! आपण राज्यभारी, कर्ते असा. तोही प्रसंग आपले चित्तानुरूप होऊन येईल. ते गोष्टीचे अगाध काय असे? रा० संभाजी आंगरे यांची व आपली भेटी जाहाली. बोलीचाली व्हावी ते पूर्वी सुचविलेप्रमाणें जाहाली असली तर बहुत उत्तम गोष्ट घडली. जो विचार आमचे चित्तीं आवश्यक होता तो संपादिला ते युक्तच गोष्ट केली. बोलीचा मजकूर तरी—आपण सुज्ञ लोक आहा, तेथें सांगणें अगर लिहिणेंसे काय आहे? मुख्य गोष्ट जे, उभय पक्षीं विवेक जाहाला. तेव्हां सर्वही मामला उत्तमच होऊन येईल. इलाचीबेग यांकडील काय वर्तमान लिहावें ह्मणून लिहिलें. तर निजामनुमुल्काकडून बेळगांऊचे किलेदारीस फौजदार होऊन जागा येऊन दाखल जाहाले. आह्मासही स्नेहभावयुक्त येतांच पत्रें आलीं होतीं. चातुर्मास क्रमलेनंतर त्यांची कितेक मनसबे करायाची उमेद आहे. अगोदर फौजेचीही तरतूद करीत आहेत. माल्वणकर याकडील विचार लिा त्यास त्या ह्मामध्यें कटकट मांडिली आहे. किल्लेस रा। शिवाजीपंत कारकून मख्तमर आहेत. त्यांचीं आह्मांस पत्रें आलीं कीं, तुह्मीं आह्मीं मिळून मनसबा करावा, प्रस्तुत जमाऊ पाठवणें. ह्मणून लिा त्यावरून तेथें जमाऊ पाठविला आहे. हमेशा स्वारी शिकारी करून

पायचंद लागला आहे. महादाजी अनंताचा मजकूर लि॥. बरें! त्याचें अगत्य कोणतें आहे? उभय पक्षीं भेटी होतील तेव्हां त्याचेंही पारपत्य केलें जाईल. भेटीचे प्रसंगाबद्दल अगोदर भाद्रपदमासीं रा॥ माद पाध्ये यास पाठवितों असें लि॥. बहुत बरें! सर्वही एकीकडेस ठेऊन आधीं भेटी व्हावी हाच इत्यर्थ आहे. एतद्विषयीं दुसरा विचार किमपि नाहीं. भाद्रपदमासीं त्यास आधीं पाठवावें. तैसेंच आपले भेटीचा लाभ होऊन पुढील कर्तव्यता जे करणें ते आपले विचारें केली जाईल. प्रस्तुत भुळाजी यास पाठविले. सांगतां कळों येईल. मागून भला मनुष्य पाठवितों. आपले विचारास येईल तरी समागमें मजुरा देऊन पुढें आंगरेकडे रवाना करावे. मुख्य गोष्ट आपली भेटी व्हावी हा हेत आमच्या चित्तीं. भेटी होऊन येई तेव्हां मनाची निशा होऊन स्वस्थता दिसेल. बहुत काय लिहावें. विनंति.

विलसती
लेखनावधि.

---

[ १४० ] श्री.

० श्री ~

सामंतकुलेशोभानु-
र्मंगलाख्यमहेश्वरः।
श्रीनागसामंतमुद्रेयं
जनभूत्यै विराजते ॥

राजश्री पंतअमात्य
गोसावी यांसी:—

छ सकलगुणालंकरण अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य स्नो॥ नाग सावंत भोसले सरदेसाई पा॥ कुडाळ व माहाल॥निहाय रामराम विनंति येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लिहित असावें. विशेष. बहुत दिवस जाहले; परंतु स्मरणपूर्वक पत्र पाठवून परामृश केला नाहीं.

येणेंकरून स्नेहास युक्त नव्हे. समयोचित कर्तव्यानुरूप आठवण झाली नसेल. याजउपरि सर्वकाळ स्वानंद वृत्त लिहून संतोषाभिवृद्धि केली पाहिजे. यानंतर आह्माकडील वृत्त पत्रीं लिहितां पुरवत नाहीं. सविस्तर वृत्त राजेश्री धोंडोपंत मुखता सांगतां विदित होईल. बहुत काय लिहिणें.

विशेष. बहुता दिवशीं स्मरण करून तुह्मीं रा० धोंडो त्रिमळ याजबरावर पत्र पा। तें उत्तम समयीं प्रविष्ट झालें. बहुत संतोष झाला. पत्र पाठवीत नाहीं ह्मणून बोल ठेऊन लेख केला. तर आह्मींच एक दोन पत्रें तुह्मास पा।. परंतु मनावर धरून स्नेहाची जोडी केली नाहीं. स्वार्थावर दृष्टि ते समयीं धरिली होती. हल्लीं आह्मां लोकांचें अगत्य धरिलें तर यापेक्षां उत्तम तें काय आहे? तुह्मांखेरीज आह्मांस दुसरी जोडी काय आहे? हें घर श्रीदेवब्राह्मणांचें आहे. तुमचे वडील परंपरागत कैलासवासी राजश्री खेमसावंत भोसले सरदेसाई याणीं देवाब्राह्मणांचे ठायीं निष्ठा धरून देवाब्राह्मणांची स्थापना करीत आले आहेत. तुह्मीं देवाब्राह्मणांची भक्ति करितां ऐसें ऐकिलें, त्याजवरून बहुत समाधान वाटलें. आह्मां लोकांचा आगत्यवाद मनःपूर्वक कायावाचामनसा निश्चयरूप असेल तर हें पत्र पावलें ते क्षणीं दर्शनाचा योग घडे तो अर्थ केला पाहिजे. इमानें खरें, वचन सत्य असावें. हे जागे व आह्मीं आपले पदरींचे आहों. दुसरा अर्थ नाहीं. सविस्तर वेदमूर्ति व रा० धोंडो त्रिमळ सांगतां कळेल. पर्जन्यकाळ समीप आला. त्वरा करावी. दर्शनांतीं सविस्तर अर्थ उभयपक्षीं कळेल. चिरंजीव राजश्री आपाजीराऊ तेथें तुह्मांजवळी हरघडी आहेत. त्यास व जागा जतन होय तें करावें.

---

[ १४१ ] श्री.

राजमान्य राजश्री गंगाधर पंडित प्रतिनिधि यासी आज्ञा केली ऐसी जेः- तुह्मीं व सावंत व राजश्री भगवंतराव पंडित अमात्य ऐसे एकत्र होऊन आंगरे याच्या पारपत्याचा विचार अविलंबिला आहे, ह्मणून हुजूर विदित राजश्री यशवंतराव महादेव खासनिवीस यांणीं केलें. त्याजवरून स्वामी

बहुत संतोष पावले. त्यानें पारपत्य करणें स्वामीस जरूर. तेच गोष्टी तुह्मीं अवलंबिलीत, फार उत्तम केलेत. याउपरि भारीपणें मनसबा करून क्षेपनिक्षेप त्यानें पारपत्य होऊन हालखुद वर्तत तें करणें. गद्स्ताप्रमाणें एकांत एक न मिळतां पुर्ता उपमर्द होऊन आला नाहीं तैसें न करणें. त्रिवर्ग एका विचारें वर्तोन फौजेचा गाहा बरे वजनें राखोन जे गोष्टीनें त्यानें पारपत्य होऊन तुमचे सेवेचा मजुरा होय तें करणें. तेणेंकरून स्वामीस संतोष असे. सुज्ञ असा.

---

[ १४२ ] श्री. १७३२.

० श्री ०
सामंतकुलशोभानु-
मांगलाख्यमहेश्वरः ।
श्रीनागसामंतमुद्रेयं
जनभूत्यै विराजते ॥

राजश्री पंतअमात्य गोसावी यांसीः—

छ श्री सकलगुणालंकरण अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य स्नेहांकित नाग सावंत भोंसले सरदेसाई पा। कुडाळ व महालानिहाय रामराम येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लेखन केलें पाहिजे. विशेष. बहुता दिवशीं पत्रें पाठविलीं, पावलीं. व वेदमूर्ति राजश्री माद पाध्ये व राजश्री धोंडोपंत यांकडे कितीएक मुखता सांगोन पाठविलें तें सविस्तर श्रवण होऊन बहुत संतोषातिशय जाहला. तेथ सारांश भावार्थ जे आपले आमचे भेटीचा योग होऊन उभयपक्षीं जो मनसबा करणें तो एकमतें करावा असें मानस आहे. ह्मणून कितेक विस्तारें लिहिलें व उभयतांसही सांगितलें. तरी बहु उत्तम. यापरतें विशेष काय आहे? मुख्य गोष्टी जे, आपली व आमची भेटी व्हावी, त्यामुळें लक्षशा मनसबे घडतील. आह्मांस कायावाचामनेंकरून आपली भेटी व्हावी हेंच बहु अवश्यक आहे. याउपरि आह्मीं आवाडेचे मुक्कामीहून

बुधवारीं कुच करून मजल दरमजल येउसी येतों. एतद्विशीचें वर्तमान वेदमूर्ति राजश्री उपाध्याहीं लिहिलें आहे व राजश्री घोंडोपंत आले आहेत ते मुखता सांगतां कळों येईल. बहुत काय लिहावें. लोभ असो दिल्हा पाहिजे. आह्मांला आपणापेक्षां दुसरी जोड नाहीं. आह्माठायीं एवढी आवड आहे. तेव्हां शिवानसी परीक्ष आहों. बहुत काय लिहिणें.

विलसति लेखनावधि.

---

[ १४२ ] श्री. १९ नोव्हेंबर १७३२.

स्वस्तिश्री राज्याभिषेक शके ५९ परिधावीनाम संवत्सरे मार्गशीर्ष शुद्ध त्रयोदशी रविवासरे क्षत्रियकुलावतंस श्री राजा शंभुछत्रपति स्वामी याणीं समस्तराजकार्यधुरंधर विश्वासनिधि राजमान्य राजश्री भगवंतराव अमात्य हुकुमतपन्हा यासी आज्ञा केली ऐसी जे :—

तुह्मीं विनंतिपत्र पाठविलें तें प्रविष्ट जाहलें. खर्चाची अनुकूलता नाहीं, वरकड कितेक कमालियाचा अर्थ जमाव पाठविला आहे, ह्मणून लिहिलें तें विदित जाहालें. स्वार व जमाव पाठविला उत्तम केलें. तुमचा अस्तिनास्तीचा प्रसंग लिहिला तो यथार्थच आहे स्वामीस नकळेसें काय आहे? राजश्री बाळाजी महादेव व राजश्री नारो हणमंत वरचेवर स्वामीस विनंति करावयाची ते करीतच आहेत. स्वामीस तुमचें अगत्य आहे. समाधान असो देणें, वरकड वर्तमान तर राजश्री फत्तेसिंग भोंसले दादा व राजश्री श्रीनिवास पंडित प्रतिनिधि आले. काल त्रयोदशी मंदवारीं त्याणीं स्वामीचें दर्शन घेतलें. पौर्णिमा जाहल्यावर तृतिया गुरुवारीं स्वामीस करविराहून निघावयास मुहूर्त आहे. या मुहूर्तें स्वामी तीर्थरूप राजश्री आबासाहेब यांच्या दर्शनास सातारियास जात आहेत. हें वर्तमान तुह्मांस कळावें ह्मणून लिहिलें असे. मागाहून तुह्मीं आणखी प्यादे पाठविले तेहि पावले. वरकड उभयतां मशारनिले तुह्मांस

लिहितील त्यावरून कळेल. जाणिजे. बहुत लिहिणें तर तुम्ही सुज्ञ असा.

मर्यादेयं
विराजते.

बार बार.

---

[ १४४ ] श्री. २६ जुलै १७३३.

स्वस्तिश्री राज्याभिषेक शके ६० प्रमादी नाम संवत्सरे आषाढ बहुल द्वादशी गुरुवासरे क्षत्रियकुलावतंस श्रीराजा शंभुछत्रपति स्वामी यांणी समस्त राजकार्यधुरंधर विश्वासनिधि राजमान्य राजश्री भगवंतराऊ अमात्य हुकुमतपन्हा यासी आज्ञा केली ऐसी जे:—

राजश्री सदाशिव बावा उपाध्ये यासी तुम्हीं पत्र पाठविलें तें त्यांणी विदित केलें. त्यावरून सविस्तर कळों आलें. ऐशास, तुम्हीं स्वामीचे यकनिष्ठ ममतेचे. तुम्हांवरी कृपा करून तुमचें विषेशें विशेष चालवणें हें स्वामीस आवश्यक आहे. कोंकणचे महालचीं पत्रें तुम्हीं आणविलेप्रमाणें पाठविलीं आहेत. स्वामीची सेवा करून स्वामीस संतोष पावणें. पक्ष व नवरात्र उत्साह समीप येणार. व श्रावण मासींचा खर्च आहे. येविशीं स्वामींनीं लिहावेसें काय आहे? येप्रसंगीं पोख्ती अनुकूलता करून पाठवून स्वामीस संतोषी करणें. वरकड सदाशिव बावा उपाध्ये यांजवळ आज्ञा केली आहे. तुम्हांस लिहितील त्यावरून कळेल. बहुत लिहिणें तर तुम्ही सुज्ञ असा.

मर्यादेयं
विराजते.

बार बार.

---

[ १४५ ] श्री. तालीक

२९ नोव्हेंबर १७३५.

राजश्री बाळाजी खंडेराव मुतालिक सरदेसाई ता। साळसी गोसावी यांसी:—

छ अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य स्नो संभाजी आंगरे सरखेल रामराम सुा सित सलासिन मया अलफ. राजश्री भगवंतराऊ अमात्य याणीं तुह्मांस आंचेर येथें येऊन वतनी अमलाची सेवा तुमचे हाते घ्यावी ह्मणून लिहून पाठविलें. त्यावरून हें आज्ञापत्र सादर केलें असे. तरी आंचेर यास कबिलासुद्धां येऊन राहणें. आणि पूर्ववत् वतनी अंमल चालवीत जाणें. माहालास ताकीदपत्र सादर केलें असे. जाणिजे. रा छ २४ रजब.

---

[ १४९ ] **श्री.** १७३९.

श्रीशाहूनृपहर्षेण
कान्होजीतनुजन्मनः ।
आंगरेसरखेलस्यशंभो-
र्मुद्रा विराजते ॥

राजश्री भगवंतराव अमात्य हुकमतपन्हा गोसावी यासी:—

छ सकलगुणालंकरण अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य स्नो संभाजी आंगरे सरखेल रामराम विनंति उपरि येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लेखन करीत असिलें पाहिजे. विशेष. आपण रा एस ठाकूर व मल्हारजी सूर्यवंशी यांजबरोबर पत्रें पाठविलीं व रा सुभानजी गाटे व उभयता मानिल्हे यांणीं कितेक आपल्या स्नेहभावाचा अर्थ निवेदन केला. ऐशास, आपला आमचा स्नेह अविनाभावें पूर्वार्जित चालत आला होता त्याची दृढता होऊन परस्पर कार्यप्रयोजनप्रसंगीं यश जय रास सर्व साहित्यानिशीं अनुकूल होऊन योजिले मनोरथ सिद्धीते पावे हा चित्तापासून संकल्प करून सुभानजी गाटे यास आपल्याकडेस पाठविला. तदनुरूप गोसावी याहीं मान्य करून विजयदुर्ग तैसाच चावडा ऐसें मानावें, ह्मणून कित्येक विशदें लेख केला व मुखवचनीं सांगोन पाठविलें, तेणेंकरून समाधान जाहालें. प्रस्तुतच कार्यभाग योजावा तरी राजश्री स्वामीचा आमचा विवेक होऊन येत असे. त्याची दृढता होऊन

आशियानेवर कार्यभाग सिद्धीस पावऊन लागून. तरी राजश्री स्वामीस विवेक होऊन येणें तो होऊन आज्ञा असेल. किंबहुना सत्वर काळेंच उरकून घ्यावा. नवीकार इकडील मजकूर पेशजीपासून आपण मान्य केला आहे त्याचें मनपसंद उत्तर यावें. आम्ही त्याजप्रमाणें तरतूद करून उत्तर पाठवून देऊं. यांचें उत्तर शीघ्र काळेंच पाठवून द्यावें. याउपरि दुसरा विचार किमपि नाहीं. हा भरवसा निशा असों द्यावा, व आम्ही आपल्या पत्राचा मार्ग लक्षून बैठकीवर असों. रा छ ९ रजब. बहुत काय लिहिणें. लोभ कीजे. हे विनंति.

लेखनसीमा.

---

[ १४० ] श्री.

श्री

श्रीमत्कान्होजीसंभूत
शंभोः शत्रुजिगीषतः ।
वर्धिष्णू राजरेखेव मुद्रा
भद्रा विराजते ॥

राजश्री नारो पंडित गोसावी यांसीः—

सकलगुणालंकरण अखंडितलक्ष्मी राजमान्य स्नेहा संभाजी आंगरे सरसुभेदार आरमार रामराम विनंति उपरि येथील कुशल जाणून स्वकीय कुशळ लेखन केलें पाहिजे. विशेष. रा भास्करराऊ याजबराबरी पत्र पाठविलें तें प्रविष्ट होऊन लेखनार्थ-श्रवणें समाधान जाहालें. सारांश वर्षासनपत्राविशीं लेख केला. तरी पत्र तें अगोदरच लिहून ठेविलें होतें. आपणाकडेस पाठवावें तों भास्करराऊ कागद घेऊन आले. याजवळ हल्लीं पत्र पाठविलें असे. केल्या वचनास अंतर सर्वथैव होणार नाहीं. वरकड श्रीस मंदिल व देवीस सोंवळ्याविशीं लिा तरी प्रस्तुत तें अनुकूल न पडे. पुढें अनु-कूल करणार श्री समर्थ असे. बराबरील समुदायास वस्त्राविशीं लिा

तरी पांच श्रीवेष्टनें व साडीचोळी पाठविली असे. श्रीच्या देवळास फणसाचीं झाडें देविलीं असेत. धान्याविशीं लिा तरी प्रस्तुत धान्याची चणचण बहुतच असे. मासपक्षानें अनुकूलता लामला करून पाठविली जाईल. कळलें पाहिजे. रा। छ ७ माहे सफर. हे विनंति.

मोर्तबसूद.

---

[ १४८ ] श्री.

श्री

श्रीमत्कान्होजीसंभूत-
शंभोः शत्रूञ्जिगीषतः ।
वर्धिष्णू राजरेखेव मुद्रा
भद्रा विराजते ॥

राजश्री नारो पंडित गोसावी यासीः—

छ सकलगुणालंकरण अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य स्नो। संभाजी आंगरे सरसुभेदार आरमार रामराम विनंति उपरि येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लेखन केलें पाहिजे. विशेष. स्वामींनीं पत्र पाठविलें प्रविष्ट होऊन संतोष जाला. बहुमानयुक्त आपला गौरव करावा आणि तसेंच सौरस्य चालवणें असेल तरी शिबिका पाठवावी ह्मणून लेख केला. तरी आपला पैशारोल्याचा विषय काय आहे? याउपरि चित्तांत कांहींएक न आणितां यावयाचें करणें. पालखी घोडे पांच पाठविले आहेत. पत्र पावतांच स्वार होऊन यावें. अनमान न करावा. आपली आमची भेटी झालियावरी इष्टापूर्तीचीं भाषणें होऊन परस्पर संतोष होईल. बहुत ल्याहावें तों आपण सर्वज्ञ आहेत. कृपा वर्धमान करावी. हे विनंति. रा। कृष्णाजी अनंत पाठविले आहेत. जबानी सांगतील. लौकर आलें पाहिजे. हे विनंति.

मोर्तबसूद.

---

[ १४९ ] श्री. १७३६

राजश्री भगवंतराव अमात्य हुकुमतपन्हा गोसावी यासी:—

छ सकलगुणालंकरण अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य स्ने॥ संभाजी आंगरे सरखेल रामराम विनंति उपरि येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लेखन केलें पाहिजे. विशेष. आपला आमचा हर्शामर्श बसला आहे. त्यास आपली आमची गोष्टी होऊन पूर्व स्नेहाप्रमाणें आपण आह्मीं वर्तावें हेविषयीं राजश्री गोविंद शेट याणीं विनंति केली, त्यावरून आपणास हें पत्र लिहिलें आहे. तरी प्रेमाची अभिवृद्धि होऊन दिन प्रतिदिन स्नेह चाले तो अर्थ चित्तास आला तरी करावा. चित्तास न ये तरी तसेंच उत्तर पाठवावें. श्रीकृपेनें होतां होईल तें होईल. जाणिजे. रा। छ २९ माहे जमादिलावल. बहुत काय लिहिणें. लोभ असो देणें. हे विनंति.

मोर्तबसूद

श्री ०
श्रीमत्कान्होजी
संभूतशंभोः शत्रू
जिगीषतः॥ वर्धिष्णू
राजरेखेव मुद्रा भद्रा
विराजते॥

---

[ १५० ] श्री.

श्री ०
श्रीमत्कान्होजीसंभूत-
शंभोः शत्रूञ्जिगीषतः।
वर्धिष्णूराजरेखेव मुद्रा
भद्रा विराजते॥

राजश्री नारो पंडित गोसावी यासी:—

छ सकलगुणालंकरण अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य स्नो संभाजी आंगरे सरसुभेदार आरमार रामराम विनंति उपरि येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लेखन केलें पाहिजे. आमची स्वारी रामदुर्गीं होणार आहे ते समयीं श्रीची व आपली भेटी होईल. वरकड आपणाजवळ दक्षिणावर्ती शंख आहे ह्मणोन आइकतों. ऐशास, आपले आशीर्वादाची एक वस्त आह्माजवळ असावी, त्याजकरितां हें पत्र आपणास लेहून माहादो बाबाजी पाठविला आहे. तरी स्वामींनीं सदय होऊन आशीर्वादक शंख अगत्यरूप पाठविला पाहिजे. आपण तपस्वी, थोर. आपले हातींची वस्त आह्मांजवळ असावी. तेणेंकरून सदासर्वकाळ स्वामीचें स्मरण राहील याजकरितां प्रसादात्मक पाठवावी. सदासर्वकाळ पूजा करून नमस्कार करूं, तेव्हां आपलें स्मरण दिन प्रतिदिन होईल तें केलें पाहिजे. सुज्ञाप्रति विशेष काय ल्याहावें. कृपा वर्धमान करावी. हे विनंति.

मोर्तबसूद.

---

[१९१] श्री. १७३६.

राजश्री भगवंतराव पंडित अमात्य हुकुमतपन्हा गोसावी यासी :—

छ सकलगुणालंकरण अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य स्नो संभाजी आंगरे सरखेल रामराम विनंति उपरि येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लेखन करीत असलें पाहिजे. विशेष. आपण बावाजी करवडा व विठोजी पाटणकर यांजसमागमें मुखवचनीं कितेक एकात्म(ते)च्या व पुढें मनसबा कर्तव्य पदार्थ सांगोन पाठविला. त्याप्रमाणें हरदूजणानीं अक्षरशाहा आह्मापाशीं निवेदन केलें. ऐशास, आपला आमचा स्नेह अकृत्रिम होउन आला व भेटीही जाहल्या. तेसमयीं कितेक इष्टापूर्तीचीं भाषणें जाहलीं. फेरो न ये. राजकार्यप्रयोगप्रसंगीं सामील व्हावें. साभिमान अनकूलता करावी. ऐशीं कितेक पदार्थें भाषणें जाहलीं. त्याजअन्वयें हालीं आपण सांगोन पाठविलें. तरी याहून विशेष काय

आहे? आपला व आमचा एक हात निश्चयेंकरून जाहाला. तरी वरकड पदार्थें शत्रूंना पराभव व्हावया अगाध काय आहे? परंतु एकात्मता पुर्ती चित्तापासून असावी. कां ह्मणजेल? तरी, राजश्री बाजीराव पंडित प्रधान यांणीं बेलभाकर पाठविली व आह्मींही त्यांस पाठविली. तथाप तो अर्थ एकीकडेस ठेवून, मुडा बसवून, इमानास खता केली. व इमानरोटी देवून मुडकरी यांणीं बेइमान केली. ऐसा विचार तुमचा आमचा नसावा. जो स्नेह कार्य मनसबा बंधुत्व संपादणें तें कार्य खामखा करावेंच करावें. बंधुत्व तो कितेकांनीं विपर्यास लहान मनुष्यानें अथवा थोरानें घातलें तरी परस्पर चित्तारूढ करूं नये. सहोदर बंधुपणाची पदार्थ चालोन एकानें सामील व्हावें. साहित्य करावें. ऐसें आपल्या चित्तापासून असलेलेयास फिरोन तफावत न पाडावी ऐसें पुर्तें आपलें मन शोधून पाहावें. आणि आह्मीं माणसें पाठविलीं आहेत, यासमागमें आपल्या जिवाळ्याचा माणूस बरा शहाणा असेल तो पाठवून द्यावा. हे बोलीस अंतर न पाडूं ह्मणून श्रीरघुवीराचा बेल व भाकर पाठवून द्यावी. ह्मणजे, आह्मींही आपलेकडील भला माणूस श्रीकानोबाचा बेल भाकर पाठवून देवून आणि आपला आमचा एक हात करून आपले व आमचे योजिले मनसबे सिद्धीस न्यावे. याउपरि दुसरा विचार आमचे चित्तीं नाहीं. एवढें लिहण्यास कारण कां ह्मणिजेल? तरी पूर्वीं एका दोहींकडून बेलभाकरीचा अन्वय जाहला तो प्रसिद्ध आपणास कळलाच आहे. रघुनाथ प्रभू याणेंही दोन वेळां बेल काढून दिला. आणि बेइमानी करून खादल्या अन्नाचा निस्तरा देतो आहे. याचाही परिणाम श्रीकृपेनें होईल, तो आपल्यास कळोन येईल. आपला आमचा स्नेह आजीकालीचा नाहीं. पूर्वीं कैलासवासी तीर्थरूप यांचा व आपल्या तीर्थरूपाचा स्नेह कोणे रीतीनें चालिला, व त्यांणीं कोणे कोणे प्रसंगीं साहित्य केलें, एक एकास ते न चुकले. त्यांचे पुत्र तुह्मीं आह्मीं एकात्मतेनें वर्तावें, शत्रूस पादाक्रांत करावे, घरोब्यानें चालोन दुसऱ्याचा हात शिरीं देऊं नये, उचित असे. सर्व अर्थ आह्मीं आपले चित्तापासून लिहून पाठविले आहेत. सविस्तर चित्तारूढ करून आपणही

याच अन्वयें आपल्या चित्ताची प्रशंसता करून फिरोन याम अंतर न पडे ऐसें करून, सदर्हू लिहिल्याप्रमाणें भला माणूस वेळमाकर पाठवून द्यावी. तदनुरूप येथूनही पाठवून देवून. यास अंतर सहसा होणार नाहीं. याउपरि आपल्या थोरपणास योग्य असेल तें करावें. रा छ. ३ जमादिलाखर. बहुत काय लिहिणें. लोभ असो द्यावा. हे विनंति.

लेखनसीमा.

ॅ ०

श्री शाहूनृप-
हर्षेण कानोजीत-
नुजन्मनः आंगरे-
सरखेलस्य शंभोर्मुद्रा
विराजते.

---

[ १९२ ] श्री.

ॅ श्री ०

श्रीमत्कान्होजीसंभूत-
शंभोः शत्रूञ्जिगीपतः ।
वर्धिष्णू राजरेखेव मुद्रा
भद्रा विराजते ॥

राजश्री भगवंतराऊ अमात्य हुकमतान्हा गोसावी यासीः---

छ सकलगुणालंकरण अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य स्नो संभाजी आंगरे सरसुभेदार आरमार विनंति येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लेखन करीत गेलें पाहिजे. विशेष. राजश्री यादोपंत याज बराबरी पत्र पाठविलें त्यावरून व माानिल्हे याणीं जबानी सांगितल्यावरून सविस्तर अर्थ कळों आला. सारांश, तीर्थरूप श्रीकुणकेश्वरीं बहुत काळ राहिले होते. त्यांचा प्रतिपाळ राजश्री कैलासवासी सरखेल

याणीं करून नियत करून दिल्हा होता. त्याप्रों किंबहुना तदाधिक्य तुह्मीं अंतर केलें नाहीं. प्रस्तुत तीर्थरूपास वैकुंठवास जाहला. मागें श्रीस्थलीं त्यांचीं मुळेंगाणेंसें व अधिष्ठान आहे. त्यांचें सर्वाविशीं पूर्वापार व हालीं नियताप्रों चालवावयास अंतराय न करावा, ह्मणोन कितेक तपशिलें लिहिलें. तरी तीर्थरूप कैलासवासी याणीं जो नियत करून दिल्हा होता त्यास आह्मांपासून अंतर आजिपावेतों जाहलें नाहीं. पुढेंही होणार नाहीं. नूतन पत्राचा विचार लिहिला तरी पत्राप्रों सालगारी गुंता ठेविला ऐसें नाहीं. पेस्तरही राहणार नाहीं. पत्राप्रों निर्वाह करावाच लागेल. वरकड मोईनपैकीं कांहीं गल्ला राहिला आहे तो झाडेयानसी देवावा ह्मणोन लिहिलें. तरी हिशेबप्रों गल्ला बाकी राहिला असेल तो गलबतावरून देवगडास पाठवून मनुष्यास प्रविष्ट करून टांकण तीर्थरूपांनीं जिनेगबद्दल ठेविला आहे तो पाठवावा ह्मणोन लिहिलें. तरी टांकण सरकारांत ठेविला नाहीं. सरकारांत असता तरी पाठविला जाता. त्याचें वृत्त रा० भास्कर गोसावी यास ठाऊक आहे. आपणास श्रवण करितील. त्यावरून कळेल. बहुत ल्याहावें तरी आपण सुज्ञ आहेत. हे विनंति.

मोर्तबसूद.

---

[ १९३ ] श्री. १९ अक्टोबर १७३७.

यादी. राजश्री भगवंतराव अमात्य हुकुमतपन्हा याजकडील बोली येणेंप्रमाणें करार. सुहूर सन समान सलासीन मया अलफ, माहे रजब:—

बाबतीचा वसूल हुजूर सालमजकुरीं जाहला आहे. तो तुह्मीं हुजूर ऐवज द्यावया केला आहे. त्यांत मजुरा देऊं. वरकड राहिला ऐवज हुजूरचा तुह्मीं द्यावा. जिरहेबाबतचा गामला

पूर्ववत् तुमचीं खेडीं व वतनें आहेत. त्यास सावगांव खेरीजकरून तुमचीं तुह्मांस करार केलीं असत. कलम १.

मजमूचा हुद्दा तुमचा तुह्मांस करार. कलम १.

पूर्ववत् चालत आहे. त्याप्रमाणें तुमचा तुह्मांस करार. कलम १.

तुमच्या इजतीमाफक समयानरूप बहुमान करूं. कलम १.

अळतें, रुकडी येथील बावती व मौजे हातकणंगलें हें द्यावें ह्मटलें, तर तुह्मीं धणी, अर्जवून घेऊन संतोषी केल्यावर स्वामी कृपाळू होऊन देतील. कलम १.

तुमचे कारकून व चाकर शिल्हेनिसबत व बाजे जे असतील ते तुमच्या ताबिनात करूं. कलम १

तुमच्या चाकरापासून कतबे घेतले आहेत कीं, तुह्मांकडे चाकरीस जाऊं नये. त्यास ते कतबे तुमचे तुह्मांस देऊं. चाकर ताबिनांत करावे. कलम १.

येणेंप्रमाणें सात कलमें करार केलीं आहेत. यांत कांहीं लटा नाहीं. याप्रमाणें स्वामी चालवितील. तुह्मीं दिन प्रतिदिनीं अकृत्रिम मनोभावें एकनिष्ठेनें सेवा करावी. स्वामी कृपाळू होऊन तुमचें दिनप्रतिदिनीं ऊर्जित करितील. तुह्मीं निष्ठेनें सेवा करून स्वामीस संतोषवावें. सर्व प्रकारें स्वामी चालवितील. छ १ रजब.

लेखनसीमा.

---

[ १५४ ] श्री. १७३९.

राजमान्य राजश्री भगवंतराव पंडित अमात्य यासी आज्ञा केली ऐसी जे:—राजश्री तुळाजी आंगरे सरखेल यांच्या पारपत्याविशीं तुह्मास पेशजी आज्ञा केली व वरचेवर राजश्री यशवंतराव महादेव खासनिवीस लिहित गेले. त्यावरून तुह्मी अंगेज करून राजश्री गंगाधर पंडित प्रतिनिधि व सामंत यास सामील करून घेऊन आंगरियाच्या मुलकांत स्वारी केली आहे. लांजेपर्यंत मुलूख मारिला ह्मणून खासनिवीस यांनीं विनंति केली व परस्परेंही वर्तमान विदित जाहलें. त्यावरून स्वामी संतोषी जाहले. तुह्मी कार्यकर्ते सेवक, स्वामीच्या मनोदयानुरूप मनसबा कराल, हा स्वामीचा निशाच आहे. तरी योजिला मनसुबा पोक्ता करून,

तरी न करणें. येविशींचें अवश्यक स्वामीस आहे. तुह्मीं जाणतच आहा. तुमचे तर्फेनें अमलास तिळप्राय खलेल झालिया स्वामीस मानणार नाहीं, ऐसें जाणून मानिल्हेकडे सुरळीत अमल चालो देणें. हुजूर बोभाट न ये ते गोष्टी करणें. सुज्ञ असा.

---

[ १९६ ]  श्री.  तालीक.

राजश्री तुळाजी आंगरे सरखेल गोसावी यासीः—

६ सकलगुणालंकरणअखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य स्नो बाळाजी बाजीराव प्रधान आशीर्वाद विनंति उपरि येथील कुशल जाणोन स्वकीय कुशल लिहित गेलें पाहिजे. विशेष. राजश्री कृष्णराऊ पंडित अमात्य याजकडील गांव खेडीं पुरातन इनाम आहेत व किल्ले गगनगडचे घेऱ्यांचे गांव वगैरे यांचीं वतनें त्या प्रांतीं आहेत. त्यांचा वसूल तुह्मांकडे जात होता. त्यावरून येथून पत्र आपणास पाठविलें कीं, यांच्या तालुक्यास उपद्रव करावा ऐसें नाहीं. ह्मणून लिहिलें त्यावरून याच्या हुमाला वतनें सालमजकुरीं केलीं ऐसें असोन हल्लीं नानाप्रकारें उपद्रव आरंभिला, हबशीपट्टी ह्मणोन रोखे केले आहेत, ह्मणोन लोक आले. तरी पुरातन कान्होजी आंगरे याणीं यांच्या तालुक्यास तिळतुल्य उपसर्ग किल्याच्या तनख्यास देखील केला नाहीं व हबशीपट्टीही घेतली नाहीं. ऐसें असतां तुह्मीं हरएक निमित्य ठेवून उपद्रव करावा हे गोष्ट उचित नाहीं. हालीं हें पत्र आपणास लिहिलें असे. तरी रोखे केले असतील ते मना करून पंडितमशारनिल्हेच्या निसबतीस कोणेविशीं उपसर्ग जाहाल्याचा बोभाट वारंवार न ये ते गोष्ट केली पाहिजे. रा। छ २० मोहरम. बहुत लिहिणें तरी सुज्ञ असा.

---

[ १९७ ]  श्री.  १७३८.

राजमान्य राजश्री भगवंतराव पंडित यासी आज्ञा केली ऐसी जे :—

तुह्मीं विनंतिपत्र पाठविलें तें प्रविष्ट जाहालें. राजश्री तुळाजी आंगरे यांच्या पारपत्यास सेवकाकडून अंतर होईल ऐसें नाहीं, स्वामींनीं दृढ

अभिमानें सर्व प्रकारें साहित्य करावें, मुलास अन्नवस्त्र द्यावें, ह्मणोन विशदें लिहिलें. ऐशास, तुह्मीं राज्यांतील पुरातन सेवक, तुमचें सर्व प्रकारें अवश्यक. तुमचे हातें सेवा घेऊन उर्जित करावें, हेंच स्वामीचें मानस आहे. तरी तुह्मीं योजिला मनसुबा सिद्धीस पावणें. ह्मणजे तुमचें चालवावयास स्वामीपासून अंतर होईल ऐसें नाहीं. सविस्तर अर्थ राजश्री यशवंतराव महादेव खासनिवीस लिहितील त्याजवरून कळेल. नारळ व पानें पाठविलीं तीं यादीप्रमाणें प्रविष्ट जालीं. सुज्ञ असा.

---

[ १९८ ] श्री श्रीविठोबा.

रघुवीर. ९ एप्रिल १७३८.

राजश्री भगवंतराऊ रामचंद्र, भारद्वाज गोत्र, आश्वलायन शाखा, गोसावी यांसी:—

छ सकलगुणालंकरण अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य राजश्री नागसावंत भोंसले सरदेसाई पा। कुडाळ व माहालानिहाय दंडवत विनंति उपरि, शालिवाहन शके १६६० कालयुक्त नाम संवत्सरे चैत्र बहुल त्रयोदशी सौम्यवासर सुा। समान सलासीन मया अलफ, दिल्हें वतनपत्र ऐसाजे. आपली व आमची किल्ले गगनगडच्या मुकामीं भेट समारंभें करून जाहाली. ऐशास, कैलासवासी राजश्री रामचंद्र नीळकंठ यांचा व तीर्थस्वरूपांचा राजश्री खेमसावंत भोंसले सरदेसाई यांचा ऋणानुबंध विशेषाकारें चालत आला त्याप्रमाणें उभयपक्षीं चालत आहे. अभिवृद्धीनें ऋणानुबंध चालावा, आमचें साहित्य आपण करावें, आपलें साहित्य सर्व प्रकारें आह्मीं करावें, वंशपरंपरेनें अकृत्रिमतेंत कांहीं न्यूनता पडों न द्यावी, येविशीं श्रीसंनिध शपथपूर्वक बोलीचाली जाहली आहे. त्यास, आह्मांकडून किमपिहि तफावत पडणार नाहीं. आपल्याकडून तफावत न पडावी. घरोब्यानें ऐक्यतेनें उभयपक्षीं सुधामत चालावा. यास अंतर पडणार नाहीं. आपली आमची भेट प्रथमतः जाहली. आमचे चित्तास बहुत संतोष बहुत जाहाला.

यावरून तुह्मांस आह्मीं आपले आत्मसंतोषें होऊन प्रांत कुडाळ येथील देशकुळकर्ण्याची वतन देहाय कर्याती देखील जकायती दिल्हें असे. यास वतनी बाहवी ता.

| इनामगांव दरोबस्त. | हक्कदरसदेहोन निमे. | बीमयेत इनाम ठिकाण. |
|---|---|---|
| १ ———— | ———— | ———— |
| ———— | | ———— |
| ———— | | ———— |
| ———— | | जकात दर बैली. |
| ———— | | |

लाजमा पानमानपद्धत प्रा कलम १.

येणेप्रमाणें दिल्हें असे. तुह्मीं व तुमचे पुत्रपौत्रादि वंशपरंपरेनें देशकुळकर्ण्याचें वतन अनुभवून भोगवटा करून सुखरूप राहणें. सदर सरदेशकुळकर्ण्याचीं वतनें आहे तीं कूलीं तुह्मांस देऊं.

स्वदत्तां परदत्तां वा यो हरेच्च वसुंधराम् ।
षष्ठीवर्षसहस्राणि विष्ठायां जायते कृमिः ॥
स्वदत्ताननुपालकाः परदत्तापहारकाः ।
ते नरा नरकं यान्ति यावच्चंद्रदिवाकरौ ॥

शिक्का

राजश्री नार दळवी. राजश्री निळापा देसाई ता॥ खानापूर.

---

[ १९९ ] श्री. २९ नोव्हेंबर १७३८.

तालीक

राजश्री जानोजीराव निंबाळकर गोसावी यासीः—

७ अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य स्नो॥ चिमणाजी बलाळ आशीर्वाद उपरि येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लिहित असिलें

पाहिजे. राजश्री भगवंतराऊ रामचंद्र व राजश्री मोरेश्वर रामचंद्र व राजश्री शिवराम रामचंद्र यांचें कुळकर्ण व जोशीपण पुरातन मौजे तांदळी ता। रांजणगांव येथील असतां, नारो दत्तो व यादो तुकदेव पानगे कुळकर्णास व जोशीपणास नडले होते, आणि कज्या करीत होते. त्यावरून मौजे मजकूरचे मुकादम व समाकुल पांढरी बलुते हुजूर आणून इनसाफ मनास आणितां पंडितमशारनिल्हेचें वतन कुळकर्ण व जोशीपण खरें होऊन पानगे खोटे झाले. त्यावरून पंडितमा।निल्हेचें वतनपत्र अलाहिदा करून दिलें आहे. तरी तुह्मीं आपलेकडून अंमलदारास ताकीद करून कुळकर्ण व जोशीपणाचें वतन सुरळीत चालें तें केलें पाहिजे. पानगे यास वतनाशीं कज्याकटकट करावया संबंध नाहीं. त्याणीं यजीदखत लेहून दिल्हें आहे. तर पंडितमा।निल्हेचें वतन सुरळीत चालवणें ह्मणवून अमिलास पत्र देविलें पाहिजे. रा। छ २७ शाबान. बहुत काय लिहिणें.

---

[ १६० ] श्री. १७३८.

राजश्री जानोजीराव निंबाळकर गोसावी यासी :—

छ अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य स्नो। बाजीराव बल्लाळ प्रधान आशीर्वाद उपरि येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लिहीत गेलें पाहिजे. विशेष. राजश्री भगवंतराऊ रामचंद्र व मोरेश्वर रामचंद्र व शिवराऊ रामचंद्र यांचें कुळकर्ण व ज्योतिषपण पुरातन वतन मौजे तांदळी ता। रांजणगांव येथील असतां, नारो दत्तो व यादो तुकदेव पानगे कुळकर्णास व जोमपणास नडले होते, आणि कजिया करीत होते. त्यावरून मौजे मजकूरचे मोकदम व समाकुल पांढरी बलुते हुजूर आणून, इनसाफ मनास आणितां, पंडितमशारनिले वतन कुळकर्ण व जोसपण खरें होऊन पानगे खोटे जाले. त्यावरून मशारनिलेचें वतनपत्र अलाहिदा करून दिल्हें आहे. तर, तुह्मीं आपल्याकडील अंमलदारास ताकीद करून कुळकर्ण व जोसपणाचें वतन सुरळीत चालें तें केलें पाहिजे. पानगि-

यासी वतन नाहीं. कजिया कटकट करावयासी संबंध नाहीं. त्यांनीं यजितखत लेहून दिल्हें आहे. तर, पंडितमशारनिल्हेचें वतन मुरळीत चालवणें ह्मणोन अभिलास पत्र दिल्हें पाहिजे.

---

[ १९१ ] श्री. २९ नोव्हेंबर १७३८.

तालीक.

छ मा अनाम देशमुख व देशपांड्ये ता। रांजणगांव सरकारकून यासीः— बाजीराव बल्लाळ प्रधान सुमा तिसा सलासीन मया अलफ. भगवंतराव रामचंद्र व मोरेश्वर रामचंद्र व शिवराम रामचंद्र जोशी कुळकरणी मौजे तांदळी ता। मजकूर यानीं पुण्याचे मुक्कामीं विनंति केली कीं, मौजे मजकूरचें कुळकर्ण व जोशीपण हीं दोनही वतनें शिवजी बिन जैतजी बेस मोकादम मौजे मजकूर याणे आपले वडील निळो सोनदेऊ व आबाजी सोनदेऊ आपले आजे यास खुशरजावंदीनें विकत देऊन खरेदी खत करून दिल्हें. त्यापासून आपण गुमास्ते ठेऊन दोनीं वतनें अनुभवीत आलों. अलीकडे नारो दत्तो व यादो तुकदेऊ पानगे कोरेगांवकर मालुगाती कागद करोन गांवांत सुखवस्तु राहत होते ते कजिया करितात. तरी स्वामींनीं मनास आणून पारपत्य करावें ह्मणून. त्यावरून नारो दत्तो व यादव तुकदेऊ पानगे यांस हुजूर आणिले व गांवचे मोकादम शिवाजी बिन भिकाजी व भिमजी बिन शिवजी पाटील व गोंदजी चौगुला वगैरे बलुते हुजूर आणून करीना पुसिला. त्याणी तकरारिया केल्या कीं, कुंभभट ऋग्वेदी आपले गांवीचा जोशी कुळकरणी पूर्वी होता. त्याचें नकल झालें. पानग्याचे वडील राघो दत्तो गांवीं सुखवस्तु राहत होता. त्याजकडून पांच सात वर्षे मुशारा देऊन कुळकर्ण लेहविलें. त्या आधारावर मालुगाती कागद आणून दोनीं वतनें आपलीं ह्मणतात. हे कुंभभटाचे नव्हेत. शिवाजी बिन जैतजी पा। याणें निळो सोनदेऊ व आबाजी सोनदेऊ यास जोशी-पण व कुळकर्णपण दोनीं वतनें रजावंदीनें दिल्हीं हें खरें आहे. याप्रमाणें

हकीगत आहे. ऐसियासी, पानगे कांहीं मौजे मजकूरचे वतनदार नव्हेत. गांवीं राहिल्यामुळें खेळ करून नडत होते. ऐसें पांढरीच्या व मजाल-सीच्या विचारें खरें झालें. पानग्यापाशीं पुरातन कागदपत्र दस्ताऐवजी नाहींत. यामुळें पानगे खोटे झाले. भगवंतराव रामचंद्र व मोरेश्वर रामचंद्र व शिवराम रामचंद्र यांचें वतन खरें झालें. त्याजवरून गांवकरी यांस व तुह्मास आज्ञापत्र सादर केलें असे. तरी जोसपण व कुळकर्ण हीं दोन्हीं वतनें भगवंतराव रामचंद्र व मोरेश्वर रामचंद्र व शिवराम रामचंद्र यांजकडे चालवून सुदामतपासून हक्क, आदा व इनाम असेल तें कुळकर्णी व ज्योतिषी यांजकडे चालवणें. या पत्राची प्रत लेहोन घेऊन हें पत्र भोगवटियास परतोन देणें. जाणिजे. छ २७ साबान.

---

[ १६२ ] श्री. २ मार्च १७३९.

तालीख.

अजम क़ादरखान.

छ तहवार वडिक हत दस्तगाह अजी बाजीराऊ बल्लाळ प्रधान दुवा सुा तिसा सलासीन मया व अलफ. राजश्री भगवंतराऊ रामचंद्र व मोरेश्वर रामचंद्र व शिवराम रामचंद्र यांचें कुळकर्ण व ज्योतिषपण वतन पुरातन मौजे तांदळी ताा रांजणगांव येथील आहे. त्यास नारो दत्तो व यादो तुकदेव पानगे कुळकर्णास नडोन कजिया करीत होते. याकरितां मौजे मजकूरचे मुकादम व समाकूल पांढरी व बलुते हुजूर आणून इनसाफ मनास आणिता, पंडितमाानिल्हेचें वतन कुळकरण व ज्योतिषपण खरें होऊन पानगे खोटे झाले. त्यावरून माानिल्हे आपलें वतन अनुभवि-तील. पानगे खोटे झाले ह्मणून यजित खत लेहून दिल्हें. ऐसें असतां पानगे यास तुह्मीं आसरा देऊन गांवांत ठेविले आहेत. तुमचे इमाइतीनें ते राहिले आहेत. ह्मणून हुजूर विदित जाहालें. तरी पानगे खोटे जाहाले, ऐसें असतां त्यास गांवांत राहावयास गरज काय? व तुह्मीं त्यास आश्रा देऊन ठेवावा यास प्रयोजन काय? याउपरि त्याजपासून पेशजीचे कागदपत्र रुमाल असतील ते घेऊन पंडितमाानिल्हेचे गुमास्ते

गांवांत आहेत त्यांचे स्वाधीन करून पानगे यास गांवांतून बाहेर काढणें. येविषयीं फिरोन बोभाट आला ह्मणजे कार्यास येणार नाहीं व पानगे गांवांत राहिलियास त्यांचा मुलाहिजा होणार नाहीं. जाणिजे. छ २ जिल्हेज. ज्यादा काय लिहिणें ?

---

[ १६३ ] श्रीरामचंद्र. २५ मे १७४१.

राजश्री अमृतराऊ पडवळ नामजाद व कारकून, किल्ले गगनगड, गोसावी यांसीः—

छ अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य राजश्री भगवंतराऊ रामचंद्र अमात्य हुकुमतपन्हा आशीर्वाद व नमस्कार सु॥ इसन्ने अर्बैन मया अलफ. येसजी फलाडा बिन शहाजी फलाडा हुजूर उमेदवार होता. यासी किल्लेमजकुरीं नाईकी सांगोन पाठविला आहे. यासी वेतन दरमहा करी दामोली २५ पंचवीस केलें असे. इ॥ सनद पैवस्तापासून वजावाटाऊ करून उरलें वतन शिरस्त्याप्रमाणें देत जाणें. यासी जमान " किला घेणें. " जाणिजे. छ २० रबिलावल. बहुत काय लिहिणें.

० ~ लेखना-

श्रीसीताराम- वधिमुद्रा.

चरण रामचंद्र

नीलकंठ शरण.

मोर्तब.

---

[ १६४ ] श्री. १७४२.

श्रीराजा शाहूछत्रपति

हर्षनिधान । बाळाजी बाजी-

राव मुख्यप्रधान ।

राजश्री फत्तेसिंग बावा गोसावी यासी :—

[ १९९ ] श्री.

सकलगुणालंकरण अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य राजश्री कृष्णराव स्वामी गोसावी यासी :—

पो बाळाजी बाजीराव कृतानेक नमस्कार विनंति उपरि येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लेखन लिहित असिलें पाहिजे. विशेष. मौजे सांगरुळाविशीं विरुद्धतेचें आचरण धन्याशीं न करावें, सेवाधर्मास हे गोष्ट उत्तम नव्हे, ह्मणोन आपणास पूर्वीं पत्र पाठविलें. त्याचें उत्तर तपशिलें जे, सांगरूळ द्यावयाचा करार आहे, चिकोडीकर व एसाजीराम मध्यस्त आहेत, ह्मणोन लिहिलें. त्याजवरून मध्यस्ताकडे येविशीचा शोध मनास आणिला. त्यांणीं साफ सांगितलें जे, दोन चार गांव धन्यांनीं घेतले ते कृपा करून देतात, सांगरूळ एक राहिलें तेंही धन्याची सेवा करून आर्जऊन घ्यावें. येणेप्रमाणें आह्मीं बोलिलों असें ह्मणतात. व चिकोडीकराचें पत्रही बजिन्नस याप्रमाणें आलें आहे. तुह्मीं पत्रीं लिहिलें जे, आजपर्यंत आर्जविलें त्याचें ऊर्जित काय झालें तें पुढें होणार ? हे गोष्ट लिहिणें उचित नाहीं. तुमची मातबरी आहे ते धन्याचेच कृपेची आहे. याउपरि सांगरुळाविशीं वारंवार उपक्रम करून विरुद्धाचरण न करावें. धन्याच्या मर्जीपेक्षां सांगरूळ अधिकोत्तर नाहीं. ज्या गोष्टीनें धन्याचा संतोष त्याप्रों असवें. स्वतः च्या मुलखांत अधिकोत्तर बेरजा घालून रोखे करिता. बाबतीखेरीज गाव खेडीं आहेत तेथेंही रोखे पाठविता. हा बोभाट मुलखांतून धन्यासंनिध जातो. तेथून आज्ञापत्रें येथें येतात. तरी अशी गोष्ट याउपरि न करावी. बाबतीचा करार खावंदानीं ज्याप्रों करून दिल्हा आहे त्याप्रों वसूल घेऊन निष्ठेनें स्वामिसेवा करावी हेंच श्लाघ्य असे. सारांश तूर्त मसलतीचा प्रकार आहे तो सिद्धीस पावलियावर विनंति करून विनंतीच्याच मार्गें आपलें कार्य केलें जाईल. सध्या उतावळीचा प्रकार सहसा न करावा. बहुत काय लिहिणें. हे विनंति.

तत्याप्रमाणें स्वामीच्या प्रत्ययास आला. व ठाणें शिरोळ ता। अळतें येथील ठाणेस स्वामींनीं परिघ घालून मुक्काम केला होता ते समयीं स्वामींनीं यांसी कुरुंदवाडचे मुक्कामीं ठाणें कितके दिवसांत हस्तगत होईल ह्मणून प्रश्न केला. त्यावरून याणीं सिद्धांत करून ज्या दिवशीं ठाणें हस्तगत होईल ह्मणवून सांगितलें व लिहून दिल्हें तेव्हां तें त्याप्रमाणें ते दिवशीं ठाणें हस्तगत झालें. त्याजवरून स्वामी यांजवर बहुत संतोषी जाहले. यांचें दिवसेंदिवस ऊर्जित करून चालविणें हें स्वामीस आवश्यक. यांचेविशीं राणीवसा चौथा वाडा याणीं विनंति केली कीं, बाळजोशी आह्मासन्निध सेवा करित आहेत, यासी राज्यांतील सरज्योतिषणाची वृत्ति करून द्यावी, ह्मणून. त्यावरून मनास आणितां हे ज्योतिषविद्यावंत, सिद्धांतवेत्ते, ज्योतिषविद्यानिपुण, यास्तव स्वामी याजवरी कृपाळु होऊन स्वामीच्या राज्यांतील सरज्योतिषपणाचें वतन स्वामींनीं यांसी श्रींचें उदक घालून धारादत्त करून दिल्हें असे. या वतनास कानूकायदेयाची मोईन करून दिली असे. गांवगन्ना महालानिहाय :—

### कानूकायदे बितपशील.

| किता कलम | | किता कलम शूद्रादिक | |
|---|---|---|---|
| २ | जकातीस दर सदे रुपये | ०॥० | लग्नास |
| १॥ | ब्राह्मणाचे घरीं | ०।० | पाटास |
| | १ लग्नास | —— | |
| | ०॥० मुंजीस | ०।॥० | |
| | बारसे | | |
| | सरकार | | |
| | —— | | |
| | १॥ | | |
| —— | | | |
| ३॥ | | | |

## इनाम जमिनी महालानिहाय विघे.

### सुभा प्रांत पन्हाळा.

#### ताा बोरगांव.

८१ घोटवडें
८१ सोनुरळें
८१ माजनाळ
८। वाडी मोताई
८।। निवडें
८१ काटेभोगांव
८१ पाटपन्हाळा
८१ परळी
८१ कोतोली
८।। पोर्लेवाडी
८१ दिगवडें
८१ पुनाळ
८१ वारनुळ
८।। मडिलगें
८।। पुशिरें
८१ कसबा
८१ तिरपण

८१४।

८१ कणेरी
८।। नावरी
८१ आळवें
८।। तळवें
८।। बांदिवडें
८।। पोहळें
८।। वळोली
८।। नणुंदरें
८१ परखंदळ
८१ कोलोली
८।। मालेवडें
८१ नांदगांव
८१ उंडरी
८१ करंजफण
८।। पोरलें
८।। रायभोगांव
८।। घुंगुर

८१२

८२६।

#### ताा ठाणें.

८१ भुयें
८।। मादळें
८१ कळ्हें
८१ इंगळी
८१ काडगांव
८१ वाडी रत्नागिरी
८१ पोहळ
८।। कंदलगांव
८१ वडणगें
८१ इंजोलें
८१ निगवें
८१ हेरलें
८१ माजगांव
८।। देवठाण
८।। पिंपळें

१२

८१ कसबा
८१ उतरें
८१ आडुर
८। गुडें
८१ वाघवें
८१ पोरलें
८१ वरनगें
८१ शिरोली
८१ असुलें
८१ राक्षी
८ चिखली
८१ केरली
८१ केरलें
८।। कुशिरें
८।। दाणेवाडी

१३।

८२६।

#### ताा कोडोली.

८१ जाखलें
८१ कसबा
८१ मालें
८१ ऐतवडें

#### ताा कळ्हें.

८१ कसबा
८।। कळ्हें

#### ताा सातवें.

८१ महुरें
८।। वाडीकालकावे

८१ कल्लोळ
८१ पोखलें
८१ जाफळें
८१ गिरोली
८१ खय

---
८७

८१ चिकुर्डें
८१ करंजवडें
८१ चाखलवेडा
८१ आइतवडें

---
८६

---
८१३

८१ परखंदळ
८१ घरपण
८१ चिंचवडें
८१ भामटें
८१ मरळी
८। आसगांव
८॥ मुदकेश्वर
८॥ लौंग्रें
८॥ खेरवड
८। खडोलें

---
८८॥

८१ पिशवी
८१ बोरिवडें
८१ कसबा
८१ चरण
८१ साळसी
८॥ भाडळें
८१ आवळी
८१ जिऊर
८॥ नावली
८॥ आवटी
८१ सावर्डें
८१ नेबापूर
८॥ आंबवडें
८॥ पिंपळें
८॥ शहापूर
८१ बोरपाडळें
८१ आरळें
८१ काकें
८१ मांगलें

---
८१७॥

ता॥ वडगांव.

८१ चावरें
८१ नरंदें
८१ वठार
८१ तळसंद
८१ आंबप
८१ घुणकी
८१ दरवेश-पाडळी
८१ दाभोळें
८१ पारगाव
८१ कसबा
८१ तासगांव
८१ मिणचें
८१ भेंडवडें

ता॥ अळतें जमीन.

८१ कुंभोज
८१ नेज
८१ कुरुंदवाड
८१ नांदणी
८१ सावर्डें
८१ तारदाळ
८१ खोदशी
८१ वाठार
८१ तमदलगें
८१ हिंगणगाव
८१ कसबाशिरोळ
८१ कुटवाड
८१ शिरहट्टी
८१ अर्जुनवाडा

८१ कोथळी
८१ कवठेसार
८१ मजलें
८१ चिपरी
८१ जैनापूर
८१ बाणोली
८१ घानवाड
८१ कनवाड
८१ उदगाव
८१ निमशिरगांव
८१ चिंचवडें
८१ अलास
८१ औरवाड
८१ गौरवाडा

ता॥ वाळवें.

८१ नागठाणें
८१ नागांव
८१ गोटखिंडी
८१ बेंद
८१ भाडुरवाडी
८१ येवूर

| | | |
|---|---|---|
| ८१ कसवा | ८१ डिगरज बु॥ | ८॥ वघरवाव |
| ८१ हरोली | ८१ उदगांव | ८। खपाळें |
| ८१ शिरीदवाड | | ८। पाल |
| ८१ चोकाक | ८१९ | ८॥ पाठकरवाडी |
| ८१ साजणी | | |
| ८२२ | | ८१४॥ |

तेरीज एकंदर जमीन चिरे.

| | |
|---|---|
| ८२६। ता॥ बोरगांव | ८१३ ता॥ कोडोली |
| ८२६। ता॥ ठाणें | ८१९ ता॥ वडगांव |
| ८१७॥ ता॥ सातवें | ०।६ ता॥ अळतें |
| ८८॥ ता॥ कळें | ८२२ ता॥ रुकडी |
| ८२८ ता॥ वाळवें | ८१९ ता॥ अष्ट |

ता॥ तारळें जमीन.

| | | |
|---|---|---|
| ८१ यळवडें | ८१ तिटवें | ८। खोपळें |
| ८॥ बुनवडें | ८॥ शेळेवाडी | ८॥ बेलेवाडी |
| ८१ सालाकूर | ८॥ गोहुडें | ८१ मानगांव |
| ८१ कोतें | ८। कवळूव | ८॥ वाघवडें |
| ८१ सावडें | ८॥ कोपवडें | ८१ हिरवडें |
| ८१ पिरळ | ८१ आवळीखुर्द | ८१ तारळेंखुर्द |
| ८१ गसणी | ८॥ करंजफण | ८१ शिरसें |
| ८॥ कासारवाडा | ८। पाल | ८१ आमठाळ |
| ८॥ कासारपुतळें | ८॥ मोवरडें | ८॥ चाफोडी |
| ८१ शिरगांव | ८॥ माळवें | ८१ वळवडें |
| ८१ तुरंबें | ८१ ठिकपुर्ली | ८१ हिरळ |
| ८१ नरतवडें | ८१ पनोरी | ८॥ पाठपन्हाळा |
| ८॥ आटेगांव | ८॥ तरसंबळें | ८॥ राडाणवाडी |

| | | |
|---|---|---|
| ८॥ घामणवाडी | ८१ आणांजे | ८॥ फेदवडें |
| ८॥ दुत्रळेवाडी | ८१ पुगांव | ८१ पडळी |
| ८१ मांगोली | ८१ तळाशी | ८॥ सावर्धे |
| ८१ अकनूर | ८॥ मुसळवाडी | ८॥ कारिवडें |
| ८१ अर्जुनवाडा | ८१ का। तारळें | ८॥ करंजें |
| ८१ गुढाळ | ८॥ कुकुडवाडी | ८॥ दिगस |
| ८१ आवळीबु॥ | ८॥ कळकवाडी | ८॥ आसणगांव |
| ८१ हारवडें | ८॥ बुरबाळी | ८॥ वेलवण |
| ८१ राशिवडेंखुर्द | ८॥ वरवड | ८॥ जेवडें |
| ८॥ मळेवाडी | ८१ कुडुत्री | ८१ आंकी |
| ८। सुळंबी | ८॥ मांजरवाडी | ८१ आडोली |
| ८॥ शेळपें | ८१ केळोशीबु॥ | ८१ चाफाडी |
| ८१ केळोशी | ८॥ दुर्गमानवाड | ८॥ लडदें |
| ८१ हेंदूर | ८१ घाटवडें | ८॥ राजापूर |
| ८१ कपिलेश्वर | ८॥ कुरुकली | ८॥ भागिणें |
| ८॥ तळगांव | ८॥ घुडेवाडी | ८॥ कोनोली |
| ८। मांगेवाडी | ८॥ चांदें | ८१ खांबरडें |
| ८॥ पंडवडी | ८॥ कांबळवाडी | ८१ कामरडें |
| ८१ परीत | ८१ घामोड | ८१ निधानखण |
| ८१ सरवडें | | ८१ नानिवळें |
| | | ८॥ असनगांवबु॥ |
| | | ८॥ कंथेवाडी. |

ता॥ असंडोली जमीन.

| | |
|---|---|
| ८॥ वसरडें | ८॥ तांदुळवाडी |
| ८१ मांडुकली | ८१ आमशी |
| ८॥ आणदूर | ८॥ गोटें |
| ८॥ पळसंबें | ८॥ वसरद |
| ८॥ सांसी | ८। कंदलगांव |

८॥ कोतळी
८॥ हवेली
८॥ मठ
८॥ गारिवडें
८॥ शेळोशी
८॥ करंदवाडी
८॥ धुपवडें
८॥ तळीयें बुा
८॥ खरिवडें
८॥ पणारें
८॥ मावळंगें
८॥ सनवडें
८१ कसबा
८॥ कोर्दे
८॥ आसळज
८॥ लखमापूर
८॥ राई
८१ वतवडेंबुा
८॥ आंबरडें
८॥ कोदवडें
८॥ गोगवें
८॥ आकुरडें
८॥ हरपवडें
८॥ गावशी
८॥ सावरडें
८॥ नरवळें
८॥ शेतवडें
८॥ कोर्देखुा
८॥ निवडें
८॥ पासरडें
८॥ उपवडें
८॥ आकुरळें
८॥ तळीयेंखुर्द
८१ ह्मारूळ
८१ बोलोली
८१ सांगरूळ
८१ पणुतें
८॥ जर्गी
८॥ कडवें
८१ तिसगी
८॥ साकरी
८॥ बारवेट
८॥ मानवेट
८॥ वेगरगांव
८॥ वतवडेंखुा
८॥ मणदूर
८॥ कोनोली
८॥ पडसाळी
८॥ सुळें
८१ खटागळें
८१ वाघुरडें
८१ ह्मासुर्ली
८१ तिरवें

---

[ १६९ ] श्रीराजाराम. १७४९.

समस्तराजकार्यधुरंधर विश्वासनिधि राजमान्य राजश्री सरकारकुनानी व समस्त सैना हिंदुपत सरदारानी यासी आज्ञा केली ऐसी जे—कालपरत्वें आमचा प्रसंग विस्कळित होऊन चिरंजीव राजश्री संभाजी राजे व राजसबाई यांणीं गिरजोजी यादव व अंताजी त्रिमळ व लोकखासकेल गडकरी व तुळाजी सितोळे यासी पुढें करून किल्ले पनाळा येथें चिरंजीव राजश्री संभाजी राजे यांसि राज्यपदास बैसविलें, आह्मांस संकटीं घातलें, बहुत निकड केली. ते प्रसंगीं चिरंजीव राजश्री शिवाजी राजे यांसि संतान सौभाग्यवती पार्वतीबाई यांसि दोवे पुत्र झाले. त्यांपैकीं पहिला पुत्र कमला. दुसरा पुत्र त्यासी देवी सगर्भ होती. प्रसूत जाली. त्याचा फेरमोबदला करून हा मूल देवीच्या स्वाधीन केला. पाळग्रहण करविलें. सौभाग्यवती भवानीबाई सगर्भ होती. त्यानंतर चिरंजिवास देवी येऊन काळवशें समाप्त झाले. समागमें सौभाग्यवती पार्वतीबाईनीं सहगमन केलें. त्यांचा पुत्र देवीच्या स्वाधीन केला. तो अद्यापवर तिजपाशीं सुखरूप आहे. सौभाग्यवती भवानीबाई पोटीसी होती, ती प्रसूत झाली. पुत्र जाहला. तो चिरंजीव राजश्री संभाजी राजे व राजसबाई यानीं कपटबुद्धि करून मारिला. काय निमित्य ह्मणून पुसिलें. त्यास त्याणीं उत्तर दिलें जे—राजश्री शाहूराजे यांची आज्ञा आपणास आहे, त्यावरून आपण अपाय केला, ऐसें जनांत सांगो लागले. कांहीं दिवस तैसेच गेले. त्याउपरि उभयतां चिरंजीवांचा विवेक होऊन भेटी जाल्या. एक दोन वेळां सप्तऋषीस चिरंजीव करवीरवासी यांचें आगमन जालें. उभयपक्षीं सौरष झाला. त्यानंतर चिरंजीव राजश्री शाहूराजे याणीं यासि आग्रह केला जे—समस्तांच्या भेटी घ्याव्या असा हेत आहे. त्यावरून सर्वांस आह्मांस बरोबर घेऊन गेले. ते समयीं आपले वस्तु इकडील दुःख न साहवे. यास्तव चिरंजीव राजश्री शाहूराजे याजपाशीं आपणास रहावें लागलें. देवी व मूल समागमेंच होतीं. परंतु ते समयीं याणीं त्यासि पळवून समागमें घेऊन आले. त्यानंतर चिरंजीव राजश्री शाहूराजे याणीं आपणास दोन चार वेळां पृच्छा केली जे—पुढां वंशाचा

विचार कैसा आहे. परंतु आपण अंत न देतां उडवाउडवी केली. त्यावरी राजश्री शाहूराजे दत्त पुत्र गोत्रजांचा घेत होते, तेव्हांहि मागुती आपणास पुशिलें. त्यावर आह्मीं उत्तर दिलें जे—गोत्रजांचा पुत्र तुह्मीं घ्यावासा काय आहे. श्री महादेव तुह्मांस पुत्र देईल, एव्हांच त्वरा करावीशी नाहीं. त्याउपरि ते गोष्ट तैशीच राहिली. चिरंजीवाचा मनोदय निःसंशय आपणास कळला नाहीं. ऐसें पाहोन स्त्रीलोभें, धनलोभें, राज्यलोभें विसर पडोन कालहरण केलें. समयपरत्वें उद्भव होणें ते समयीं होईल, हा भाव चित्तीं आणून हा काळपर्यंत गुप्तच राहिलों. पुढें वृद्धापकाळ, देशकालवर्तमान नकळे, मुलास सतरा अठरा वर्षे होत आलीं, मागें पुढें कोणी खरें लटकें ह्मणतील, याजकरितां कैलासवासी राजश्री रामचंद्रपंत याणीं आमच्या राज्यांत वडिल वडिलां तागायत निष्ठेनें सेवा केली, मोडिलें राज्य त्याणीं संभाळून यश कीर्ति संपादिली. त्यांचे पुत्र राजश्री बाजीराव बरा शाहणा आहे, आपणाजवळ निष्ठेनें वर्तत आहेत, ऐसें पाहोन वाडियांतील मूळ राणोजी माने व शिवाजी खांडेकर यांजबरोबर पत्रें व वस्त्रें देऊन राव मशारनिले याजकडेस पाठविले. आणि येविशीची आज्ञा करणें ते केली आहे. मुलास युक्तिप्रयुक्तीनें हे आपणाजवळी आणवून, तुह्मांस लिहून व सांगून पाठवितील, त्याप्रमाणें सर्वत्र गोष्टीस साह्य होऊन कार्य करणें. यासी ऐकंदर हैगै न करणें. राजबीज खरें हें राजश्री उपाध्यांस व आपा प्रतिनिधी व चिंतो महादेव आदिकरून सर्वांस दखल आहे. याचा शोध पुर्ता व्हावा यास्तव राव मशारनिले उमरजेस चिरंजिवाच्या व आमच्या दर्शनास आले. ते समयीं आपण राव मशारनिले यासि निश्चयपूर्वक आज्ञा करणें ते केली. त्याउपर चिरंजीव राजश्री शाहुराजे याणीं या गोष्टीची पृच्छा रायांस वेगळे वाटेनें केली. रायांनीं इकडील आधारें उत्तर प्रतिउत्तर करणें तें केलेंच. चिरंजिवांनीं रायासि आज्ञा केली जे—तुह्मीं याचा शोध जे युक्तीनें होईल ते प्रयुक्तीनें करणें. ऐसियासि तुह्मीं सर्वांहीं राजश्री राव मशारनिले यांचें सर्वविशीं सारथ्य करून मुलास ठिकाणीं आणवणें. मग जे आज्ञा करणें ते केली जाईल. लग्न मुहूर्ताचा प्रसंग होणें आहे. त्यास राजश्री

संताजी मोहिते व नागोजी घाटगे यांच्या संमतें पुढें करणें. बहुत लिहिणें तरी सुज्ञ असा.

लेखनशुधि.

---

[ १७० ] श्री. जानेवारी १७४९.

श्रीमंत महाराज मातुःश्री आईसाहेब याणीं समस्तराजकार्यधुरंधर विश्वासनिधि राजमान्य राजश्री भगवंतराव पंडित व शिवराम पंडित अमात्य हुकुमतपन्हा यांसी आज्ञा केली ऐसी जे:—

तुह्मांजवळ चिरंजीव राजेश्री रामराजे आहेत, अशी चिरंजीव सौभाग्यवती सकवारबाईस बातमी समजली आहे, ह्मणोन चिरंजीव राजेश्री शाहूबुवा याणीं सूचना केली. त्यास राजश्री गोविंद खंडेराव चिटणीस यांचें व तुमचें बोलणें जालें तें आह्मांस व शाहूबावास सविस्तर सांगितलें. त्यास त्याणीं व तुह्मीं मनसबा केला कीं, चिरंजीवास पानगांवीं चिरंजीव सौभाग्यवती दर्याबाई निंबाळकर यांचे स्वाधीन करून तुह्मीं महायात्रेस जावयाचे उद्देशानें निघोन निरोपास ह्मणून यावें, तदनंतर जो विचार जाहला आहे तो होईल. तेथें तूर्तकाळीं संचार फार जाहला. त्यास हालीं राजश्री भगवंतराव नरहरी पाठविले आहेत. व लखनपूर ता। पानगांवीं चिरंजीवास पाठवितों. वरकड चिरंजीव राजश्री शाहूबावानीं तुह्मांस वचन देऊन पत्रही तुह्मांस दिल्हें आहे. याजकरितां बहुत सावधपणें चिरंजीवाची रवानगी करणें. जाणिजे. माहे मोहोरम, सु॥ खमस अर्बैन मया व अलफ. बहुत काय लिहिणें तरी सुज्ञ असा.

---

[ १७१ ] श्री. २६ जानेवारी १७४९.

स्वस्तिश्री राज्याभिषेक शके ७१ रक्ताक्षी नाम संवत्सरे माघ शु॥ ९ मंदवासर क्षत्रियकुलावतंस श्री राजा शाहूछत्रपति स्वामी याणीं समस्तराजकार्यधुरंधर विश्वासनिधि राजमान्य राजश्री भगवंतराव पंडित अमात्य हुकमतपन्हा यासी आज्ञा केली ऐसी जे:—

चिरंजीव राजश्री रामराजे वावडेयासी तुह्मांजवळ आहेत ह्मणून तीर्थ-स्वरूप महाराज मातुःश्री काकी साहेबानीं स्वामीजवळ सांगितलें. त्याजवरून आह्मीं राजश्री भगवंतराऊ नरहरी दसरदार दीा मजमू यासी पाठविलें. त्याणीं तुमची भेट घेऊन चिरंजीवास पाहून आले. सकळअर्थ कळविला. त्याचें तुमचें बोलणें होऊन राजश्री सदाशिवराम पंडित यास गुप्तरूपें तेथें तुह्मीं पाठविलें आहे. त्यास तीर्थस्वरूप मातुःश्रीसाहेबांचे विद्यमानें राजश्री गोविंदराव खंडेराव चिटणीस याणें भेटोन दोन तीन वेळां त्यांशीं बोलणें ठरविलें. त्याप्रमाणें चिरंजीवास पानगांवीं पाठवून द्यावें. तिकडेही सूचनेस भगवंतराव पाठविले जातील. येथून तुह्मांकडे शिवराम पंडित यासी व मग गोविंदराव यासी पाठवावे असें ठरलें आहे. त्यास मागाहून पाठविले जातील. भगवंतराव दसरदार यासी पानगांवींहून नेहमीं इकडे व तुह्मांकडे येण्यास जाण्यास आज्ञा केली आहे. शिवराम पंडित यांणीं स्वामीसन्निध विनंति केली कीं, आमचा जिल्हा जातीचा सरंजाम व वतनें व इनामगांव व कुलअकत्यार लिहिण्याचा दरख पूर्वी चालत आल्याप्रमाणें चालविला जाईल, याप्रमाणें स्वामींचें वचन आलें, परंतु आमचा जिल्हा स्वामीनीं प्रतिनिधीस दिल्हा, प्रधान पंडिताकडे मोठे मोठे गांव गुंतले, व दरकाचें लिहिणें ठाई ठाई होतें, महादाजी गदाधर यासी स्वामीनीं मजमू सांगितली आहे, त्याणें दरख राहिला नाहीं, आह्मीं पेशजी आलों ते समयीं स्वामीनीं मजमू व छंदोग्य अमात्यपद आह्मांस देऊन ठेविलें, इतक्यांत श्रीमंत राजश्री आबासाहेबीं येऊन स्वामीस विनंति केली, तेव्हां स्वामीनीं त्याजपासून शपथ घेऊन त्याचे स्वाधीन केलें, त्याप्रमाणें त्याणीं पुन्हा आह्मांस इकडे येऊंदेखील दिल्हें नाहीं, असें पुढें जाहलें, तरी आमचा सेवकाचा परिणाम काय? त्याजवरून मातुःश्रीसाहेबांचे पायावर हात ठेऊन श्रीबाळकृष्णजीनीं व श्रीअंबाबाईचीं फुलें तुळसी शिवराम पंडित अमात्य याचे हातीं दिल्हीं तीं तुह्मीं घेणें. त्यानीही शपथ स्वामीनीं घेतली आहे. प्रतिनिधीकडे तुमचा जिल्हा उत्तम आहे. त्याचे मुबदला मिरज तालुका व चिरंजीव कुसाजी व येगोजी भोसले

याचा तालुका व गांव खेडींही मोबदला दिल्हीं जातील. जुनेरचें सरदेशमुखीचें वतन तुमचें तुह्मांकडे चालविलें जाईल. व शिवराम पंडिताची स्त्री सौभाग्यवती दुर्गाबाई याणीं रामराजे यासी फार फार जपून संरक्षण केलें ह्मणून कळलें. त्यास दुर्गाबाईस साडीचोळीबद्दल प्रांत कऱ्हाड येथील सरदेशमुखीचें वतन, स्वामीचें आहे तें, तिजला इनाम करून देऊन चालविलें जाईल. तुमचे पूर्वीं लाख रकम मजमू व मजमूकडील मुतालकी, फडणिसी व सरदप्तरदारी वतनीं आहे, त्याप्रमाणें करून दिल्हे जातील. महादाजी गदाधर याणीं दरबाराची जुनी राहटी राखिली नाहीं, याजमुळें पायमाली आहे, तशी पुढें होणार नाहीं. स्वामीनीं शपथपूर्वक मारनिल्हेजवळ दिल्ही आहे. तुह्मीं कोणेंविशीं संशय न धरणें. तुमचें उर्जित स्वामी करितील. संपूर्ण राज्यांतील मजमूं व फडणिशा व दप्तरदाऱ्या व किल्लेच्या जिल्हेच्या सबनिशा पेशजीपासून वतनीं तुह्मांस दिले आहेत, त्याप्रमाणें स्वामी चालवितील. जाणिजे. छ ३ जिल्काद. सु॥ खमस अर्बैन मया व अलफ.

मोर्तबसूद.

---

[ १७२ ] ॥ श्रीभवानीशंकर ॥ ६ जून १७४८.

श्रीमंत महाराज राजमान्य राजश्री भगवंतराऊ स्वामीचे सेवेसीः—

सेवक नारो महादेव मु॥ अवरंगाबाद साष्टांग नमस्कार विनंति उपरि येथील कुशल छ २० माहे जमादिलाखर त्रितीय प्रहर जाणून निजानंद-लेखनार्थ आज्ञा इच्छितों. विशेष. स्वामीनीं अजूरदार कासद आमचा व रायाजी व सिदोजी जासूद साबे याबरोबर पत्रें पाठविलीं तें छ १७ माहे जमादिलाखरीं भृगुवासरीं शहरीं पावलीं. पत्रार्थ ध्यानास आणून बहुत संतोष जाहला, तो पत्रीं लिहितां न ये. येथील वर्तमान सांप्रत स्वामीस विदित नाहीं. आधींच तो मोंगलाई दरबार. दुसरे नबाब निजाम-नमुलूख यांची बुद्धीस ताम्रराज्यामध्यें कोणास आहे? मोठे प्रौढ मुत्सद्दी-यांसि व मूसाहेब अमीर पल्लियावरी आणोन कार्य संपादिलें. त्याचे खर्च जरूरी लागला त्याचे समारंभाकारणें येथें पैसा हातीं लागेना ह्मणून

अजुरदार सेवेसी पाठविले. त्यासी उत्तर साफ लिहिलें कीं, परभारें तुह्मींच सरकारांतून ऐवज खर्च घ्याल त्यापैकीं साउकारास उगवणी करणें. ऐसियासि ऐसें होत नाहीं. दरबारचा व्यवहार ऐसा आहे कीं, खर्च ज्या मुत्सद्दीयासि करार करावा त्याचे घरीं आधीं थैली पावती करावी, आणि नित्य घरीं दुवरुता पाणी भरावें. मग जें होणार तें होतच आहे. ऐसा रंग दरबारचा आहे. ऐसेंही असतां मुरबी मातबर पाहिजे. स्वामीचे कार्यानिमित्य मुरबीही मातबर केले, आणि कार्य केलें, आणि अजुरदार सेवेसी रवाना केले. यावरी मार्गे छ ४ जमादिलाखरीं नबाब आसफज्यांचा काळ जाला. ताबूत रोजियास पावला. कुल सलतनत नबाब नासरजंग यांसी सोपिली. ऐसें वर्तमान जालें. ऐसियासि नबाब साहेबांचे सरकारांत जे मुत्सद्दी आहेत ते तों पहिल्यावरीच आहेत. सांप्रत नबाब नासरजंग यांचे सरकारांत मुत्सद्दी मातबर आहेत. त्यासी स्नेह बहुत आहे, आणि नबाब नासरजंगजीस अगत्य फौजेचें बहुत आहे. राजश्री पेशवेयासीही निर्मळ चित्त दिसत नाहीं. पुढें पहावें. राजा व सुबा नवा जाला आहे. परंतु स्वामीचें नामाभिधान नबाब नासरजंग यांस परिच्छिन्न इनायतनामा मोठे नबाबास देती वेळेस विदित आहे. यांस अर्ज करितां इनायतनामा द्यावयासी विलंब करणार नाहींत, हें आपण जाणतों. जरी स्वामीसरंजाम अति सत्वर पावता होतो तरी दोन्हीही इनायतनामे सेवेसी येऊन पोहोंचतात. तैसी तजवीज फौजेची संचणी स्वामी करितील. सांप्रत नबाब नासरजंग यासी मातम आहे. मातम पुरसीची वस्त्रें पांच उभयतास वेगळीं वेगळीं व नजर पाठविली पाहिजे. ते व सरंजाम आलियावरी नजर नबाब साहेबास गुजराणून थैलीयाद व खासोटे स्वामीस पाठविले आहेत. अर्जी तजवीज करोन गुजराणिली आहे. येथील सर्व वृत्तांत रायाजी व सिदोजी जोडकरी पाहून आले आहेत. निवेदन करितां ध्यानास येईल. स्वामी येथील बंदोबस्त जाला ह्मणजे हस्तनापुरीं वकील पाठवून हुजूरचा बंदोबस्त करितों. हस्तनापुरी नवी मुद्रा जाली. मा। शाह पातशाह निवर्तले. त्यांना पुत्र अहमदशाह तख्तीं बसलेत. गजशिका शहरीं आला. त्यासी

तेथील बंदोबस्त केला जाईल. जे मतालब स्वामींचे असतील ते सर्व होऊन येतील. मूळ, येथील बंदोबस्त जाला ह्मणजे कीर्तही स्वामींचे थोरपणासारखी होईल. हस्तनापूरचा बंदोबस्त हातास आला ह्मणजे मुराद सर्व गोष्टी व मनसुबा हासल होईल ऐसें आहे. याहीवरी स्वामी थोर व सरदार आहेत. जो मनसुबा हितास येईल तो करतील. कंठुराय कमळापंत साहुकार यांचा वायदा जाला ह्मणून तगादा रुपयांचा आहे. तकरार लिहावयास कारण हेंच कीं, साऊकारापासून आह्मांस मुक्त करावें, ह्मणून विनंति असे. याचें उत्तर अतिसत्वर आह्मांस प्रविष्ट जालें पाहिजे. तैसी वर्तणूक केली जाईल. मार्गप्रतिक्षा उत्तराची करितों. कळलें पा। हरकारे येतील त्याबरोबर शहत लहान मासीचे ८८२॥ व आंबासाल दहा शेर पाठविलें पा। विशेष काय लिहिणें. हे विनंति.

---

[ १७३ ] ॥ श्रीरामचंद्राय नमः ॥ ६ जून १७४८.

पंत स्वामी प्रतिनिधि.

श्रीरघुराजचरणसेवातत्पर श्रीमंत राजमान्य राजश्री भगवंतराऊ स्वामींचे सेवेसी :—

आज्ञाधारक नारो महादेव कृतानेक साष्टांग नमस्कार विनंति उपरि येथील कुशल छ २० माहे जमादिलाखर जाणून निजानंदवैभव सदैव इच्छितों. विशेष. राजश्री गंगाजी संकपाळ स्वामींचीं पत्रें नबाब-साहेबांकडे घेऊन आलेत. मशारनइलेहीं दरबारांत जो तलाश करावयाचा तो केला. परंतु अर्जी मुख्यास गुजरणावयासी कोण्हीं साह्यता न केली. दरबार थोर. बावीस सुभे हिंदुस्थान व सा सुभे दक्षण, अठाविस सुभियांचें काम या गृहांमध्यें आलें आहे !!! आपलें वर्तमान. पूर्वी आपण गदक लक्ष्मेश्वर येथील देसाई व्यंकपाया यांचे चाकर होतों. जे समयीं रेडी श्रीमंत राजश्री स्वामीसी भांडत होती, त्याप्रसंगीं देसाईजीहीं आपणास तीनशें स्वार व तीन हजार बारकंदाज समागमें देऊन मदतीस पाठविलें होतें. आपण तीन वर्षे श्रीमंतजीचे

सेवेगर्त होतों. प्रतापास सर्व जाणत होतों. गंगाजी मंकपाळ यांहीं वर्तमान निवेदन करताच कळों आलें कीं, पत्र हिंदवी आहे. आपणावरी श्रीमंतजी स्वामी कृपा बहुत करीत होते. त्यापरीस विशेष कृपा स्वामींनीं करावी ऐसा मनोरथ चित्तीं धरोन एक दोघा अमिरांसी विचारलें तों त्याची आज्ञा कीं, हिंददीपत्र नबाब साहेबास गुजरत नाहीं. हें वृत्त परिच्छिन्न ध्यानास येताच हिंदवी पत्र फिरविलें. पत्रार्थ ध्यानास आणोन राजश्री गोपाळराम मुनसी याचे हस्तें फारसी अर्जी तयार करोन, थैली दाखल करोन, दरबारचे मोहोर हशमखुल्लाखा पातशाही व बक्षी व अनवरखांजी व फतरुद्दीअल्लीखांजी अर्जबेगी व नजरबेगखांजी बक्षी फौजेचे व ज्यान मिर्जाखा मुनसी व दरगाह कुलीखा दरोगे हरकारे मुसाहेब सरकारचे बहुत व हकीम हसनअल्ली सर्व साधून, माह्येतवरी आणोन, नजरबेगखा बक्षीचे मा अर्जी गुजराणिली. हें वर्तमान सर्व गंगाजी संकपाळ यासी विदित आहे. पत्रीं सर्व लिहिलें असेल त्यावरून निवेदन होणार. आणि दरबार येथील श्रम व द्रव्यसाध्यें हातास येतो. गंगाजी रिक्तहस्तें येथें आले. यास द्रव्य कोठें मिळणार? स्वामींचे चरणासी जोड परिच्छिन्न करावी हा हेतू पूर्ण स्मरोन, अनेक उपाय योजून, इनायतनामा दरबारामधून काहाडोन कंठुराय कमळापंत साऊकार याचे दुकानीं आणिला. स्वामींचें नाव थोर म्हणून हरएक मुत्सद्दी वगैरे हजारो मागतात. सेवकानीं तोडजोड करून दरबार खर्च ठरवून आपला जातरुका साहू मजकूरास देऊन, त्या हातीं मुत्सद्दी याची निशा करविली. तपसील जैल नजरबेगखा बक्षी ५०० रुपये, व मुनसी ५००, व अर्जबेगी ५००, व मुनसीचे पेशकार दोघे व खिजमतगार, चोपदार वगैरे किरकोळ खर्च ५०० एकूण दोन हजार रुपये मोठ्या युक्तीनें ठरावून कार्य संपादिलें. गंगाजीस पैसा मिळत नाहीं म्हणून अजुरदार कासद करोन सेवेसी पाठविला आहे. येथें रुपये १० नक्त कासदास दिधले. स्वामींनीं तेथें बाकीम रुपये सध्या देऊन रसीद बाकीम रुपयाची घेऊन पत्राबरोबर पाठवावी, कीं कासदाचे गिरवियापासून रुपये मुजरा घेतले जातील. पत्राचें उत्तर पत्र सेवेसी प्रविष्ट होताच ऐवजाची हुंडी व

कोणीहीं आपले सरकारचें मनुष्य समागमें देऊन रवाना करावें. कासदानें १६ रोजांचा वायदा करून आला आहे. यास अविलंबें मार्गस्थ करावें. कासद येथें पावलियावरी राजश्री गोपाळराम व राजश्री शिवराम शामराज उभयता इनायतनामा घेऊन सेवेसी येतात. भेटीअंतीं सर्व वृत्त मनसूबा पेस्तर करावयाचा विचार सत्वरच केला पाहिजे. यांस यासमयीं फौजेचें बहुत अगत्य आहे. इनायतनामा देतेवेळेस नबाबसाहेबीं आज्ञा केली कीं, पन्नास हजार स्वार व पंचवीस हजार बारकंदाज सामान चांगलें घेऊन येणें. सरंजामही तुह्मास जो पाहिजे तो दिधला जाईल. मतलब हाच कीं, जैसें वैकुंठवासी श्रीमंतजीचें नांव थोर आहे तैसाच सामान योजिल्या उत्तम आहे. उभयतांच्या भेटी जाहलियावरी कामें बहुत होतील. या कामांत गंगाजीनें बहुत मेहनत केली. पत्रीं लिहितां विस्तार होतो. मा। हुसेन स्वामीकडोन गंगाजीचे समागमें आला. ते मनुष्य समागमायोग्य नाहीं. कार्याचा नाश यानें बहुत केला. स्वामीचाच प्रताप होता कीं, काम नाश न पावलें. उभयता सेवेसी पावता निवेदन करितील. नबाब साहेबांच्या चित्तीं बहुत आलें आहे कीं, एक वेळ स्वामीनीं यावें आणि भेटीअंतीं स्वामीचें उर्जित करोन मग एकचित्तें जें करावयाचें तें करावें. नबाबाहीं बोलूनही दाखविलें कीं, महाराष्ट्र राज्यामध्यें तुह्मीं बहुत दिवस चाकरी करिता, कामेंही बहुत केलीं असतील, एक वेळ मोंगलाईचीहि मजा येऊन पहाणें, आणि आपला नक्ष करावा. ऐसें वर्तमान आहे. सत्वर भेटीचा विचार जाला ह्मणजे यास फौजेचे जरूर ह्मणोन जागिरा चित्तानरूप मिळतील. आणि मदत खर्चही घेतला जाईल. श्रुत व्हावें. नजरबेगखानाचे पत्राचें उत्तर बहुत थोरपणें लिहून पाठविलें पाहिजे कीं, कितीएक कामें त्यांचे हातें घेतलीं पाहिजेत. ते मुरब्बी आहेत. कळावें हे विनंति.

राजश्री गोपाळराम व शिवराम शामराज यांचे नांवें अभयपत्रें पाठविलीं पाहिजेत. या उभयतांना पाठवावयाकारणें नजरबेगखानजीहीं सांगितलें. मनुष्यें थोर कार्याचीं आहेत. स्वामीचे भेटीअंतीं सर्व कळों येईल. विशेष काय लिहिणें. हे विनंति.

[ १७४ ] ॥ श्री भवानीशंकर ॥ ६ जून १७४८.

राजमान्य राजश्री भगवंतराऊ साहेबांचे सेवेसीः—

छ अखंडितप्रतापयशस्वी परउपकारपरायण सेवक गंगाजी संकपाळ दंडवत विनंति उपरि येथील क्षेम साहेबांचे कृपेकरून वैशाख वद्य ८ जाणून निजानंदवैभवेंकरून अखंडित इच्छित असतों. विशेष. साहेबांची आज्ञा घेऊन रुकसत होतेसमयीं आपणांपासून स्वामींनीं शपथ कार्याची घेतली. याउपरि स्वार जालों, ते शहर औरंगाबादेस पावलों. दरबारामध्यें थैली पावती करावयासी तलास बहुत केला. हिंदवीपत्र कोणीं नबाबास प्रविष्ट करीना. दोन अडीच महिने तलास केला. मग अगत्य काम केलें पाहिजे ह्मणून पहिले राजश्री गोपाळराम व राजश्री नारो महादेव यासी स्नेह होता. यापाशीं येऊन वृत्तांत निवेदन करतांच, याहीं उभयतां एक होऊन हिंदवीपत्र थैली काढोन पाहिली. वृत्तांत ध्यानास आणून, पारसीपत्र सिद्ध करोन, थैली दुरुस्त करून, गर्गेश्वरमासीं नारो महादेव यानीं नजरबेगखा बक्षी नबाबाचे फौजेचा याचे मार्फत गुजारणली. थैली पहातांच नजरबेगखानास आज्ञा केली कीं, कृष्णराऊ खटावकर यांचे कोणीं आहेत कीं आणिक कोणी आहेत. कुलवर्तमान ध्यानास आणून अर्ज करणें. त्यावरून नजरबेगखानानीं वर्तमान आणविलें. मग राजश्री नारो महादेव स्वामींचे प्रतापास बहुत दिवस जाणतात. यांहीं वर्तमान स्वामीस लिहून नजरबेगखानापाशीं दिधलें. दुसरे दिवशीं फर्द नबाबास गुजराणिला. स्वामीनें वृत्त ऐकोन बहुत खुशाल जाले कीं, ते येत असले तरी उत्तम आहे, आपण त्यानें सर्वस्वें चाऊऊन. इनायतनामा मुनसी यासी ताकीद करून मुतानें तयार करविला. तितकियामध्यें नजरबेगखा वराडांत खजाना आणावयासी पाठविला. आणि नबाबानाही कुच होऊन बऱ्हाणपुरास लष्कर गेलें. राजश्री नारो महादेव यास समागमें घेऊन आपण बऱ्हाणपुरास गेलों. दरबार थोर. कुलराज्य हिंदुस्थान व दक्षण एकस्थळीं आलें आहे. इनायतनामा हातास यावयासी बहुत दिवस लागले. तजवीज करोन इनायतनामा करविला. तो नजरबेगखानही खजाना घेऊन लष्करास आले. नजर-

बेगखानास साहेबाचे नांवें आपण पत्र लिहून दिधलें होतें. त्यासी साह्य करोन याचे विद्यमानें दरबारचे मोहोर हातास आणून साध्यता त्या हातीं करवून इनायतनामा घेतला. देतेवेळेस नजरबेगखानास नबाब बोलले कीं, तुह्मींहि लिहिणें कीं, जलदी फौजेचा सरंजाम, पन्नास हजार स्वार, पंचवीस हजार बरकंदाज, सामान चांगलें आणणें. सरंजामही माकुल दिधला जाईल. आह्मांस त्यांचें उर्जित करणें अगत्य. त्यांचे वडलांस आपण जाणतों. सत्वर फौजेसहवर्तमान येऊन मुलाजमत करीत त्यांचे मुदेमाफिक सर्व होऊन येईल. भेटीउपरि खर्चाचीहि मदत केली जाईल. ऐसी आज्ञा नजरबेगखानास जाली. त्यावरून खान मजकूर याणीं सेवेसी पत्र लिहिलें आहे. त्यावरून निवेदन होणार. साहेबापासून या मुलकांत आलिया शहरचा मोकदमा आणि महागाईही बहुत. खर्चवेचास बहुत हैराण जालों. पत्रीं लिहितां विस्तार होतो. साहेबांचे नांवावरी चौबे भले मनुष्यांहीं संगत द्यावयाची ते दिधली. खर्चवेंचहि पुरविला. आणि मुत्सद्दीयांहीं थोर नांव ऐकोन मोठें तोंड पसरलें. अनेक उपाय रचोन दरबारखर्च नजरबेगखान ९०० रुपये व मूसा ९०० रुपये, अर्जबेगी ९०० रुपये व पेशकार मुनसी व दरबारचे खिजमतगार, चोपदार वगैरे किरकोळ रुपये ९००, एकूण दोन हजार रुपये मोकरार करून इनायतनामा कंठुराय रूगलापंत साउकार यांचे दुकानीं ठेविला. आणि रोखा राजश्री नारो महादेव याणीं एका महिनियाचे वाइदियानें दिधला. साउकाराकडोन मुत्सद्दीयांची निशा करविली. मग आपण अवरंगाबादेस आलों. येथें पैशाचा तलाश करावयाचा तो केला. परंतु द्रव्य साध्य जालें नाहीं. ह्मणून कासद अजुरदार अजुरा रुपये ३२ मोकरार करून १६ रोजांचे वायदियानें सेवेसी पाठविला आहे. येथें १० रुपये सध्यां कासदास दिधले. रुपये वीस साहेबीं कासदास देऊन रसीद लिहून घेऊन येथें या कासदाबरोबर रसीद पाठविली पाहिजे कीं, मुजरा घेतले पाहिजेत. दरबारखर्च लिहिलेप्रमाणें कासदाबरोबर कोणी इतबारी माणूस देऊन पाठविले पाहिजे कीं, तो आपले हातें ज्याचा करार त्यास देऊन इनायत-

नामा घेऊन सेवेसी पोंहचतो. साहेबीं रुकसतसमयीं आज्ञा केली होती कीं, दरबार खर्च काय लागेल. आपण विनंति केली होती कीं, हे मोईन नाहीं. जे वेळेस जें ठरेल ते विनंति केली जाईल. त्यास सांप्रत इनायतनामा द्यावयासी दोन हजार रुपये लागले. या वेगळा पोटखर्च राजश्री गोपाळराम व राजश्री नारो महादेव व राजश्री शिवराम शामराज तिघे भले मनुष्य यांहीं आपले पदरचा आसामगट लाऊन कार्य केलें. नजरबेगखानाहीं गोपाळराम व शिवराम शामराज उभयतांस सेवेसी पाठवावयाचे सां। आहे. यांचे विद्यमानें जो विचार करणें तो करून सत्वर मुलाजमतीचा मनसुबा करणें ह्मणून सांगितलें आहे. त्यास, उभयतांचे नावें आज्ञापत्रेंहि पाठवावीं, कीं गृहस्थ निर्भय चित्तें सेवेसी येऊन मनसुबा थाट करतील. फौजेचे तजविजेमध्येंही असावयास अगत्यही आहे. ऐसियामध्यें मनसुबा योजोन आला तरी आपले मुद्देमाफीक कार्य होऊन येईल. जागिरा व मदत खर्च चांगला घेतला जाईल. जमाव पडले. साहेबीं शपथ घेतली ह्मणून शरीरश्रम करोन कार्य केलें. आता सर्व अभिमान साहेबास आहे. देलतपत्र ऐवज जासूद पत्र-उत्तर पाठविलें पाहिजे. दिवस जातात. कळलें पाहिजे. पांच महिने जाले कीं, शेख अहमद व सुभाना जासूद पत्र देऊन पाठविला. पा कीं नाहीं, संशय आहे. मुल्लामाणमांची खबर कांहीं नाहीं. साहेब धणी आहेत. परामृश करोन उत्तर पाठविलें पाहिजे. मा। हुसेन समागमें दिधला. त्याची स्थिन पत्रीं लिहितां नये. काम खराब जालें होतें. परंतु तिघे गृहस्थ मातबर यांची भीड पडोन काम जालें. याची स्तुत लिहितां पत्र विस्तारेल. भेटीअंती सर्व निवेदन करूं हे विनंति.

---

[ १७२ ] श्री. ६ जून १७४८.

राजमान्य राजश्री रावसाहेब भगवंतरायजी स्वामीचे सेवेसी:—

॥ अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमुद्राविराजित सें। गंगाजी संकपाळ, मुक्काम शहर औरंगाबाद विनंति उपरि येथील कुशल ता। २० जमादि-ल, ११ जाणून निजानंदलेखन करीत इच्छितों. विशेष. अनुस्वार

कासद व रायाजी व सिदोजी जासुदांबरोबर पत्रें व खलित्या व लखोटे पाठविले, ते शहरीं प्रविष्ट जाले. येथील वर्तमान सर्व राजश्री नारो महादेव यांचे पत्रीं लिहिलें आहे, त्यावरून कळों येईल. येथें कार्याची उभारणी करावयासी आळस केला नाहीं. अगत्य जाहलें, ह्मणून अजूरदार कासद सेवेसी पाठविला. त्यासी उत्तर साफ आलें. येथें पैसा मिळत नाहीं, ह्मणून पत्रीं लिहिलें होतें. आणि उत्तरें ऐसीं आलीं. ऐसियासि, आपला इलाज काय? सर्व रायाजी व सिदोजी रोबरो पाहून आले आहेत, निवेदन करितील. तें ध्यानास आणून साहित्य येऊन पोहोचत आहे, तरी सर्वही होऊन येतें. याहीवरी सरदार आहेत! सांप्रत साउकारांस रोखा राजश्री नारो महादेव यांणीं दिधला आहे. त्यास तकाजा बहुत आहे. त्याचें साहित्य होऊन येईल, तरी उत्तम आहे. साहेबीं वचन इमानप्रमाण घेतलें ह्मणून हें कार्य करणें आलें. अभिमान सर्व साहेबांस आहे. अभिमानपूर्वक साहित्य प्रविष्ट जालिया यशकीर्ति स्वामीची आहे. आणि साहेबाचेंहि कार्य थोर होऊन येतें. कळलें पाहिजे. विशेष काय लिहिणें. हे विनंति.

---

[ १७६ ] ॥ श्रीभवानीशंकर ॥ १९ आगस्ट १७४८.

श्रीमंत राजमान्य राजश्री शिवरामपंत व ता। राजश्री कृष्णराऊ स्वामींचे सेवेसी :—

सेवक नारो महादेव साष्टांग नमस्कार विनंति उपरि येथील कुशल जाणून निजानंदलेखनार्थ आज्ञा इच्छितों. विशेष. कृपा करून पत्रीं सनाथ केलें. उत्तम समयीं प्रविष्ट होऊन परम संतोष जाहला. येथील सर्व भावगर्भ श्रीमंत राजश्री रायांचे पत्रीं लिहिलें आहे. ध्यानास आणून सरंजामाची रवानगी अति अविलंबें येऊन पोंहोचते तरी सर्व कार्याची उभारणी होऊन येते. स्वामी प्रसंगीं सुज्ञ आहेत. हें कार्य सर्व स्वामींचे उर्जितांचें आहे. आपलें उर्जित उत्तम प्रकारें करणें

आहे. तरी श्रीगंतजीस विनंति करून सरंजाम व वस्त्रें अविलंब पावतीं जालीत, ह्मणजे सर्व होऊन येईल. याहिवरी स्वामी सुज्ञ व सरदार आहेत. जें विचारास येईल तें करतील. येथें सामाईन पावलियाने वेगळें कांहीं कार्य होत नाहीं, ऐसें परिच्छिन्न जाणून जें चित्तास येईल तें करावें. विशेष काय लिहिणें. हे विनंति.

---

[ १७७ ] श्री. १९ आगष्ट १७४८.

श्रीमंत राजश्री शिवरामपंत व राजश्री कृष्णरावजी स्वामीसः—

विनंति सेवक नारो महादेव मुकाम शहर अवरंगाबाद साष्टांग नमस्कार विनंति उपरि येथील कुशल भाद्रपद शुा ७ शुक्रवारपर्यंत स्वामीचे कृपेकरोन यथास्थित असे. विशेष. बहुत दिवस जाले. परंतु अभय पत्र पाठवून सो। परामृश न केला. हें अपूर्व दिसोन आलें. इकडील वर्तमान सविस्तर मा। रा। रावसाहेब यांचे पत्रीं लिहिलें आहे, त्यावरून विदित होईल. आणि राजश्री रावसाहेब हें कार्य स्वामीसच करोन देणार, आणि स्वामी निष्ठुर नसले आहेत, हें अपूर्व आहे! जर हें कार्य स्वामीस कर्तव्य नसलें तरी गंगाजीस सत्वर पाठविजे. ज्याच्या वडिली घोडे कधीं दरीस पाहिले नव्हते, ते या राज्यांत येऊन पंच-हजारी मनसबदार जाले! आणि स्वामीस तों नबाब साहेब आपणहून म्हणतात. वारंवार आपल्या वडिलांची स्तुति करितात. आणि बहुत खुश आहेत जे, राजश्री राव येथें आलिया उत्तम आहे. तरी स्वामींनी हें कार्य चित्तीं धरून कीजे. तरी तुम्हीं मा। रा। रावसाहेब यांसी सांगून गंगाजीस व आपला कोणी इतबारी असेल त्यासी पाठविजे. त्याच्या मार्फतीनें कार्यभाग केला जाईल. या कामास विलंब न कीजे. उत्तर व गंगाजीस सत्वर पाठविजे. हे विनंति.

जासूद
आपाजी
मल्हारजी.

---

[ १७८ ] श्री. १२ आगस्ट १७४८.

श्रीमंत राजश्री भगवंतराऊ रामचंद्र हुकुमतपन्हा स्वामीचे सेवेसीः—

विनंति सेवक नारो महादेव मुक्काम शहर अवरंगाबाद करद्वय जोडोन साष्टांग नमस्कार विनंति उपरि येथील कुशल भाद्रपद शुद्ध सप्तमी शुक्रवारपर्यंत स्वामीचे कृपाप्रांतवलेंकरोन यथास्थित असे. विशेष. स्वामींनीं सिदोनी व राऊजी हरकारी यांजबरोबर पत्रें पाठविलीं तें पावलीं. त्यांत आज्ञा केली जे, नवाब नासरजंग यांसी अर्जी देणें. त्यावरून अर्जी तयार करोन छ १४ शावानीं तिसरा प्रहरा शेर स्वारींत नजरबेगखान बक्षी यांच्या माफीतीनें गुजराणिली. नबाबांनीं अर्जी पाहोन बहुत खुश जाले, आणि नजरबेगखानास आज्ञा केली जे, इनायतनामा सिताब तयार होय आणि राऊजी सत्वर येऊन पोहोचत, त्यांचा आपल्या सरकारांत बहुत दिरिंग दिसोन येतो. आणि आपण तों स्वामीचेच नांवावर जागिराचाही फर्द दिल्हा. त्याचा नबाबाहीं जाब दिल्हा जे, रा। उदाजी चव्हाण यांची जहागीर अकरा लक्षांची विजापूर प्रांतीं देतों, बाकी जहागीर वराड प्रांतीं देतों. ऐसा करार नजरबेगखांजीशीं केला. आपणहि रुबरु होतों. त्यासी, बजिन्नस नजरबेगखांजी याणींहि पत्र सेवेसी लिहिलें आहे. आपण जे कांहीं विनंति पत्रें लिहितों त्यांचा अर्थ घडोन येत नाहीं. तस्मात् दिसोन आलें जे, स्वामीचे चित्तांत हें कार्य कर्तव्य नाहीं. तरी नाहक तहखर्चाखालें काशास यावें. ऐसेंच असेल तरी आह्मास तैसेंच उत्तर लिहिणें. आपण या कामांत एकंदर नाहीं, आणि नबाब साहेबांसही अर्जी देऊंजे, त्यांचें येणें होत नाहीं. आणि जो कोणी मोंगलाईत आला आहे तो कोणी श्रमी झाला नाहीं. पदासच चढला. आणिख जाणें पूर जालें हें आपणही परस्पर ऐकिलें असेल. आणि स्वराज्यांत होते तेव्हांही स्वामीस विदितच होतें जे, कोणकोण रीतीनें नांवलौकिक होता, आणि सरंजाम कोणें प्रकारें होता. ऐसा प्रकार असोन स्वामीचा तो नांवलौकिक थोर असोन, नबाबसाहेब आपणहून हमेशा स्मरण करीत असतां, न यावें हें अपूर्व दिसोन आलें. राजश्री बाळाजी बाजीराव यांपेक्षां

स्वामीस नबाबसाहेब बहुत चहातात. आणि नबाब आसफज्याहा यांसी सांगून गेले जे, कुल मऱ्हाटे राज्यांतील सरदार याचे पायजाम आहेत. ऐशियावरोन नबाबसाहेब बहुत चहातात आणि जैसी फौज येईल तैसी जहागीरही देतील. आणि मुजामत जालिया मदतखर्चही उमदा देतील. ऐसें असोन महाराज चित्तीं कार्य न धरीत हें अपूर्व आहे. तरी आतां नबाब नासरजंग यांची नजर सवाशे मोहरा गुजराणावी लागतात. व वस्त्रें व दरबारखर्च व आपला सरंजाम देऊन राजश्री गंगाजी संकपाळ यासी सत्वर रवाना करोन पाठविजे. सर्व कार्य विजयादशमीपावेतों होऊन आलें तरी उत्तम. नाहीं तरी, पुढें कांहीं येत नाहीं. गंगाजीस सत्वर पाठविजे. कासीद पाठवावा त्यासी अजुरा पोहोचत नाहीं. याकरितां कासीद येयास अनमान करितात. पर्धपूर येथें कासिदानीं रुपये १० दहा आह्मांपासोन घेतले. तरी गंगाजीस सत्वर पाठविजे. फौजच तिकडे अनुकूल पडत नसली, तरी येथें पांच हजार स्वार तयार आहेत. बितपशील:— जमादार हकीमबेगजी स्वार ५००, व खोंगे रहिमतुल्ला स्वार ५००, भिवसिंग स्वार ५००, व शिदोजी पाटील जळगांवकर स्वार ५००, व खानदेशांत जमातदार स्वार १०००. आणिकही कितेक लोक उमेदवार आहेत. तरी यांचे नांवें कौल वेगळे वेगळे पाठविजे. येथें जनांत आणि दरबारांत हास होय तें न कीजे. आज दहा महिने या कामास जाहले. परंतु पैसा दृष्टीस येत नाहीं. येथें तों आधीं पैसा खर्च केलियाविगळें कार्य होत नाहीं. हे गंगाजीनेंही सेवेसी विनंति केली असेल. तरी गंगाजीस सरंजाम देऊन सत्वर पाठविजे. राजश्री पिलाजी जाधवराव यांचा लेक राजश्री जोत्याजी जाधव हेहि येऊन नबाब साहेबांस भेटले. त्यांसी मदतखर्च लक्ष रुपये दिल्हे. आणि जहागिरा चौतक्ष्याच्या दिल्या. महाल उंदणगांव वगैरे महाल गुजनार दिले. स्वामीस विदित होय. येथील कैफीयत आपाजी जासूद सांगतां विदित होईल. आपाजीस व राजश्री गंगाजी संकपाळ यासी सत्वर पाठविजे. दिरंग न करणें. राजश्री मल्हारजी होळकर हेहि पातशाही

चाकर जाले. त्यांचा मुलूक जहागीर हजुरीहून माळव्यांत दिल्ही. व यशवंतराव पोवार यांसीहि जहागीर माळवा प्रांतीं दिल्ही. आणि किताब पंचहजारी साहेबनौबद केले. आंवदा रा॥ बाळाजी बाजीराव पेशवा याचा व नबाबसाहेब यांचा कटाक्ष बहुत आहे. यामुळें व आणीक कितेका कार्यांमुळें नबाबसाहेब यांस फौजेची बहुत जरूरी आहे. तरी स्वामीनीं आपला दुर्गसरंजाम सत्वर पाठविजे. दरिंग करावयाचें कार्य नाहीं. यावर महाराज थोर आहेत. आपण वारंवार लिहितों आणि स्वामी चित्तीं धरीत नाहींत. तस्मात् दिसोन आलें जे, आपणांस कार्याचें अगत्य नाहीं. अगर आमचा व गंगाजी संकपाळ यांचा इतबार नसेल. तरी साहेबीं आपला कोणी जो इतबारी असेल त्यासी पाठविजे. त्यांची व नबाब साहेबांची मुलाजमत करून देऊं आणि त्यांचे मार्फतीनें कार्य-भाग केला जाईल. सत्वर पाठविजे. लोकांत बदनक्ष होय तें न कीजे. नबाब साहेब वारंवार आपलें स्मरण करितात जे, मा॥ रा॥ राऊ सत्वर येत तरी उत्तम आहे. यावर महाराज समर्थ आहेत. सांप्रत महाराज राजश्री छत्रपति स्वामी यांचीं वस्त्रें व घोडे व हत्ती व जंबूर छ १ रमजानीं त्रितीय प्रहरीं नजर गुजराणली. व राजश्री पेशवे यांचीं वस्त्रें जवाहीर व एक हत्ती, पांच घोडे व नजर मोहरा सहस्र एक छ ९ रमजानीं नजर गुजराणली. आणीक राऊ फतेसिंग व रघोजी भोसले यांच्या नजरा आल्या आहेत. गुजरतील. व बहिरजी पांढरे छ २४ शाबानीं येऊन नबाब साहेब यांची मुलाजमत केली. व दमाजी गायकवाड यांचा वकील येऊन नबाब साहेबास भेटला. नबाबसाहेबीं नजरबेगखान बक्षी, बहिरोजी पवार, पेशवा आणावयास पाठविले आहेत. दमाजी गायकवाड यांनीं तीन क्रोड रुपये नजर कबूल केली, आणि मोंगलाईंत येतात. आणि आपणास तों नबाब साहेब आपण ह्मणून च्रहातात. ऐसें असतां अपूर्व आहे जे, स्वामी चित्तीं धरीत नाहींत! सर्वांविषयीं स्वामी समर्थ आहेत. उभय राज्यांत स्वामीचें नांव थोर आहे. आणि हा समय फिरोन येणार नाहीं. नवा राजा जाला आहे. येथेंही निजामन्मुलूक यामागें सर्व नूतन व्यवहार जाहला आहे. या संधींत जो जडला तो अक्षयी जाला. ऐशा समयांत जो

नबाबसाहेबांस जो अर्ज जागिरा व मनसबा व मदतखर्च मुखाजगत जालिया कराल तो घडोन येईल. स्वामी अविलंब ! ! आपाजी व मल्कोजी जासूद यांजबरोबर आपला कोणी इतबारी असेल तो, व गंगाजी संकपाळ व स्वरोम वितपशील :—पेशजी इनायतनामा नबाब थोरले यांचा दरबारखर्च रुपये दोन हजार, व हालीं नबाब नासरजंग यांच्या इनायतनामियाचा खर्च रुपये चार हजार, नजर नबाब साहेबांची आपलें स्वरूपान योग्य, व मुत्सद्दियांस वस्त्रें आपला कोणी इतबारी पाठवाल त्याजबरोबर पाठविजे, कीं कार्य सत्वर घडोन ये. हा सरंजाम येथें पोहोंचलियानें येथील बंदोबस्त करून राजश्री गोपाळराम व राजश्री शिवराम शामराज व राजश्री राजारामपंत गु॥ कडोराम साउकार इनायतनामा नबाब साहेबांचा घेऊन सेवेसी पोहोंचतील. सांप्रत थोरले नबाब साहेब यांचा इनायतनामा व पत्रें नजरबेगखान बक्षी व हाकीमबेगखांजी जमातदार गातबर व एक पत्र आह्मांस नजरबेगखान याहीं लिहिलें आहे, तें बजिनस पाठविलें आहे. याचा अर्थ पारसनवीस बोलावून अक्षरशः अन्वयें ध्यानास आणावा. ह्मणजे समाधान होईल. स्वामीच्या नांवावर कुल अम्मलदार व मुत्सद्दी बहुत खुशवक्त आहेत, कीं ऐसे थोर सरदार या प्रसंगीं असतां बहुत उत्तम आहे. यावर जें विचारास येईल तें कीजे, आणि आह्मांस साउकारापासून मुक्त कीजे. आपाजी व मल्कोजी यांसी अजुरा रुपये ३२ व पहिले जोडा १ जासूद पाठविले होते, यांची बाकी रुपये १०, एकूण रुपये ४२ बेनाळीस याचे पदरीं घालणें. यांनी स्वामीच्या कार्यामध्यें श्रम बहुत केले आहेत. यांसी वस्त्रें द्यावीं. सत्वर मार्गस्त कीजे. पंधरा दिवसांचे वायदियानें आले आहेत. पंथ दूर आहे. तिकडे यावयास मनुष्य अनमान करीत आहेत. वर्तमान तों इकडील तिकडे आलें पाहिजे. अजुरा तो भारी पडतो. आज्ञा येईल तरी चार जोड जासूद ठेविले जातील. सांप्रत आपाजी व मल्कोजी सेवेसी आले आहेत, यांस सही करावे. आपाजी मनुष्य कामचंग पोंगडाईन चाकर आहे. याचा दरमहा मोकरा गीर करार कीजे. येथील सर्व अभिप्राय आपाजी सेवेसी निवेदन करितां कळों येईल.

[ १७९ ] श्री. ९ आक्टोबर १७४८.

श्रीमंत राजश्री शिवरामपंत व राजश्री कृष्णराऊजी स्वामीचे सेवेसीः--

पो नारो महादेव मुक्काम अवरंगाबाद साष्टांग नमस्कार विनंति उपरि येथील कुशल ता। छ २२ सवालपर्यंत यथास्थित असो. विशेष. इकडील वर्तमान श्रीमंत मा। राजश्री राऊसाहेबास लिहिलें आहे, त्यावरून श्रुत होईल. जर तुह्मांस कार्य कर्तव्य असेल तरी श्रीमंत राजश्री राऊजीस विनंति करोन कांहीं खर्चास व कोण्ही इतबारी पाठविजे. कार्य करणें जर चित्तांत कर्तव्य नसेल तरी तैसेंच उत्तर पाठविजे. लोभ असो दीजे. यमाजी जासूद जोडी एक पाठविला. यासी मजुरा रुपये २२. त्यापैकीं रुपये ५ पांच आपण दिल्हे. बाकी रुपये १७ आपण दीजे. हे विनंति.

---

[ १८० ] श्री. ९ आक्टोबर १७४८.

पुरवणी राजश्री पंत स्वामीचे सेवेसी.

विनंति उपरि. स्वामीनें गतवर्षी अनंतभट व बाळंभट रुईकर यांजपासून मोहरा १९॥ व रु० १७ देविले. त्यास, जमान नीळकंठभट रुईकर आहे. ऐसियास, मुदती श्रावणांतील केली. ते येऊन गेली त्याजवर आह्मीं भाद्रपदमासी सेख सदू बमुलास अनंतभटाकडे पाठविला. तेव्हां गांवास आला नव्हता, ह्मणोन रिकामान फिरोन आला. याजवरी काली आह्मीं अवरंगाबादेहून येतेसमयीं स्वामीचीं पत्रें व आपलीं पत्रें व खताची नक्कल ऐसी देऊन सेख सदूस छ १ सफरी त्रिंबकास अनंतभटाकडे पाठविला. याणें जाऊन पत्रें दिल्हीं. अनंतभट व बाळंभट भेटला. त्यास पत्रें देऊन पैकियाचें मागणें लाविलें. तेव्हां त्याणें जाऊन शहरचे फौजदारापाशीं फिर्याद केली. आणि त्यास अंतस्थ लाच रुपये ४० देऊन त्यांच्या प्यादियापासोन धरून सेख सदूस कोठडियांत अवघे आठ दिवस घालविले. तेव्हां आह्मीं उमरखानाचें पत्र पाठवून सोडवून आणविला. ऐसे भट लोक होऊन बिनकामीं

वास जाहले आहेत!!! याउपर रुपये त्याजपासून येत नाहीत. त्याचे जमान नीळकंठभट तेथें स्वामीपाशीं आहेत. त्यास तेथेंच जमान घेऊन त्यासी नसिहत करून पाठवावया आज्ञा करावी. ह्मणजे अनंतभटाचावती रुपये नीळकंठभटापासून वसूल घेऊन. याउपर स्वामीनें या रुईकराचा इतबार सहसा धरिला न पाहिजे. स्वामीपाशीं येऊन गरिबी दाखवितातो. परंतु हे लोक ऐसे गवाशीनें वर्तणूक करितातो. तर नीळकंठभटाची बळकटी करून पाठविला पाहिजे. सेवेशी श्रुत होय. याउपर रुई-कराचा इतबार गेला. स्वामीनें याचा विश्वास न धरावा. हे लोक भले मनुष्य नव्हेत. अपहार करावयाचे लोक आहेत. तर यांजपासून द्रव्य हातास ये ऐसी योजना केली पाहिजे. सेवेसी सूचना मात्र लिहिली असे. श्रुत होय.

---

[ १८१ ] श्री. ९ आक्टोबर १७४८.

श्रीमंत राजश्री भगवंतराऊजी स्वा॥ सेवेसी:—

विनंति सेवक नारो महादेव मुक्काम शहर अवरंगाबाद साष्टांग नमस्कार विनंति उपरि येथील कुशल ता॥ छ २२ सवाल पावेतों स्वामीच्या कृपेकरून यथास्थित असे. विशेष. बहुत दिवस जाले महाराजाकडील कांहीं वर्तमान कळों आलें नाहीं. त्यावरून चित्त उद्विग्न आहे. विशेष. आपाजी व मल्कोजी हरकारे जोडी १ नवाब साहेबांना इनायतनामा व पत्रें देऊन पाठविला. त्यासी आज सवा महिना जाला. परंतु सेवेसी पावला किंवा मार्गी नदींत बुडाले हें नकळे. येथें तों आपणास रोज उठोन तागीद करितात जे, मा॥ रा॥ राऊजी आले किंवा नाहीत. ऐसा विचार येथें आहे. आणि स्वामीस तों या गोष्टीनें स्मरणही नसेल, ऐसें दिसोन येतें. येथें नवाब नासरजंग यांचा इनायतनामा तयार होऊन पडला आहे. परंतु महाराजाकडील कांहीं वर्तमान कळों येत नाहीं, त्यासी आपण काय करावें! आपणास पूर्वीच कळलें जे, हा कारभार आपला सत्यच आहे,

तरी आपण या कर्मांत न पडतों. परंतु गंगाजी संकपाळ यानें कितीएक प्रकारें आह्मांसी आणशपथ केली. आणि आपणही पूर्वीं-पासून जाणतों जे, स्वामीचा दरबार एकवचनी. ऐसें जाणोन आपण या कामांत आलों नाहीं. तरी आपण कांहीं उपाशीं मरत नव्हतों. तुमचे कृपेंकरून सर्व अनुकूल होतें. परंतु हें कर्म अव-लंबिलियानें इतकें जालें जे, दहा मुत्सद्दियांत लटिका वाद आला, आणि साउकारियांत पत खोटी दिसोन आली! हें मिळविलें ऐसें जालें! त्यासी, आपण इतकें उपरोधून लिहितों. परंतु येथें लहानथोर अंमलदार कुल जमा जाले आहेत. आणि नबाबसाहेबीं दोन चार वेळां स्मरण केलें जे, राजश्री राऊजी अद्याप न आले. नबाब कुच करोन काळ्या चौत्रियावर डेरे जाले आहेत. दिपवाळी जालिया भागानगराकडे जायाचा निश्चय आहे. यावर न कळे. जर आपल्या चित्तांत हें कार्य कर्तव्य असलें तरी कांहीं खर्चास व कोणी इतबारी पाठविजे. सर्व मनोदयाप्रमाणें घडोन येईल. नाहीं तरी तैसेंच उत्तर पाठविजे. त्यावरोन नबाब साहेबांस अर्जी देऊजे, ते येत नाहींत. येथें जागिराची फर्द लिहून द्यावी, तरी आपणापाशीं मोहरही नाहीं, आणि तुमचाही कांहीं आश्रय दिसोन येत नाहीं. याकारितां आपण कांहीं बोली केली नाहीं. दिल्लीचें वर्तमान तर, पातशहा आगरियास आले. यासीही फर्मान आला आहे. याकारितां यानींही कुच केलें आहे. ऐसियांत आलिया उत्तम आहे. सर्व मनोदयाप्रमाणें घडोन येईल. यावर स्वामी समर्थ आहेत. तरी कृपा करोन गंगाजी संकपाळ यासी येथवर पाठ-विजे. आपला जिमा साफ्त करोन जाईल. नबाब नासरजंग यांचा इना यतनामा पाठवावा तरी साउकाराचे घरीं आहे. विना त्याचा पैका दिलियावेगळा हातास येत नाहीं. आपणांकडील तों पैसा एक दृष्टीस पडत नाहीं. याकारितां साउकारास खरेंपण वाटत नाहीं. यमाजी हरकारे दोघे पाठविले आहेत. यासी अजुरा रुपये २२ देणें, अतःपर उत्तर आलिया मनुष्य पाठविणार नाहीं. स्वामीस कार्य कर्तव्य नाहीं आणि आपण नाहाक श्रम करावे, यांत जीव नाहीं. तरी गंगाजीस

पाठविजे. कृपालोभ असो दीजे. हे विज्ञप्ति. पत्राजीस अनुरा रुपये २२ त्यापैकीं येथें दिले रुपये ६, बाकी देणें रुपये १६. हे विनंति. सांप्रत वर्तमान दामाद यांची वस्त्रें व घोडे २ व नजर ५०० मोहरा आल्यात. व राणा उदेपूरकर व सवाई जेसिंग यांचीं वस्त्रें वगैरे नबाबसाहेबांस आलीत. हुजुरून एक फर्मान पहिले आला होता. सांप्रत फर्मान व हत्ती एक व पांच घोडे व कलगी व सिरपेच व मोतियाची माळ व वस्त्रें व तरवार आली. बदस्तुर साबिला मोठे नबाब हे बहाल जाले. यामुळें नबाब नासरजंग बहुत खुशवखत आहेत. या खुशवखतीमध्यें स्वामीचें स्मरण जालें. लहान थोर अमिरांस कळों आलें कीं, राऊ येथें येतात. राजश्री प्रधान यांसही परस्परें श्रुत जालें कीं, राऊजींहीं या दरबारांत परिश्रम केला. नबाबांनीं बहुत चहा करोन बोलाविलें आहे, ऐसें जनामध्यें प्रसिद्ध जालें. आणि स्वामीकडील वर्तमान, गंगाजी संकपाळ गेलियासी पांच महिने होत आले, आणि आपाजी व मलकोजी जासूद जोडी गेलियास आज दोन महिने जाले, अद्याप कोणी फिरत नाहीं. स्वामी सरदार व मनसुबा उमदा जाणून या कार्यात आलों. तेथें मनसुबा उत्तम दिसोन येत नाहीं. याचा भावगर्भ काय तो न कळे. पत्रें येथून वर्तमान सर्व लिहून सेवेसी पाठवितों. आपले दृष्टीस स्वामी अवलोकितात कीं नाहीं, हेंही कळत नाहीं. थोरपणास लौकिक राहे, आणि श्रीमंत कैलासवासी यांच्या नांवापरीस विशेष कीर्ति होय, जनामध्यें हांसें न होय, तें केलें पाहिजे. स्वामीचे नांवाम दहा वीस हजार रुपये खर्च जाले. ते बहुत नाहीत. काम थोर आहे. न जाणो आपण काय तजविजीमधें आहेत. आपले नेत्र अहर्निस तिकडे लागून राहिले आहेत. तेथें दरबारांत ज्या थोर लोकांनी विद्यमानें कार्याची उभारणी केली आहे, त्यांनी माणसें नित्य येऊन दारमिंदे करितात. नजरबेगखांजी नित्य म्हणतात कीं, ऐसें न करणें कीं, मजवरी शब्द ये. माझें कार्य नासलें. नवे दिगर जाले तरी मजवरी इतराज होतील, कीं लटिका मनसुबा तुमचा आहे. ऐसें वर्तमान येथील आहे. स्वामीस आपल्या नांवाप्रारसें कर्तव्य तरी दोन्ही इनायत-

नामियांचा खर्च रुपये सा हजार व वस्त्रें वगैरे सरंजाम पाठवून देणें. कार्याची तरतूद केली जाईल. कर्तव्य नसलें तरी स्पष्ट उत्तर लिहावें, कीं आह्मांस कर्तव्य नाहीं. आणि गंगाजीस अतित्वर पाठवणें, कीं आह्मांस साउकारापासून मुक्त करून जाई. बहुत काय लिहिणें. हे विनंति.

---

[ १८२ ] श्रीराम. ९ आक्टोबर १७४८.

श्रीमंतजीचे सेवेसी विनंति ऐसीजे:—

पूर्वीं आपाजी मलकोजी जासूद याजबरोबर पत्र लिहिलें आहे कीं, पांच हजार स्वारांची बेगमी येथें केली आहे. जमातदारांचीं नांवें पूर्वीं लिहिलीं आहेत. त्यावरून कळों आलें असेल. सांप्रत आपाजी वगैरे जासुदांस दोन महिने जाले, न आले. ह्मणून वसवास झाला कीं, मार्गीं नदीनाला व चोर वगैरे कांहीं उपद्रव जाला. मारले गेले. ह्मणून येमाजी रंगोजी जोडी पाठविणें अगत्य जालें. स्वामीस या कार्याची उभारणी करणें अगत्य असलें तरी उत्तर तैसेंच लिहावें. आणि जमातदार यांचे वकील हजर आहेत त्यांचे नांवें कौल पाठविणें. हकीमबेग जमातदार राऊत ५०० व खोजे रहमतुला जमादार ५०० व सिदोजी जळगांऊकर पाटील ५०० व भीमसेन हजारी १००० व खानदेशचे जमातदार नामीबचुमिया व चांदसाहेब व अलीसाहेब फारोखी दखनी १५०० राऊत चांगले नामांकित तजवीज केले आहेत. यांचे नांवें कौल आधीं अलाहिदे पाठविले पाहिजेत कीं, ते चांगले घोडे व राऊत करतील. अथवा हें कार्य करणें नाहीं, तरी खरें उत्तर साफ पाठवणें कीं, आपण या कामापासून दूर आहों. हात उचलून एक वरीस जालें कीं, या कामांत आपण श्रम करितों आणि हा काळपर्यंत जाबसालच पुरता नाहीं. मग काम कधीं होणार? स्वामीचा दरबार एकवचनी थोर ह्मणून श्रम केले. दिसोन आलें कीं, श्रम साध्य नाहीं. नस्ता सर्व अमीर व मुत्सद्दि-यामधें लटिका वाद आला. नित्य थोर लोकाशीं मिथ्या किती बोलावें.

व दरबार मोंगलाई आहे. येथें एक वेळ लटकें पडलें ह्मणजे मनुष्यास पुन्हा जवळ उभें राहूं देत नाहींत. येथील रव या प्रकारचा. स्वामी-कडील उत्तर निर्मळ येत नाहीं. मध्यस्थानें कोठपावेतों मिथ्या भाषण करावें ? हें कर्म कार्याचें नाहीं. देखत पत्र कर्तव्य असलें तरी सरंजाम लिहिलेप्रमाणें पाठविणें. कर्तव्य नाहीं तरी उत्तर साफ व गंगाजी संकपाळ यास अतिसत्वर जासुदाबरोबर पाठवणें. विलंब करावयाचें कार्य नाहीं. स्वामी समर्थ व मुज्ञाप्रति विशेष लिहिणें नलगे. हे विनंति.

पेशवियांचें व यांचें चित्त शुद्ध नाहीं. चंपापष्टी जाहलियावरी यांचा त्यांचा हर्षामर्ष होऊन युद्धप्रसंग होणार. ऐसियामध्यें जमलें तरी चित्तानुरूप कार्य होईल. तेथें फौजेचा सरंजाम होत नसला तरी राजश्री शिवरामपंतास एक हजार स्वार समागमें देऊन कांहीं खर्च देऊन पाठविजे. येथें जुळू मुलाजमत करवून मग राजश्री कृष्ण-राऊजीस बोलाविलें जाईल. सरंजामही होऊन येईल. जागिराचें काम फत्ते केलें जाईल. विनंति. अहिच शेर गहू व अर्धा तूर १ रुपयाचे जासुदाबरोबर पाठविजे. विनंति.

---

[ १८३ ] श्री. १७५०

विनंति उपरि येथें वर्तमान ऐकतों जेः—

पाणगांवमध्यें राजा असे. तो निघोन ससरूपीस येत असे. त्यास हें वर्तमान आपल्यास विदित आहे की नाहीं हें कळत नाहीं. कोणत्या विचारें येनात हें कळत नाहीं. यानें, यामध्यें उत्तम नाहीं. सौभाग्यवती मातुःश्री सकवरबाईचा मजकूर तर आपल्यास विदितच असे. त्याचें मानस एक प्रकार असे. तीं चिंतितात जेः— एक वेळ आपले हातीं यावा, मग ईश्वर असे. महाराजाच्या चित्तांतील शोध घ्यावा, तर तूर्त समाधान नाहीं. यासतव धनीच जवळ असे. बे.ठतां येत नाहीं. मी जाहल्यावर चित्तांतील शोध करून लिहून पाठवितों. तंवर उतावळी करून आणाल तर न आणणें. येथें

आलेवर परिणाम बरा नाहीं. तुह्मीं सुखरूप राहणें, राजश्री बरे जाहलेवर आह्मीं निरोप घेऊन येतों. मग आपले चित्तामधें जावयाचें असेल तर निरोप देऊं. परंतु तुह्मीं तूर्त आहे ऐसाच असो देणें. तुह्मीं तेथेंच राहणें. खर्चावेचाविषयीं राजश्री जानोजी पवार यांस लिहिलें असे. ते देतील. सकल वर्तमान शिवाजीपंत लिहितील. सेकू सांगतां विदित होईल. बहुत काय लिहिणें. हे विनंति. पत्र फाडून टाकावें.

---

[ १८४ ] श्रीराजाराम. १७९१.

माहाराजाचे सेवेसी विज्ञापना. उपरि. आह्मीं ब्राह्मण कैलासवासी थोरले माहाराज यांचे नवाजीस. आजे बाप यांचें उर्जित केलें. हुद्दा, मामला, कैद, कानू, सरंजाम देऊन चालविलें. अर्जे विनंति चालवीत आले. आह्मास मातुःश्री आईसाहेबीं वाढविलें, नांवारूपास आणिलें. चाकरी घेतली. शेवटीं राज्यांतील विचार पाहोन वनवास करीत राहिलों. साहेबाचा जन्म झाला तेसमयीं मातुःश्रीच्या आज्ञेप्रमाणें दोघातिघांनीं जिवावर होडखे केला. साहेबांस पळविलें, ते बावडियासी नेलें. तेथें आह्मीं मागाहून गेलों. साहेबांचें पालणपोषण केलें. दहा बारा वर्षे जालीं. तेथें आह्मावरी राजा शंभूची इतराजी झाली. सौ जिजाबाईसाहेब चालोन आली. तेसमयीं परदेशी घासीराम याणें व बाइकोनें आह्मास नकळत पळवून साहेबास घाटाखालीं नेलें. तेथून चौऱ्यायशींचे फेरे फिरत, भिरट्या घेत श्रीतुळजापुरास गेले. तेथें थांग आह्मास लागला. नारोजीबाबा आधारी यांचा सहवास जाला. तेथें रहाणें जालें. श्रीतुकाईनें दया केली, ते समयीं साहेब पाणगांवास आले. बाईचा सहवास जाला. मुलकांत पुकारा होऊन राजा शाहूपर्यंत चहूकडे नांव गाजलें. यामुळें आह्मीं बावडियाहून श्रीपंढरीचे यात्रेस आलों. साहेबाकडे पत्र लेहून मातुःश्रीचे आज्ञेप्रमाणें भुजंग हुजरे व राजश्री एस ठाकूर व बहीरजी पडवल व एसू वस्त्रें देऊन पाठविलें. साहेबीं इमान वचन दिल्हें, पत्रें पाठविलीं. दर्याबाई यांसी वस्त्रें व पत्रें पाठविलीं. तेथील

बोलीचाली अवघी एकीकडेस राहून नवाच पंथ अविद्या चित्तीं धरून मातु:श्रीची सोय व आमची सोय टाकून ज्यांणीं जें सांगितलें तेंच ऐकावेंसें जालें. साहेबामुळें मातु:श्रीनीं उपभोगिलें, आम्हीं श्रम साहस करून उपभोगिलें, तें एकीकडेस राहिलें, तें ईश्वर जाणे! साहेबाकरितां उज्जिनास्तव श्रीदेवाजवळ अनुष्ठानें केलीं, ब्राह्मण घातले, नवस केले, त्याची यादी अलाहिदा लिहिली आहे. राजा शाहूचा अवतार संपूर्ण जाल्यास कोणी खावंद नाहीं, ऐसें जालें. तेसमयीं मातु:श्री आईसाहेबीं अवमान धरून साहेबास आणविलें. माता लेकराजवळ धावली. ऐसें असोन साहेबीं मायीचा जिव्हाळा सोडिला. मुंज, लग्न मातु:श्रीमुळें साहेबाचें जालें. स्थापना आईसाहेबामुळें राज्यपदावरी जाली. ती एकीकडे राहून साहेब दुसरियाचे मायेस गुंतले. धनलोभास मोहो पावले. मातु:श्रीची उपेक्षा केली. ही ईश्वरास न मानें. येणेंकरून राज्यास अपाय आहे. एक वर्ष साहेबास राज्यपदावरी बसोन जालें. साहेबाचें धणीपण चाकर-लोकीं चाकीम ठेविलें नाहीं. धकाबुकी जाल्या. शिवनिर्माल्य करून ठेविलें. दुसरेयांनी मारिलें. ये गोष्टीनी ईरे अभिमान सोडून आपला हेका तिरपगडा खरा! मातु:श्री नलगेत! ऐसा मोहो घालून, दुष्टानीं कपटविद्या करून मातापुत्रास अंतर पाडिलें. हें आमच्या चित्तास येत नाहीं. माता पुत्र, गुरु चेला, धणी चाकर, ही मर्यादा चालवावी; साहेबीं उत्तम वासना धरावी; वडिलांचे आज्ञेप्रमाणें कारभार करावा; हें उत्तम आहे. राजा शंभू कोल्हापुराहून दुष्टांनीं धारणे ऐलीकडेस दहा राउतानिशी आणिले. ते सातारियांत शहरांत येऊन, घरोघर हिंडोन, साहेबाचे अदृष्टाचे व'ल्याबोटा मावारे चालविलें. चोर एकीकडेस राहून संन्यासी मोठा पाहोन मुळी दिल्हा, ऐसी गत जाली. राज्यांत दोहाणा फितूर आला. चोहूकडे गर्दी जाली. गड, किल्ले गेले. दुष्ट बळावले. ये गोष्टीनी ईरे अभिमान साहेबास नाहीं. हें दुःख कोणाजवळ सांगावें. आजीन गाव, काठें, पाणी, पानें तुमच्या राज्यात मिळत नाहीं. कर्णद्वार जाले. लोकांनी घरें बुडविलीं. शिराळें, सातारा येथें येऊन फजित पावलों. साहेबाजवळ असे बोला

तो चालत नाहीं. चोर, चहाड, लबाड यांचा पर्वकाळ, इतबार साहेबांस वाटतो. आमचा विश्वास इतबार नाहीं. सीमा जाली. साहेबांस सद्गुरु करणें नाहीं. अविद्येनें गुरु करून परिणाम लागत नाहीं. वारणपलीकडेस राजा शंभु साहेबांचे अपायावरी जपत आहेत. वरकड दुष्ट लोक वेळास जपत आहेत. साहेबाच्या चित्तांत विवेक, विचार, शास्त्रें, पुराणें, राजनीति, वडिलांचा कदीम पाया, पद्धत येत नाहीं. यामुळें गड, किल्ले, मवास होऊन अन्नावस्त्रास महाग जाले. रयत व वतनदार चाकरमाने सर्वस्वें बुडाले. पाऊस गेला. कदीम चाकरलोकांस थारा नाहीं, ऐसें जालें. परीक्षा दरबारीं नाहीं. अपकीर्ति होत चालिली. याउपरि तरी देहावरी येऊन उत्तम विचार चित्तांत करावा. मातापुत्रांनीं बसोन कारभार एकचित्तें करावा. चौघे भले सरकारकून व जातिवंत मराठे हातीं धरून ज्याचें त्याप्रमाणें चालवावें, बळ पाडावें, जुना वडिलांचा पाया धरून वर्तावें, ऐसी नीत आहे. याप्रमाणें वर्तलिया अवघें कल्याण होईल. देव, ब्राह्मण, रयत संतोषी होईल, आणि साहेबांचें कल्याण इच्छितील. ईश्वर संतत संपत साहेबास देईल. आडमार्गें गेलिया ईश्वर बरें करीत नाहीं. हे आज्ञा देवाची व ब्राह्मणाची आहे. उत्तम विचार असेल तो करावा. स्वधर्म राखावा. सत्यं जय, ऐसें आहे. खरें नाणें, रुपया खरा असेल तोच साहेबीं हातीं धरावा. खोटाळ टिक्का हातीं धरलियानें उत्तम परिणाम नाहीं. यासी साक्ष शास्त्रें, पुराणें, वडिल परंपरागत पद्धति आहेत.

यद्यदाचरति श्रेष्ठस्तत्तदेवेतरो जनः ।
स यत्प्रमाणं कुरुते लोकस्तदनुवर्तते ॥ १ ॥

ऐसी नीति आहे. राजे लोकांस स्वभाव असावे :—

दातृत्वं प्रियवक्तृत्वं धीरत्वमुचितज्ञता ।
अभ्यासेन न लभ्यंते चत्वारि ( रः ? ) सहजा गुणाः ॥

ऐसा विचार आहे. साहेबांस निष्ठुर वादें कोणी सांगणार नाहीं. आह्मांस वडिल ह्मणविता यांजस्तव गुरुबोधाचे आज्ञेप्रमाणें हें विनंतिपत्र लिहिलें असे.

अप्रियस्य च पथ्यस्य श्रोता वक्ता च दुर्लभः ॥

ऐसें आहे. कैलासवासी माहाराज थोरले यांचीं पत्रें व पद्धत व मातुःश्रीची पद्धत व राजारामसाहेब यांची पद्धत वळवटा आह्मांजवळ लिहिला आहे. शाहाणपणें अक्कल बुद्धीनें विचार करून चित्तीं धरिला तरी वाचून पाहावा. राज्य ह्मणजे बुद्धिबळाचा डाव आहे. बुद्धीकरून जिंकिला पाहिजे. थोर थोर राजे या मार्गे होउन गेले, सरकारकून होऊन गेले, आह्मी जाणार, साहेबाची कीर्ति वंश राहिला पाहिजे. यांत उत्तम दिसेल तें करावें. *

---

[ १८९ ] श्री. १७७३.

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री आपाजीपंत स्वामीचे सेवेसीः—

पो रामचंद्र महादेव सा॥ नमस्कार विनंति उपरि येथील कुशल ता॥ माघ शु॥ २ पावेतो मु॥ छप्कर नजीक नल्हारी येथें क्षेमरूप जाणोन स्वकीय कुशल लेखन करीत असावें. विशेष. श्रीमंत राजश्री पंत अमात्य यांजकडील तालुक्यांत तुह्माकडून उपसर्ग होऊं नये एविसीं पुण्याचे मुक्कामीं बोलणें जालेच आहे. तुह्मीही करणार नाहीं हे खातरजमाच आहे. परंतु एक दोन चोमाट बोदकीहाळ, यळगुड वगैरे येथें आइकिले यामुळें पत्र ल्याहावें लागलें. श्रीमंत राजश्री अमात्य पंताचे ठामीं श्रीमंताचा व बापूचा व सर्व मुत्सद्दी यांचा लोभ कोणे रीतीचा हेंहि सर्व पाहिलेलेच आहे. तुह्मासही अगत्य असावें ऐसाच योग आहे. परंतु न कळे. अवाईस मिळोन हरएकविशी त्यांजकडील प्रांतास गावगाणा किंवा रोखपत्र ऐसे उपसर्ग लागतील तर फार गांभाळून दरोबस्त त्यांजकडील प्रांतास काहींमात्र उपसर्ग न लागे तें करावें. यांविशीं निमित्यकारी तुह्मीच आहे. शिमगा जाई आणि कवित्व राहे ऐसें न व्हावें यांत सर्व आहे. स्वामी तो ईश्वरेंच थोर केलेले आहे. तुमच्या आमच्या उपसर्गानें उणें पडतें ऐसें नाहीं. परंतु करणारांनी मात्र बहुत दूर आदेशा पाहून चालत असावें. ऐसेंच पर तें आहे. हें समजोन लि॥ आहे. यावरोंन निदर्शनांत यावें. विशेष लिहिणें तरी सुज्ञ असा. कृपा लोभ कीजे. हे विनंति.

---

* हें पत्र अस्सल आहे.

[ १८६ ] श्री. १७ जानेवारी १७७४.

अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य राजश्री आपाजी शामराव गोसावी यासी:—

सेवक रघुनाथ बाजीराव प्रधान नमस्कार सुा अर्बा सबैन मया व अल्फ. राजश्री सुंदराव पंडित अमात्य यांच्या गांवास घासदाण्याचा उपसर्ग करितां ह्मणून हुजूर विदित जालें. त्याजवरून हें पत्र तुह्मांस सादर केलें असे. तरी पंडित मशारनिलेकडील गांव खेड्यास उपसर्ग न करणें. करारप्रमाणें चालविणें. नवीन काहीमात्र उपद्रव न करणें. फिरोन बोभाट येऊं न देणें. जाणिजे. छ ४ जिल्काद. आज्ञा प्रमाण.

लेखनावधि.

---

[ १८७ ] श्री. १७ जानेवारी १७७४.

राजश्री येशवंतराव शिंदे गोसावी यासी.

छ अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य स्नो रघुनाथ बाजीराव प्रधान आशीर्वाद उपरि येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लिहित जाणें. विशेष. राजश्री सुंदराव पंडित अमात्य याजकडील गांव खेड्यास व जिल्हेच्या अमलास खलेल करितां, उपसर्ग देता. ह्मणून हुजूर बोभाट आला. त्याजवरून हें पत्र तुह्मास लिहिलें असे. तरी कराराप्रमाणें चालवणें. नवीन काहीमात्र उपद्रव न लावणें. फिरोन बोभाट येऊं न देणें. जाणिजे. छ ४ जिल्काद सुा अर्बा सबैन मय्या व अल्फ. बहुत काय लिहिणें.

लेखनावधि.

---

[ १८८ ] श्री.

पौा छ १० जिल्हेज.

श्रीमंत राजश्री सुंदराव पंडित स्वामीचे सेवेसी:—

पोा बाळाजी जनार्दन कृतानेक साष्टांग नमस्कार विनंति येथील वर्तमान ताा छ १९ जिल्काद पावेतों यथास्थित असे. विशेष. आपण पत्र पाठविलें तें प्रविष्ट जाहालें. राजमंडलाकडील तह राजश्री परशुरामपंत यांचे विद्यमानें होत आहे, याजकरितां त्यास लिहून पाठवून

आपलेकडील बंदोबस्त पूर्ववत्प्रमाणें होय तें करावें, येविशीं राजश्री गमाजीपंत सूचना करितील ते मनन करावें, ह्मणोन विस्तारें लिहिलें, व गमाजीपंतांनीं सांगितलें, त्यावरून कळों आलें. ऐसियास, येविशीं परशुरामपंत यांस अलाहिदा सरकारनें पत्र पाठविलें आहे. ते आपणाकडील बंदोबस्त करून देतील. बहुत काय लिहिणें. लोभ असो दीजे. हे विनंति.

---

[ १८९ ] श्री. १ मार्च १७७४.

अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य राजश्री बाळाजी गणेश यासी:—

प्रति मातुःश्री गंगाबाई आशीर्वाद. अर्बा सबैन मया व अलफ. ता। साळसी येथें राजश्री सुनराव पंडित अमात्य याजकडे दीड तक्षीम वगैरे अंमल पेशजीपासून आहे. त्यास साळमनकुरीं माल्वणकरी यांणीं कजिया करून अंमल उठविला आहे. ह्मणोन हुजूर विदित जाहलें. त्यावरून हें पत्र तुह्मास सादर केलें असे. तरी सरकार अंमल अलीकडे पंडित मशारनिलेकडील ता। मजकूरीं चालत असेल त्याप्रमाणें चालवणें. माल्वणकरी नवीन कजिया करीत असल्यास करून देणें. सुदामत चालत असेल त्याजप्रमाणें चालवणें. तुह्मी आपले तर्फेनें हरएकविसी साहित्य करीत जाणें. जाणिजे. छ १७ जिल्हेज. आज्ञा प्रमाण.

लेखनसीमा.

---

[ १९० ] श्री. १७७४.

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री बाळाजीपंत स्वामीचे सेवेसी.

पोष्य सखाराम भगवंत साष्टांग नमस्कार विनंति उपरि येथील कुशल ता। छ २२ मकर जाणून स्वकीय कुशल लेखन करीत जावें. विशेष. राजश्री पंत अमात्य याजकडील प्रांत साळशी येथील अंमल सुरळीत चालत आल्याप्रमाणें चालावा, त्यांत किनेक प्रकारें मालेदाराकडून उपद्रव होतो, पुरातन चालत आल्याप्रमाणें चालत नाहीं, ह्मणोन ऐकिलें. त्यास माल्वणकरी यांस ताकिद असावी. आपल्याप वर्तमान कळल्यावर ताकिद होऊन त्याजकडील सुदामत चालत आलें असेल त्यास अटकाव न व्हावा. आल्यास ह्याहातेंसें नाहीं. तें प्राचीन चालत आलें आहे तें

चालवावें. पहिलेपासून चालत आलें आहे त्याप्रमाणें करावें. नवीन न करावें. बहुत काय लिहिणें. लोभ असो दीजे. हे विनंति.

---

[ १९१ ] श्री.

विशेष. आपणापासून बावड्याच्या संस्थानचा अभिलाषास्तव शेणवी याणीं फितुर करून आह्मास आणून, तीर्थस्वरूप राजश्री सुब्रराव पंडित अमात्य यासी व आह्मासी खटला करून, त्यासी बाहिर आठ वर्षे परागंदा करून, शिवंदीच्या पेचांत आणून, संस्थान श्रीमंत महाराजानीं हस्तगत करून, आह्मास कैद करून आणिलें. वडिलावर कृपा करून त्यांचें संस्थान त्यांचे स्वाधीन केलें. उपरांत वडील आह्मावर कृपा करून सोडवून घेऊन सातान्यास लावून दिल्हें. पेशजी सदाशिवभट नानल यांचे विद्यमानें आपले कानावर संस्थानविशीं व कर्जाविशीं नाना प्रकारचे खटले बोलणेंत आले असतील ते आह्मीं आपले स्वसंतोषें सोडून वडिलाकडे आलोंच. कर्जाचे व गांव खेडचे व चीजवस्तीचे व संस्थानविशीं गुंता आमचा त्रिवर्गाचा व मातु:श्रीचा व आमच्या वंशाचा तीर्थस्वरूप राजश्री सुब्रराव पंडित अमात्य व त्यांचे संस्थानचा गुंता व खटला आमचा नाहीं. पेशजीच समजावणी आपण त्याजविशीं व संस्थानविशीं आमचे खटलेमुळें आपण त्याजवर अरज नसावी, आमचें व त्यांचें खटलें माहाराज यांचे संनिध तुटलें. अत:पर किंपि आमचा व त्यांचे संस्थानविषयींचा गुंता आह्माकडे नाहीं. व त्याजकडे आमचा गुंता किमपि तिलप्राय राहिला नाहीं. आपण आमचे कारभारी व आणखी घरांतील कोणी दरजा आपणास समजावून वडील———

अपूर्ण.

---

[ १९२ ] श्री. १७७४.

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री पांडुरंगराव स्वामीचे सेवेसी:—

पो। मोरो बाबूराव सा। नमस्कार विनंति उपरि येथील कुशल जाणोन स्वकीय कुशल लिहित जावें. विशेष. राजश्री मुराराव हिंदुराव घोरपडे

मगलकत मदार सेनापति यांहीं सरदेशमुखी व इनामगांव मातुःश्री आई साहेब यांचे विद्यमानें माहाण ठेविले. करारामों एवजही मेतदा. हल्लीं वर्षे नबरदस्तीनें सरकारांत वसूल घेतात हें वर्तमान विदित झालियावर हुजूरचीहीं पत्रें तुह्मांस आहेत. त्याप्रों मागील भोगवटेयाप्रमाणें व सरकारचे पत्राचे अन्वयें यांनकडे सुरळीत चाले तो अर्थ करावा. मानिल्हेकडून रा० गोविंद बाबुराव कारकून पत्रें घेऊन आले आहेत. हे आपणास तेथील कचीं वहिवाट समजावितील. त्याप्रों बंदोबस्त करून द्यावा. कारकून मानिल्हेस आपणाजवळ ठेऊन हरएकविसीं फिरोन बोभाट न येई तें करावें. बहुत काय लिहिणें. लोभ कीजे. हे विनंति.

---

[ १९३ ] श्री महालक्ष्मी मा.

~ श्री ०

त्रैलोक्याभयदात्रीश्रीकर-
वीरनरेश्वरी । मुद्रा तस्या
जगन्मातुर्वर्वर्ति सकलेश्वरी ॥

श्रीमहालक्ष्मी
२१ सप्टेंबर
१७९९.

आज्ञापत्र श्री देवी संस्थान क्षेत्र करवीर याणीं राजमान्य राजश्री सुबराव पंडित अमात्य यासी आज्ञा केली ऐसीजे:—पेशजी किल्ले गगनगड जकायतच्या ऐवजी वे॥ राजश्री रघुनाथ भट सावगांवकर प्रधान नि॥ संस्थान याचे विद्यमानें वर्षासन शारदी नवरात्र उत्साहास नक्त रुपये व सामान नारळ व पानें विडेचीं व सुपारी व हळद व सोंठ येणेंप्रमाणें चालत होतें. प्रस्तुत हल्लीमानीमुळें एथीकडे येत नाहीं. याजवरून आज्ञापत्र सादर होऊन संस्थान नि॥ मही पाठविले आहेत. नवरात्र उत्साह समीप आला आहे. त्यास पूर्ववत नगद रुपये व सामान पाठवून द्यावें. बहुत काय लिहिणें. सुमा सन्ना तिसैन मया व अलफ. जाणिजे. रवाना छ १९ माहे रबिलावल.

लेखनसीमा.

---

[ १९४ ] श्री. २३ डिसेंबर १८००.

सकलगुणालंकरण अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य राजश्री सुबराव पंडित स्वामी गो॥ यासीः—

पो॥ अमृतराव रघुनाथ नमस्कार विनंति उपरि येथील कुशल जाणोन स्वकीय कुशल लिहित असावें. विशेष. आपण पत्र पाठविलें तें पावलें. पूर्व रुणानुबंधाचे अर्थ व श्रीमंत महाराज यांचे लक्षाचे भाव लिहिले ते व राजश्री बच्याजी जिवाजी याचे पत्रावरून अवगत जाहालें. ऐशास पूर्व स्नेह आहे तो परस्परें वृद्धिंगत असावा हें उचित आहे. आह्मी भिवंडीस स्वस्थ आहों. श्रीमंत महाराज यांचे क्रियेचा अवलंब असे. रा॥ छ ६ शावान. बहुत काय लिहिणें. लोभ कीजे. हे विनंति.

---

[ १९९ ] श्री. २१ मे १८१७.

राजश्री कमाविसदार मा॥ हाय व समस्त सरनाईक सरदार गोसावी यासीः——

छ अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य स्ने॥ बाजीराव रघुनाथ प्रधान आशीर्वाद व नमस्कार. सुरुसन सबा अशर मैयातैन व अलफ. त्रिंबकजी डेंगळा कुंपणी इंग्रजबहादर याचे कैदेंतून पळून बंड करीत आहे. त्याची चौकशी गांवगन्ना करून डेंगळा मजकूर याचा ठिकाण लावून जिवंत अगर मेलेला सरकारांत हावाला करून देईल त्याजला बक्षीस दोन लक्ष रुपये व हजार रुपयाचे गांव इनाम इंग्रजबहादर याचे विद्यमानें दिल्हा जाईल. याप्रमाणें खातरजमा राखोन सरकार चाकरी करून दाखवावी. याची पुरती चौकशी करून जो त्रिंबकजीस धरून आणोन देईल त्याजवरी सरकारची सरफराजी होईल. येविशीं जो कोणी अनमान करील त्याजवर सरकारची इतराजी होईल. व समस्त गरीब रयत ब्राह्मण व म्हाराठे व परदेशी व मुसलमान व वाणी उदमी व बेरड, भिल्ल, मांग, रामोशी व रहदार वगैरे जे कोणी त्रिंबकजी डेंगळा याचा पत्ता अमुक जाग्यावरी आहे असा प्रत्यक्ष सरकारांत दाखवून देतील त्यास पांच हजार रुपये बक्षीस व एक चावर जमीन इनाम इंग्रजबहादूर याचे विद्यमानें पावेल. डेंगळा मजकूर याचा पत्ता ठावोक असोन जर कोणी सरकारांत समजावयास आळस केला असें विदित जाहलें तरी त्याचें पारपत्य होईल. त्रिंबकजी-डेंगळा बंडवाला याच्या मिलाफांतील इसम १२.

१ बापू गाईकवाड सेट फलकर.
१ मानाजी.
१ रविराव शिंदे लोणीकर.
१ तिमापा वडागी.
१ महादाजीपंत नातेपोतेकर.
१ गोधोजी डेंगळा.
१ सगाजी मुळे.
१ अप्पाजी पा। कुरुबंबीकर.
१ निंबाजी यादव फलटणकर.
१ महीपंत डेंगळा.
१ बापू बारडकर.
१ दाजी डफळे.

---

१२

येणेंप्रमाणें येकूण बाराजण याचे कुटुंबाचीं मुलेंमाणसें कैद करून बेड्या घालोन बंदोबस्तानें हुजूर पोचते करणें व त्यांचीं घरें जपतिनदोस्त करून घरांतील चीजवस्त सुतळीचे तोड्यासुद्धां जप्त करून त्याचा आकार होईल तो ज्याजती शिबंदी वगैरे खर्च लागेल त्याऐवजीं घेणें व त्याची इनामवतनवृत्ती असतील त्या जप्त करणें. या बाराजणांपैकीं जे कोणी त्रिंबकजी डेंगळा यांसी धरून आणोन देतील त्याचा अपराध माफ होईल. वर लिहिलेप्रमाणें बक्षीस पावेल. या बाराजणांखेरीजकरून बंडाचे सिलाफी स्वार व पायदळ व कारकून व शागिर्दपेशा वगैरे बंडाची चाकरी सोडून आपलाले घरीं येऊन जमेदार व मोकदम यांसी रुजू होऊन राहिले असतां त्यास बंडाचे सिलाफाचा अपराध माफ केला जाईल. बंडाची चाकरी सोडून न आलेस वर बाराजणांचें पारपत्य करावयाचें लिहिलें आहे त्याप्रमाणें यांचें पारपत्य करणें. बंडाचे सिलाफी गरीब लोक यांतून कोणी त्रिंबकजी डेंगळा याचा पत्ता लावून प्रत्यक्ष सरकारांत दाखवून देईल त्यासही वर लिहिल्याप्रमाणें बक्षीस पावेल जाईल. आणिमे. छ ४ रजब. मिती. आज्ञा

---